[ काव्येतिहास-संग्रह. ]

[ ३१. ]

ऐतिहासिक

# पत्रें यादी वगैरे.

हे [ ५०१ ] लेख

अर्थद्योतक व इतर माहितीच्या टीपांसह

काशिनाथ नारायण साने, बी. ए. ( डेक्कन कॉलेज. )

यांणीं

प्रकाशित केले.

शालिवाहन शके १८११

श्री

महाराष्ट्राच्या भाषेचा व इतिहासाचा आस्थापूर्वक

अभ्यास करूं इच्छिणाऱ्या सज्जनांस

हा ग्रंथ

परमप्रेमपूर्वक अर्पण करितों.

ग्रंथ-प्रकाशक.

# पत्रें, यादी वगैरे.

## उपोद्घात.

१. राजकारणी पुरुषांनीं मागें निरनिराळ्या ऐतिहासिक गोष्टींच्या संबंधानें जीं पत्रें लिहिलीं व त्यांस जीं पत्रें आलीं तीं आणि ऐतिहासिक व थोर पुरुषांच्या चरित्रांस अनुलक्षून असणारे नानाप्रकारचे जुने किरकोळ लेख आमचेकडे येऊं लागले आहेत. त्या पत्रांचा व किरकोळ लेखांचा इतिहासाच्या कामीं बारीक बारीक गोष्टींचा निर्णय करण्यांत व इतिहासाच्या खांचा खोंचा भरून काढण्यांत मोठा उपयोग होईल. पत्रें लिहिण्याची पद्धति, लिहिणारांचा स्वभाव, तेव्हांची लोकस्थिति इत्यादि प्रकारच्या माहितीचे ही हे लेख द्योतक होतील. यास्तव ते सर्व एका ठिकाणीं निराळे बांधियावे ह्मणून "पत्रें, यादी वगैरे" असें निराळें सदर घालून त्या खालीं जसजसे ते येतील तसतसे देण्याचें योजिलें आहे.

२. आतां हे पत्रें वगैरे लेख कालानुक्रमानें प्रसिद्ध करणें योग्य होतें. परंतु तसें सध्यांच करणें ह्मणजे दुरापास्त आहे. एक तर या लेखांवर शक वगैरे मिती साकल्यें करून दिली नसते. कोठें नुसता वार कोठें नुसती तिथी व महिना इतकेंच घातलेलें असतें. तेव्हां त्यांचा अनुक्रम लावितां येत नाहीं. खेरीज सर्व पत्रें वगैरे लेख आह्मांस मिळाल्यावर त्यांचा अनुक्रम लावण्यास ठीक पडणार. परंतु हा पत्रसंग्रह जितका असेल तितका आमचेकडे येणें कठीण दिसतें. आणि तो एकदम सगळाच्या सगळाच आमचेकडे येणें हें तर मुळींच अशक्य आहे. याकरितां सर्व पत्रांदिकांचा संग्रह आमचेकडे येई तों पर्यंत न थांबतां जीं जीं पत्रें, टिपणें मिळतील तीं तीं सर्व जशीं येतील तशीं देऊन त्यची कालानुक्रमें व्यवस्था करण्याचें काम तूर्त न स्वीकारितां कालांतरावर टाकितों.

३. या किरकोळ लेखांच्या मूळच्या भाषेंत फेरफार वगैरे न करितां बखरीं प्रमाणें जशाचे तसेच छापण्याचें योजिलें आहे. दुर्बोध ठिकाणीं [?] असें प्रश्न चिन्ह करून जशीं अक्षरें दिसलीं तशीं घातलीं आहेत. त्यांचा बोध कोणास झाल्यास इकडे कळविण्यांत यावा, व तसेंच निरनिराळ्या पुरुषांचीं व स्थलांचीं नांवें येतील त्यांजबद्दलही कांहीं कमी जास्त माहिती मिळाल्यास तीही आह्मांकडे पाठविण्याची एतत्-संग्रह-हित-चिंतकांस आमची विनंती आहे.

४. जुन्या काळच्या पत्रव्यवहारांचीं पुडकींच्या पुडकीं पुष्कळ गृहस्थांकडे लोळत पडलेलीं सांपडतील. परंतु तीं मिळण्याचीच मोठी मारामार आहे. या पत्र-व्यवहाराची ऐतिहासिक दृष्टीनेंच काय किंमत असेल ती असेल. बाकी दुसऱ्या दृष्टीनें पाहतां त्यांची कांहीं किंमत ह्या काळीं दिसत नाहीं. तेव्हां हे लेख वाण्यांच्या दुकानांत किंवा कसरीच्या भक्ष्यस्थानीं दवडण्या पेक्षां त्यांचा जीर्णोद्धार करण्याविषयीं त्यांच्या रक्षकांचे मनांत कोणते ही रीतीनें बिंबलें तर इतिहासाचे कामास मोठी अनुकूलता होईल.

---

श्री

वेदशास्त्रसंपन्न राजश्री वासुदेव दीक्षित

स्वामींचे सेवेशीं

विद्यार्थी बाळाजी बाजीराव. नमस्कार विनंति उपरी येथील वर्तमान तागाईत आश्वीन वद्य प्रतिपदा पावेतों स्वामींचे कृपेकरून सुखरूप.

सविस्तर अर्थ मी सेवेशीं विदित केला होता. राजश्री स्वामींचीही मर्जीच राखून एक जशी आज्ञा केली त्याप्रमाणें मान्य करून पुढें स्वामींचे आशीर्वादें परपार पावूं. विस्तार ल्याहावा ऐसा काय आहे? सारांश स्वामींचीं लेंकरें आहों. आपलेच आशीर्वादें सर्वही उत्तम होईल. वरकड लिहितां विस्तारच आहे. यास्तव उभयतां वेदमूर्ति निवेदन करितां विदित होईल. बहुत काय लिहिणें? हे विनंति.

---

वेदशास्त्रसंपन्न राजमान्य राजश्री वासुदेव दीक्षित

स्वामींचे सेवेशीं

विद्यार्थि बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंति उपरी येथील कुशळ जाणूव स्वकीय लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष राजश्री

१. हे वे० शा० रा० नारायणभट्ट दीक्षित यांचे चिरंजीव. नारायण दीक्षित हे मोठे विद्वान् व तपस्वी ब्राह्मण होते. त्यांस निरनिराळ्या राजपुरुषांनीं इनाम दिलें आहे. काशींतील ब्राम्हणांस सुजाउद्दवला याणें मोठया संकटांत घातलें असतां तेथील ब्रह्मवृंदाची सुटका करणारे हेच दीक्षित होत. ( पेशव्यांची बखर पृ० ७३ पाहा) यांशीं व त्यांच्या वंशजांशीं निरनिराळ्या राजपुरुषांचा पत्रव्यवहार राजप्रकरणींही सुरू असे. नारायण दीक्षित हे पुढें काशी येथें कैलासवासी झाले.

यांचे वंशज श्री० रा० यज्ञेश्वर बाळकृष्ण दीक्षित, कायगांवकर, यांजकडून हा पत्रव्यवहार अंशतः आम्हांस मिळाला आहे. ह्याजबद्दल आम्हीं त्यांचे मोठे आभारीआहों.

२. यावरून हें पत्र दोन ब्राम्हणांबरोबर पाठविलें होतें.

शिवराम गोविंद भिडे व सखाराम बापूजी नाईक भिडे व नेमीदास अनी-पंत [?] यांजकडे सरकारचा ऐवज येणें तो आणावयासि राजश्री पांडुरंग महादेव व यादाजी दादाजी * दि॥ दादो महादेव यांस फौजसुद्धां व बरोबर उंट नफर ३ २५ पंचवीस देऊन पाठविले आहेत. तर सदरहु ऐवज शहराहून बहुत तजविजीनें रवाना करणें. ऐवज पारखवयासि राजश्री बापूजीनाईक दि॥ रामाजी नाईक पोतदर यांस पाठविले आहेत. यांचे मारफतीनें ऐवज पारखाऊन शहराहून बहुत तजविजीनें, सुरक्षित-पणें, कांहीं अटकाव, कजिया न होतां बाहेर काढून देविला पाहिजे. † र॥ छ० ६ जमादिलाखर. बहुत काय लिहिणें लोभ असो दीजे हे विनंति.

---

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित

स्वामीचे सेवेशीं.

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित असिलें पाहिजे. विशेष, आपण टोंक्याचे मुक्कामीं श्रावण४ मासचे उत्साहास पुण्यास निश्चयें येतों ह्मणोन मान्य केलेंच आहे. त्यास सांप्रत उत्साहाचा प्रसंग आहे. तरि स्वामींनीं स्वार होऊन आलें पाहिजे. अगत्य श्रावणचे उत्साहास यावें. हे विनंति.

पौ। ‡ आषाढ वद्य ४ रविवार शके १६७७ युवनाम संवत्सरे

---

वेदमूर्ति राजश्री वासुदेव दीक्षित,

स्वामीचे सेवेशीं.

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान. साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशळ जाणून स्वकीय. लिहिणें विशेष आपण पत्र पाठविलें तें पावलें. सविस्तर वर्तमान कळलें. राजश्री जानबा निंबाळकर आले. राजश्री रामदास५पंताचे स्नेहाचाच अर्थ सांगितला. तेणें करून संतोष झाला. आम्हींहि स्नेहवादें च किती एक विचार मशारनिल्हेशीं बोललों आहों.

---

* दिम्मत=तावा, पदर.

३. नफर = नग, संख्या.

† रवाना.

४. श्रावणमासचा उत्साह = दक्षिणा वाटण्याचा. पेशव्यांची बखर पृ० ७१-७२ पहा.

‡ पैयस्ती = पत्र दाखल झाल्या मिती अगर तारीख.

५. [?]

६. हा ब्राम्हण गृहस्थ बुसे याणें नाझरजंगाचा नाश करण्यास योजिला होता. त्या प्रमाणें त्याणें नाझरजंगाच्या लष्करांत फितूर करून शेवटीं नाझरजंग मारला गेला. नंतर 'राजा रघुनाथ' असा त्यास किताब देऊन बुसीनें त्यास सलाबतजंगाचा मुख्य प्रधान केलें. पुढें टीप ७ पाहा.

ते सविस्तर लिहितील व बोलतील. त्याजवरून सविस्तर कळेल. निरंतर सविस्तर अर्थ लिहीत असलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंति.

पे॥ आश्विन शुद्ध ३ बुधवार शके १६७३.

---

वेदशास्त्र संपन्न राजश्री **वासुदेव दीक्षित** स्वामीचे शेवेशी,

विद्यार्थी **बाळाजी बाजीराव प्रधान** साष्टांग नमस्कार विनंती येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणें. विशेष, गाजुंदीखान वडील आणि पातशाही सनदे सहवर्तमान. येतात. त्यांचे साहित्याविषयीं पातशाहानीं सरदारांस बहुत सांगितलें. आह्मांसही लिहिलें आहे. याप्रकारें पावतां सय्यद लष्करखान यांणीं सलावत* × × × × विचार तो सांगून ते आलियावर परस्पर तह होय. कलह-वृद्धि न व्हावी. प्रजा सुखी असावी. याप्रकारें खानास करणें योग्य आहे. मागें खानांनीं नागो रामा बरोबर पलीकडील वर्षी सांगून पाठविलें होतें त्यांत खानाचा मनोदय गाजुदीखानाकडेच स्पष्ट दिसत होता. व रामदासपंताशीं चित्तापासून निमुनस्कृता, याजमुळें ही तिकडेच अनुकूळ मनोदय होता. सांप्रत मात्र कांहीं संशयांत पडले असतील. आपण त्याचा इतबारी, प्रमाणिक शहरांत असेल त्यापासून लिहून पाठवावें. व आपलें ही पत्र त्याच अन्वयें जाऊन जाब सत्वर आला पाहिजे. प्रसंगीं खानांनीं गाजुदीखान याजकडे जाहलिया, एक निष्ठेस योग्य व लाभ ही त्यांत व आमचे स्नेहास ही योग्य, असे तीन अर्थ घडतात. सर्व प्रजांचें बरें होतें व गाजुदीखान नबाबाचा वडील पुत्र, आणि पातशाही सनदेसहित येतो, त्याकडे जाहलियास कोणेविशीं ही दोष नाहीं. आह्मांस तो जें सरदार करून येतील तें निभावलेंच पाहिजे. व सलाबतजंगासही

---

७. हा निजाम उलमुलकाचा ज्येष्ठ पुत्र. ह्यानें शिंदे होळकर मार्फत पेशव्यांशीं स्नेहाचें बोलणें लावून दक्षिणचा सुभा सलाबतजंगाकडे होता तो आपणाकडे व्हावा अशी मसलत मांडिली. ह्या मसलतीच्या संबंधानेंच खालीं दिलेलीं पत्रें पेशव्यानें दीक्षित यांस लिहिलीं (ई० सन १७५१।५२

८. सरदारांस=शिंदे होळकर यांस

९. सय्यद लष्करखान हा औरंगाबादचा सुभा गुप्तपणें गाजुद्दीखान याची मदत करीत होता. सन १७५२ च्या एप्रील महिन्यांत रामदासपंत मारला गेल्यावर ह्यास बुसीनें दिवाण नेमिलें.

* ह्या शद्वापुढील शब्द गेले आहेत किंवा पत्र लिहिणारानें गुप्त कारणासाठीं वळेंच लिहिलें नसावें. अशा ठिकाणीं फुल्या घातल्या आहेत.

१०. सन १७५२ मध्यें मोंगलाचा पराजय झाल्यावर ह्यांच्या फौजेंत आपसाआपसांत पगाराच्या बाकीवरून जो तंटा झाला त्यांत रामदासपंत मारला गेला. (एप्रिल ता० ७ स० इ० १७५२) याचें व रामदासपंताचें वांकडें होतें.

हेंच योग्य आहे. मागें नासरजंग नबाबाशीं[११] भांडले [ते] काय फळ व काय लौकिक पावले? बाहेरील कोणी आला तर भांडणें योग्य, घरचे घरीं भांडणें सर्व प्रकारें योग्य नाहीं. याच प्रकारें खानांनीं[१२] मसलत × × × कोणी कलहवृद्धीचा उपदेश × × × त्यास दीर्घदर्शित्व खमवार [?] करून आपले हातीं घेणें योग्य आहे. आह्मांस तो खानांचा भरंवसा पूर्ण आहे. तथापि नवीन प्रसंग आहे. लिहून उत्तर आणणें योग्य आहे. एतद्विषयीं कांहीं संकलित खानास पत्र पाठविलें आहे. हें जलद पावतें करून सविस्तर उत्तर आणून पाठवावें. तदनुरूप कर्तव्य तें केलें जाईल. छ २९ सावन बहुत काय लिहिणें हे विनंति. कदाचित् खान फिरंग्यांचे[१३] भरावर जातील तर न जावें. सर्व उमराव तिकडे[१४] होतील. फिरंगियाची फुलचरीस[१५] संकट, मग नवें सामान कोठें येणार? व एक फिरंगी सामानानें काय होतें? ते भर देतील परंतु भरंवसा न मानावयाचा. त्याचा पूर्व प्रकार कळलाच आहे. हे विनंति.

---

मि॥ आषाढ शुद्ध ६ सोमवार शके १६७६

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित, स्वामीचे सेवेशीं.

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम तागाईत आषाढ वद्य पंचमी पर्यंत यथास्थित असे. विशेष आषाढ शुद्ध पौर्णिमा मंगळवारचें पत्र पाठविलें तें वद्य चतुर्थीस पावलें, लिहिलें वृत्त साद्यंत कळलें. दरगाह कुलीखान यांस पत्र लिहून पाठविण्याचा मजकूर व यांचे विशीं गाजुदीखान याचें पत्र दरगाह कुलीखान यास आणवावयाचा मजकूर लिहिला तो साद्यंत कळला. त्याजवरून दरगाह कुलीखान यास पत्र लिहून पाठविलें आहे. हें त्यास प्रविष्ट करणें. व याचे विशीं राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे यांस पत्र लिहून पाठविलें आहे. व गाजुदीखान यास पत्र लिहून पाठविलें आहे. तेथूनही पत्र येईल. सारांश औरंगाबादेस खुदावतखान व शेख अलीखान जुनदी [?] व जमीलबेगखान व अस्सलखान व हशमदुल्लाखान वगैरे आहेत त्यांशीं स-

---

११. नबाबाशीं ह्म० आपला बाप जो निजाम उल्मुल्क त्याशीं.

१२. खान=सय्यद लष्कर खान.

१३. फिरंगी [फ्रांक] हें नांव सर्व युरोपियन लोकांस मुसुलमान लावीत परंतु येथें फ्रेंच उर्फ फरांशीस हे होत.

१४. तिकडे ह्म० गाजुदीखानाकडे.

१५. फुलचरी ह्म० पांदेशरी. इंग्रजांची व फ्रेंचांची लढाई मद्रासेकडे या वेळीं चालली असून इंग्रजांचा जय झाला (१७५१–५४) त्यास अनुलक्षून हें लिहिणें आहे.

वांशीं राजकारणें करून गाजुदीखान बऱ्हाणपुरास येतांच त्या शहरामध्यें गाजुदीखान याची द्वाही फिरवावी; आणि सर्वांनीं गाजुदीखान याजकडे राजकारण लाऊन सामील व्हावें. याप्रमाणें विचारणा होय तें करावें. दुरगाह कुलीखान तुह्मांशीं बोलले त्याप्रमाणें त्यांचीं निष्ठेचीं पत्रें आपचे नांवें व फेरोजंगाचें नांव घेऊन पावून देणें. परभारें हीं पत्रें पाठवीत जाणें. वरकड, प्रस्तुत बाहेर निघालों. लोक जमा होत आहेत. आठ दहा रोजांत भीमा पार होऊं. • मराठियाशीं जाबसाल आहेच. पहिलें पहिलें लिहून पाठविलें त्याप्रमाणें खानास वरचेवर लिहून तेथून हरएक बाबांनीं भोजन घेत [?] व तेथेंही सर्व सूत्रें गाजुदीखानाकडे अनुकूल पडत अशीं करावीं. याप्रमाणे लिहून उत्तर आणवावें ता।। छ २० रमजान. बहुत काय लिहणें लोभ असों दीजे हे विनंति.

---

पौ आषाढ वद्य ३० बुधवार शके १६७४.

पु।।* वेदशास्त्रसंपन्न राजश्री वासुदेव दिक्षित स्वामीचे सेवेसीं.

विनंति. गाजुदीखान छ ११ रमजानीं नर्मदा उतरून आलीकडे आले, ह्मणून पत्रें आलीं, ह्मणून लिहिलें तें कळलें. पुढें वर्तमान आणखी येत जाईल तें वरचेवर लिहून पाठवीत जावें. भागानगराकडील[16] वर्तमान लिहिलें तें सार्वंत कळलें. आपले विद्यमानें गाजुदीनखान याजला स्नेहाचा संदर्भ लावून भागानगर प्रांत आपणाडे करून द्यावा. मक्ता झाला तर करून देतील त्याप्रमाणें वर्षास देत जाऊं. या प्रमाणें पत्रें आलीं ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐसियास सय्यद लष्करखान आमचे भेटीस सलाबतजंग याजपासून रुसकत[17] होऊन येत आहेत. ते येथें आलियावरि त्यांची आमची भेटि जाहलियावरि जो विचार होणें तो होईल. दुरगाहाकुलीखान याजविशीं आपणांस पत्र लिहिलें आहे त्याप्रमाणें पत्रें अगत्य पाठवून द्यावीं ह्मणून लिहिलें तर येविशींचें उत्तर पूर्वींच आपल्यास लिहून पाठविलें आहे. त्याजवरून कळलेंच असेल. आपण लिहिला अर्थ तहकीक[18] करून मागितल्याबद्दल राग सरदारांस लिहून याचा विचार करूं. आह्मी तो सर्वत्र ऐकतों कीं फिरंगी[19] व खान मिळोन फार जुज्ञावयाच्या गप्पा मारतात त्यास पुर्ता शोध करून जरूर लिहिणें. जरूर गुप्त रितीनें

* पुण्यपावन, पुण्यशील, [?]
१६. भागानगर=हैदराबाद.
१७. निरोप घेऊन, निरोपाचीं वस्त्रें मिळून.
१८. तहकीक=पक्का, निश्चयात्मक.
१९. बुशी फरांशीस.

राजकारण शोध जरूर करून अती त्वरेनें लिहीत असावें. बहुत काय लिहिणें हे विनंति.

---

पै॥ आषाढ वद्य ३० बुधवार शके १६७४.

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दिक्षित स्वामीचे सेवेशीं.

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील क्षेम ता॥ छ २४ रमजान पावेतों यथास्थित असे विशेष आपण आषाढ व॥ ९ रविवारचीं पत्रें पाठविलीं तीं दशमीस शुक्रवारीं पावलीं. वृत्त सादंत कळलें. सय्यद लष्करखान याचे कबिलेयांचा[20] मजकूर लिहिला तो कळला. ऐसियास सय्यद लष्करखान सलाबतजंग याजपासून निरोप घेऊन आमचे भेटीस येत आहेत. तरि शहराकडे न जातां आमचे भेटीस आले तर उत्तम आहे. कदाचित् त्यांणीं आपले चित्तांमध्यें आणिलें असेल कीं, मराठे सरदार आहेत, त्यांस आपण समागमें घेऊन शहरास जाऊन शहरचा बंदोबस्त करूं. असें ह्मणतील तरि आह्मी या प्रमाणें त्यास करूं देणार नाहीं. व शहरास ही जाऊं देणार नाहीं. ते परभारें उपद्वीप[21] करून शहरास गेले ह्मणजे त्यांचे कबिल्यास काय चिंता आहे ? सुखरूप शहरामध्यें असावे. नाहीं तर त्याचें आमचे सौरस्य व घरोबा आहे त्या रीतीनें ह्मटलें तर त्यांचे कबीलें ठेवावयास एखादें मैतिबर[22] स्थल देऊन ठेऊं. चिंता काय आहे ? गुदस्तां सैय्यद लष्करखान त्याचे चित्तामध्यें रामदासपंताचे वर्तणुकें करून विपर्यास होताच, परंतु यंदा रामदासपंत वारल्यियावर सलाबतजंग याचा पक्ष धरिला आहे; तरि तुह्मीं सय्यद लष्करखान याजला बहुत प्रकारें लिहून पाठवून तो ग्याजुदीखान याजकडे संदर्भ लावीत, आमचे विचारा प्रमाणें वर्तत, ते गोष्ट करणें. ये समयीं खानांनी आमचे विचारें न वर्तल्यास तिळमात्र आमचा व खानाचा स्नेह राहत नाहीं, असा भाव तुह्मी दाखविणें खान हजारदां आह्मांशीं ग्याजुदीखानाचा प्रकार बोलले असतां रामदासपंत मेले ह्मणून आयते वेळेस फिरले तर हें कसें कामास येईल ? यांचा स्नेह परलोकीं कामाचा नाहीं. हे विनंति.

---

श्री.

वेदशास्त्रसंपन्न राजश्री दीक्षित[23] बावा स्वामीचे सेवेशीं.

---

२०. कबिला=कुटुंब, माणसें.

२१. [?] उपद्रव?

२२. मातबर=बळकट.

२३. हे दीक्षित नारायण भट्ट पाटणकर हे होत. हे पुढें काशीस जाऊन राहिले.

विद्यार्थी **बाजीराव बल्लाळ प्रधान** साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ स्वामीचे आशीर्वादें करून यथास्थित असो विशेष. मौजे **रांजणगांव** पो मजकूर हा गांव खासगत मुकासा आहे तो राजश्री **बाबूराव मल्हार** यास दिला आहे. त्यास राजश्री **मानाजी जाधव** याजपासून चिरंजीव **राजश्री चिमणाजी** यांणीं बाकीचे ऐवजीं पैका घेतला त्यास दरम्यान तुह्मींच आहां. तुह्मीं आपले हातें कारभार विल्हेस लाविला आहे. हल्लीं मौजे मजकुरासि वगैरे गांवासि कटकट करणार ह्मणून कळलें. स्वामींनीं दरम्यान होऊन त्याजकडील कारभार चिरंजीवापासून फैसल करून घेतला असतां हल्लीं ते कटकट करणार. ही गोष्ट उत्तम आहेशी नाहीं. स्वामींनीं त्यास माकूल [?] करून सांगणें ते रीतीनें सांगावें आणि मौजे मजकुरास कटकट न करितां अंमल सुरळीत चालेल तें करावें. अगोदर स्वामीस लिहिलें असावें यास्तव लिहिलें आहे. तरि त्यास फजित करावयाचें तें करून मौजे मजकुराचे वाटेस न जात तें करणें. लोभ असों दिजे हे विनंती.

स॰ ॥ अस्सल पत्र डुबेरकर बर्वे यांजपाशीं आहे.

---

श्री

वेद-शास्त्रसंपन्न राजश्री **वासुदेव दीक्षित** स्वामींचे सेवेशीं.

विद्यार्थी **चिमणाजी बल्लाळ** साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशल ता। मार्गशीष शुद्ध पंचमी जाणून स्वकीय लिहीत गेले पाहिजे. विशेष. वेदशास्त्र संपन्न राजश्री **नारायण दीक्षित** यांस रुपये १५००० पंधरा हजार राजेश्री **लक्ष्मण शंकर** यांजकडून देवविले आहेत. मशारनिल्हे प्रांत **बुंदेलखंड** येथें गेलियावर वसुल करून **दीक्षितां**कडे श्रीस पावते करतील. तुह्मांस कळावें ह्मणोन लिहिलें असे. बहुत काय लिहिणें लोभ असों दिजे हे विनंती.

मार्गशीर्ष वद्य २ शके १६६२ रौद्रनामसंवत्सरें.

---

श्री

तीर्थरूप वेद-शास्त्रसंपन्न राजश्री **दीक्षित** स्वामी वडिलांचे सेवेशीं.

अपत्य **चिमणाजी बल्लाळ** व **बाळाजी बाजीराव** कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथील क्षेम आश्वीन वा ९ मुक्काम कसबे **पुणें**. स्वामींच्या कृपेंकरून यथास्थित असे विशेष—स्वामींनीं ज्येष्ठ शुद्ध १० चें पत्र पाठविलें तें पावलें. सविस्तर अर्थ कळला. सारांश स्वामींचे आशीर्वादाचा सर्व आमचा विचार आहे. स्वामींच्या आशीर्वादा पेक्षां दुसरें दैवत जाणत नाहीं.

संसर्गदोषाचा परिहार करावा. याविशीं आज्ञा लिहिली तर अवश्यक स्वामींचे आज्ञे प्रमाणें वर्तणूक करूं.

कोणी मंत्रशास्त्री भेटतील आणि कांहीं अनुष्ठान करा ह्मणतील तर ते गोष्ट न करणें, कोणाचा मंत्र न घेणें, शिवपूजन व विष्णुपूजन व गायत्रीचा जप व वेदोक्त अनुष्ठानें करीत जाणें, ह्मणून लिहिलें; तर आज्ञे प्रमाणेंच करीत जाऊं. स्वधर्मे करून आचरण करणें, कोणी दुराचरण असतील त्यांस शासन करावें ह्मणून लिहिलें; त्यास अवश्यमेव लिहिल्या प्रमाणेंच वर्तणूक करूं.

रायांचे[1] वैभवाची वृद्धी व्हावी यास्तव आपण बहुत श्रम आज पावेतों केले, पुढें जोंपर्यंत आपण आहे तोंपर्यंत तुमच्या कल्याणास्तव श्रम करावयास अनुमान न करूं ह्मणून लिहिलें; तर राऊ स्वामींस मातापित्रांचेठायीं मानीत होते, त्यांच्या कल्याणास्तव स्वामींनीं श्रम केले तर ते गोष्टीचें अपूर्व काय आहे ? बालकाचें कल्याण इच्छावें हें मातापितरांस सांगावें लागतेंसें नाहीं. पुढें ही आह्मी लेंकरें स्वामींचीं आहों. आमचें कल्याण व आमची बुद्धि उत्तम कर्मांच्या ठायीं दिवसेंदिवस [लागून] यशाची अभिवृद्धि होय, ऐसा आशीर्वाद स्वामी देतीलच, व देवाची प्रार्थना करतीलच यांत संशय नाहीं

राजश्री लक्ष्मण शंकर, बुंदेलखंडांतील, त्यांचे हातून स्वामींकडे खर्चास रवाना करवितों. तो ऐवज स्वामींपाशीं पावता होईल, तो घेऊन उत्तर त्यांजपाशीं द्यावें. ऐवजाचा अंगीकार करावा. माघारा सर्वथा पाठवूं नये.

अकरा कावडी रामेश्वरास पाठवाव्या ह्मणून आज्ञा लिहिली; ऐशियास स्वामींनीं तेथें ब्राह्मण योजून* तेथूनच कावडी अकरा रामेश्वरास रवाना कराव्या. त्यास पैका पडेल तो लिहून पाठवावा. पाठवून देऊं.

राज्यप्राप्तीकरितां पूर्वीं सत्तावीस लक्ष दूर्वा वाहिल्या आहेत. बाकी त्र्याहात्तर लक्ष राहिल्या आहेत त्याचा विध राजश्री वासुदेव दीक्षितांस[3] ठावका आहे. तेविशीं त्यांस सांगितलें असे. ते दूर्वा देवास वाहतील.

चिरंजीव नानांस[4] आमची आज्ञा मान्य असें असेल तर, त्यांचे पत्र आज

---

१. रायाचें = रावाचें = बाजीरावाचें. बाजीरावास या पत्रांमध्यें पुष्कळ ठिकाणीं राया, राऊ किंवा राव असें ह्मटलेलें आढळतें.

* म्ह॰ काशीहून.

२. पृ॰ ८ पत्र २ पहा.

३ हे नारायण दीक्षित यांचे चिरंजीव. नारायण दीक्षित काशीस गेल्यानंतर वासुदेव दीक्षित हे दक्षिणेंत संस्थानचे मालक झाले.

४. बाळाजी बाजीराव.

पावेतों आह्मास आलें नाहीं त्यांचें पत्र आलियावर त्यास पत्र पाठवीत जाऊं, ह्मणून लिहिलें ; तर आज पावेतों रायांनीं स्वामीचे आज्ञेचें उल्लंघन न केलें. व आह्मांस स्वामींचे आज्ञेहून दुसरें दैवत नाहीं. तोच विचार चिरंजीव नानाचा आहे. स्वामींची आज्ञा म्हणजे केवळ दैवत असेंच मानून वर्तणूक करितील. सांप्रत त्यांच्या आमच्या नांवाचें एकच विनंतिपत्र लिहिलें आहे. स्वामींनीं त्यांस आम्हांस एकच आशीर्वाद-पत्र पाठविलें तरी कार्यास येईल. चिरंजीव नानाचा आमचा काडी इतका दुसरा विचार आहे असें नाहीं.

आजपावेतों जालें तें जालें, पत्र दिलें होतें तें फिरोन घेतलें, पुढें नवें जें प्राप्त होत जाईल त्याचा दुहोत्रा घेत जावा म्हणोन लिहिलें ; तर दुहोत्राचा करार करावा असें काय आहे ? सारांश मीळ-जोड स्वामींच्या आशीर्वादें होईल. वरकड स्वामींची सेवा जे प्रकारें करणें ते प्रकारें करण्यास अंतर सर्वथा होणार नाहीं.

सारांश स्वामींचे आज्ञेचें उल्लंघन केल्यास कोण उत्तम फल पावेल ? आह्मांस तो स्वामी वेगळें दुसरें दैवतच नाहीं. हेच बुद्धि वडिलांचे आशीर्वादेंकरून स्थिर राहील हा सिद्धांत आहे. तेणेंकरून सर्व उत्तमच होईल. यांत संशय नाहीं. कृपा पाहिजे. हे विज्ञापना.

---

[ १२ ] श्री

वेदशास्त्र-संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं :—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय लेखन करीत असलें पाहिजे. विशेष—काल तुम्हीं गेलेस [ त ? ] त्यास तुमची त्यांची बोलीचाली होऊन काय मजकूर जाला, हें तुह्मांकडून कांहींच लिहून न आलें यास्तव आजि येथें मुक्काम करून हें पत्र तुह्मांस लिहिलें असे ; तर त्याचा जाबसाल घेऊन बोली ठीक जाली असली तर तुम्हींच लौकर येणें, अथवा काय मजकूर जाला असेल तो लिहून पाठविणें त्यासारखा विचार केला पाहिजे. आजि रात्रौ तुमचें कांहीं

५. या मजकुरावरून हें पत्र बाजीराव मरण पावल्या नंतर लौकरच लिहिलें असावें. याजवर चिमाजी आपाही लौकरच कैलासवासी झाले.

६. दीक्षित यांजकडून पेशव्यांनीं कांहीं ऐवज कर्जाऊ घेतला असावा असें याजवरून दिसतें.

तरी लिहिलें यावें. परंतु न आलें यास्तव मुक्काम केला. आतां पत्राचें उत्तर सत्वर पाठवणें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

पौ माघ शुद्ध ४ रविवार शके १६७२.

---

[ १३ ] श्री

वेदशास्त्र-संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीः—

विद्यार्थी बाळाजी बाजीराऊ प्रधान कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती येथिल क्षेम ता। आषाड वद्य १३ पावेतों यथास्थित असे विशेष—आपण पत्र पाठविलें तें पावलें. दरगाह कुलीखान याजविशीं कित्येक प्रकार लिहिले व गाजुदीखान व राजश्री मल्हारराव होळकर व राजश्री जयाजी शिंदे यांस पत्रें लिहून पाठवावीं ह्मणून लिहिलें; तरि येविशीं पूर्वी आपण पत्र लिहून पाठविलें होतें त्यावरून पूर्वीच पत्रें लेहून पाठविलीं आहेत. तुह्मींही गुप्त प्रकारें सरदारांस पत्र लिहिणें. जे जे ये समयीं चाकरी करून दाखवितील त्यांचें बरेंच होईल यांत संशय नाहीं. आपण याचअन्वये निशा[९] करावी. भागानगराकडील[१०] आपण वर्तमान लिहिलें. पुढेंही जरूर तिकडील अंतर्बाह्य ठिकाणीं लावून त्वरेनें पावते करावें. हे दिवस कामाचे फार आहेत. व नर्मदा गाजुदीखान उतरले किंवा नाहीं, हेंही जलद लिहावें. कोण इकडे तिकडे हें मनास[११] आणून लिहीत असावें. बहुत काय लिहिणें हे विनंती.

पौ आषा० श्रावण शुद्ध १ शके १६७४.

---

[ १४ ] श्री

वेदशास्त्र-संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं:—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान—साष्टांग नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ तागाईत पौष बहुल[१२] पंचमी गुरुवारपर्यंत स्वामींचे आशिर्वादें

---

७. हें पत्र कोणत्या कामाच्या संबंधें लिहिलें हें नीट समजत नाहीं.

८. निजाम उल्मुल्काचा ज्येष्ठ पुत्र जो गाजुदीखान यास हैदराबादची गादी मिळवून देण्याच्या मसलतीस अनुलक्षून हें पत्र आहे.

९. निशा = खात्री, खातरजमा.

१०. भागानगर = हैदराबाद.

११. हें मनास आणून = याजवर लक्ष ठेवून.

१२. बहुल = कृष्ण, वद्य.

करून यथास्थित जाणोन स्वकीय लिहीत असलें पाहिजे. विशेष—आपणांकडून बहुत दिवस पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरि सविस्तर लिहीत जावें. इकडील वर्तमान तर नबाबांनीं[१३] फिरंगी[१४] याच्या विद्यमानें आह्मांशीं सल्ला केला. हें दुःख सर्वां अमिरांस होऊन बिघाड करावा हे इच्छा करितात. परंतु जीव कोणांत आहे? सर्वही निर्माल्य! पदरचा पैका वेंचावा, जातीनें हिंमत धरून करावेंच करावें, हे गोष्ट काळें करून कोणांतही राहिली नाहीं. खान आदिकरून सर्व[१५] * * * * *

बाबुजी[१६] नाईक सातारियास जाऊन आईसाहेबांचे[१७] विचारांत मिळाले. आमचा अपकर्ष इच्छितात. उपद्व्याप करितात. आमच्या सरदारांकडे येऊन, बुद्धिभेद करून त्यास सातारियास न्यावें, या विचारियास आले होते. परंतु सरदार गेले नाहीं. नाईक माघारे गेले. असो. नाईकांचेविशीं आमचे चित्तांत तो कांहीं नवतें. असो, त्यांहीं होऊन गडबड मांडिली आहे. ते आपले कर्मानुरूप फळ पावतील. वरकड आईसाहेबांचा विचार तरि आमचे न्यून पहातात. सरदाराशीं भेदभाद करितात. मोंगलाईंत राजकारणें करितात. कोणें प्रकारें आमचें वाईट व्हावें, या विचारांत आहेत. ईश्वरच आमच्या बऱ्यावर असल्यास त्यांणीं वाईट इच्छून होणें काय? व वरकडांनीं पांचपेंच करून होणें काय? चिरंजीव रा। दादास फौजेनिशीं गुजराथेस रवाना केलें ते गंगातीरांनींच[१८] गेले असतील. तिकडील मुलकाचा बंदोबस्त करून पुढें जातील. आह्मी ह र प न व ली [?] समीप पावलों. श्रीरंगपट्टण, सोंदे, बिदरूकी [हीं] स्थळें पैकियाचीं[१९] आहेत. एकाएकीं भलती गोष्ट आम्ही करीत नाहीं. कां कीं मागील पेंचपांच बहुत आहेत. मागील अर्थ पाहून जसजसा विचार करणें तसा करितों. आपले

१३. नवाब = सलाबतजंग.

१४. फिरंगी = फ्रेंच सरदार बसी. बुसीचें हैदराबादचे दरबारांत फार प्राबल्य असे.

१५. येथें मूळांत सुमारें दीड ओळ मजकुराची जागा कोरी टाकिलेली आहे.

१६. बारामतीकर. हे पेशव्यांचे नातलग असून धनकोही होते. बाजीराव मरणपावल्यावर बाबुजी नाइकास पेशवाई द्यावी अशी रघुजी भोसल्यानें शाहूच्या दरबारीं बरीच खटपट केली, परंतु ती सिद्धीस गेली नाहीं. तेव्हांपासून नाईक व भोसला हे दोघे ही बाळाजीचा द्वेष विशेष करूं लागले.

१७ आईसाहेब = ताराबाई. शाहू वारल्यानंतर हिचा नातू रामराजा साताऱ्या गादीवर बसला. परंत बाई मोठी खबरदार बायको असल्यामुळें स्वतां राज्यकारभार पाहवा व पेशव्यांची सत्ता काढून टाकावी ह्मणून तिणें बरीच ढवळाढवळ केली. ह्या गोष्टीस उद्देशून वरील लेख आहे.

१८. गंगा = गोदावरी. ही दादांची सन १७५३।५४ मधील स्वारी असावी.

१९. यावरून हें पत्र कर्नाटकीं स्वारीस गेले असतां लिहिलें असें होतें.

आशीरवादें करून सर्व शत्रु शमता पावोन जो लाभ होणें तो होईल. चिंता नाहीं. स्वामींनीं तिकडील वर्तमान निरंतर लिहीत जावें. यथार्थ वर्तमान व अति-विशेष अनहितकारी जें असेल तें जरूर ल्याहावें, व चिरंजीव दादासही ल्याहावें. सर्व स्वामींचे आशीरवादें नीटच होईल. आपणही तनविजीनें संभाळीत जावें. छ० १९ रबिलावल हे विनंती.

पौ माघ वद्य १३ शुक्रवार शके १६७४ अंगिरानामसंवत्सरे.

---

[ १५ ] श्री

वो। राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराऊ प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असावें. विशेष. आह्मीं करनाटक कचेश्वरींहून ज्येष्ठ शुद्ध १३ पूर्णियास आलों. आपण श्रीहून कधीं आला तें वर्तमान लिहिलें नाहीं. चिरंजीव राजश्री दादाकडील शहरीं व आपली बातमी काय आली असेल ती व सलाबतजंग कोठे आहेत, कोणीकडे जाणार व दिल्लीकडील वर्तमान, येणेंप्रमाणें सविस्तर लिहून पाठवावीं. कृपा-पत्र न आलें असें नसावें हे विनंती.

पौ ज्येष्ठ वद्य ७ बुधवार शके १६७६.

---

[ १६ ] श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक नमस्कार विनंती उपरि येकुशल लिहित गेलें पाहिजे. विशेष आपल्या भेटीस बहुत दिवस जाले. भेटीची इच्छा आहे. आह्मी टोंक्याचे रोहोकें येतों. आपणही तेथें आलें पाहिजे. येतेसमयीं सैद लष्करखान याचे दिवाण राजश्री मल्हारपंत यासही समागमें घेऊन आलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे विनंती.

पौ फाल्गुन वद्य १ गुरूवार शके १६७६ भावनाम.

---

[ १७ ] श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक नमस्कार विनंती उपरी

येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे. विशेष जीवनराव केशव या समागमें खानांनीं सांगून पाठविलें आहे मुस्सा बुस्सी आदिकरून सर्वही येथील अमीर आमची आरजू करितात. कारभार करावा ह्मणोन इच्छितात. एक आपली मर्जी असल्या हें कार्य करूं. त्यांस हैदरजंग व मुस्सा बुस्सी यांस पत्रें पाठवावीं कीं, खानास वकील किंवा कारभार सांगावा. ऐशास जीवनराव परशराम महादेव यांचे निसबतीचे शाहाजवानखानाशीं केवळ ममतेंत. यांशीं खान या गोष्टी कशा बोलतील हा संदेह प्राप्त जाहाला. यास्तव आपणास लिहिलें असे. तरि खानाशीं हा मजकूर तजविजीनें करून या गोष्टीचा शोध बारकाईनें घ्यावा. व लेहून पाठवावें. तेणेंप्रमाणें येथें करणें तें केली जाईल. त ह कीं मस ल [?] अर्थ जरूर लिहून पाठवावे. बहुत काय लिहिणें हे विनंती—

पौ ज्येष्ठ शुद्ध १५ सोमवार शके १६७७.

---

[ १८ ] श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं——

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेन नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत गेलें पाहिजे. विशेष सैद लष्कर खान याचे मजकुराचीं पत्रें नबाब सलाबतजंग मुस्सा बुस्सी व शाहाजवानखान यांस पाठविली होतीं त्यांचीं उत्तरें आलीं. त्याच्या नकला पाठविल्या आहेत. त्या पहाव्या व खानास ही दाखवाव्या. उत्तर कोणें प्रकारें पाठवावें हें पुसून लिहून पाठवावें. व खानास पत्र लिहिलें आहे, तें प्रविष्ट करावें. खानाचे साहित्याविशीं मुस्सा बुस्सीस पत्रें पाठवावीं, तेथें सर्व यास अनकुल आहेत ह्मणोन लिहिलें; ऐशियास खानाविशीं मनापासून अंतस्थ सर्व प्रकारें साहित्य पत्रें व बोलणें होत आहे. परंतु सांप्रत पत्रें आलीं तीं पाठविलीं पुढें ज्याप्रकारें तुम्हीं तजवीज योजून ल्याहाल त्या प्रकारें लिहून पाठऊं. चित्त शुद्ध सत्य भाषण तेथें याविशीं नाहींचसें दिसतें. परशरामपंतही नीट नाहींत ह्मणोन लिहिलें तेंही यथार्थच आहे. परंतु सांप्रत परशराम महादेव हा हुजूर येत आहेत. सांप्रतचा फिरंगी याचा भाव खरास्वरा कसा खानाविशीं आहे ?

पौ श्रावण वद्य १० शके १६७७ युवनाम संवत्सरे

---

[ १९ ] श्री

वेदमूर्ती वासुदेव दीक्षित स्वामीचे सेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती. येथील वर्तमान नारायणभट सांगतील. राजाजी स्वभावें कुटील बोलतात. तो भरंवसा येत नाहीं. भेट इमान सर्व विध जालें. परंतु परिणाम कठीण दिसतो. पांचा लक्षांची जागीर द्यावयाचा करार जाला. देतील तेव्हां खरें. त्यांणीं जागीर दिली, दाभाडियांचा आभिमान सोडिला, तर आह्मी लिंबक देऊं. सारांश दैवी मानवी रीतीनें पाहतां काल कठीण आहे. सर्व स्वामीचे आशीर्वादें उत्तम होईल. पत्र पाठवीत जावें. जर जा ल [ ? ] सलूख शेवटास गेला तर येथून कूच होईल. आपण भेटीस यावें. कृपा केली पाहिजे. हे विनंती.

फेरिस्त नंबर २४८.

---

[ २० ] श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव नमस्कार विनंती उपरि येथील वर्तमान तागाईत आश्वीन वद्य प्रतिपदा पावेतों स्वामीचे कृपें करून सुखरूप.

सविस्तर अर्थ मीं सेवेशीं विदीत केला होता. राजश्री स्वामींचीही मर्जीच राखून आलों. जशी आज्ञा केली त्याप्रमाणें मान्य करून पुढें स्वामींचिच आशीरवादें परंपार पाऊं. विस्तार ल्याहावा ऐसा काय आहे ? सारांश स्वामींचीं लेंकरें आहों. आपलेच आशीरवादें सर्वहो उत्तम होईल. वरकड लिहितां विस्तारस्य आहे. यास्तव उभयतां वेदमूर्ती निवेदन करितां विदित होईल. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

[ २१ ] श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री गोविंद दीक्षित स्वामींचे सेवेशीं—

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान साष्टांग नमस्कार. विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जावें. विशेष तुह्मापासून सरकारांत कर्ज घेतले मुद्दल रुपये ५०००० पन्नास हजार यांचें व्याज दरमहा दरसदे रुपया १ एकोत्रा बिनसूट प्रमाणें करार केलें असे. जाले मुदतीचें व्याज व मुद्दल हिशेब करून देऊं. मिती माघ वद्य १ प्रतिपदा शाके १६९२

विक्रम नामसंवत्सरे रा। छद्र २६ जमादिलाखर सुा। इहिदे सीतैन मया व अल्लफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

[ २२ ]

श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री गोविंद दीक्षित स्वामींचे सेवेशीं —

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत असलें पाहिजे. विशेष तुह्मांपासून कर्ज घेतले मुद्दल रुपये २५००० पंचवीस हजार. यांस व्याज दरमहा दरसदे रुपया १ बिनसूट प्रमाणें करार केला असे. जाहाले मुदतीचे व्याज व मुद्दल हिशेब करून एका महिन्यानें ऐवज पावता करूं. जाणिजे. छ. ६ सवाल वैशाख शुद्ध ८ अष्टमी शके १६८३ वृषानाम संवत्सरे सुा। इहिदे सीतैन मया व अल्लफ हे विनंती.

---

[ २३ ]

॥ श्री ॥

वेदमूर्ती राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे शेवेशीं —

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार. विनंती. आपलें पत्र बहुत दिवस येत नाहीं. मागें सरदारांस पत्रें गेलीं त्याचा जाब आला असला तर पाठवा. व तिकडील भाव कर्तव्य जरूर ल्याहावें. मागें आपण लिहिलें तें आह्मीं संदिग्ध मानिलें. अखेर आपण लिहिलें तें जाहालें. या उपरही वर्तमान असलेलें तें लिहीत असावें. मंगळवार तिसरा प्रहर हे विनंती.

फेरिस्त नंबर ५५६.

---

[ २४ ]

॥ श्री ॥

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेसी——

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत असले पाहिजे. विशेष, आलीकडे आपणांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं तरी ऐसें नसावें. सदैव आपणांकडील वर्तमान लिहीत जावें. आपला व खानचा स्नेह व राबता बराच आहे. व जे हो[?] मुत्सदी यांचा स्नेह व राबता असेलच. नवाब बाहेर निघाले. पुढें म-

नसुवा काय करणार, तें अंतर्बाह्य वर्तमान सर्वही आपणास कळतच असेल. तर सर्वदा लिहीत जावें. कळावें. आमचें पत्र येईल तेव्हांच उत्तर पाठवावें, असा अर्थ चित्तांत आणितां, नंतर वर्तमान लिहितां. [ तर ] आळस न करावा. बहुत दिवस पत्र येत नाहीं असें नसावें. हे विनंती.

---

[ २५ ]

श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री नारायण दीक्षित पाटणकर स्वामींचे सेवेशीं--

विद्यार्थी बाळाजी बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती येथील कुशल ता। छ १४ रविलावल जाणोन स्वकीय लेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. विशेष स्वामीनें मथुरे सन्निध धर्मकृत्यास दहा गांव मागितले. त्यास तेथें आपला अंमल बैसला ह्मणजे दहा गांव तुह्मीं मागाल ते इनाम करून देऊं. सुरू सितसलासेन मया व अलफ. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

[ २६ ]

श्री

सहस्त्रायु चिरंजीव विजयीभव राजमान्य राजश्री बाळाजी बाजीराव प्रधान यांप्रति श्री वाराणशीहून नारायण दीक्षित अनेक आशीर्वाद उपरी येथील क्षेम मार्गशीर्ष वद्य १३ जाणोन समस्त सुखरूप असों विशेष. तुमचें पत्र आलें. पावोन बहुत समाधान जालें. विशेष. तुमची व चिरंजीव वासुदेव दीक्षितांची भेट जाली. हें वर्तमान दीक्षितांहीं लिहिलें जे, " बहुत सन्मान केला. घाटाखालून पुढें मनुष्य पाठवून बलावून सर्व सविस्तर वर्तमान सांगितलें. बहुत सत्कार केला." तरि [ यांत ] अपूर्व काय आहे! हें तुह्मांस योग्यच आहे. न कराल तर अपूर्व!

यानंतर ऐकितों कीं जे सर्वांस क्रोधें आहांत. तर ते सर्व तुमच्या वडिलांपासून सोभतीस आहेत. त्यांचा अन्याय जाला [ तर ] तुह्मीं क्षमा करावी हें तुह्मां योग्यच आहे. बहुतसा अतिशय न करावा.

यानंतर तुमच्याविषयीं आपण जे ईश्वराची प्रार्थना करायाची ते करीतच आहों. तुह्मीं ह्मणाल जे लोभमुळें करितात तर ईश्वर जाणे. कैलासवासी बाळाजीपंतांपासून आमचें त्यांचें चालत आलें. आणखी आमच्या वचनाचा विश्वास असे. त्यापेक्षां तुमचे तीर्थरूपांची निष्ठा उभयतांच्या आमच्या स्थळीं

---

२०. बाळाजी विश्वनाथ.

असे, जे तीर्थरूपासारखे मानीत असत. आह्मीं क्रोधें करून नाना प्रकारें रागीजोन पत्रें लिहीत असों. परंतु त्यांस क्रोध तिलमात्र येत नसे. आणखी आपणही त्याजकरितां श्रम केले ते ईश्वर जाणे. त्यापेक्षां तुमचें उत्कृष्ट नांव व्हावें ऐसा ईश्वरें आह्मास दृष्टांत जाला आहे. परंतु तुह्मीं कारभाराविषयीं अत्यंत सावध रहाणें. कोणे गोष्टीची चिंता न करणें. तुमच्या पित्याच्या स्थळीं ममता होती त्यापेक्षां तुह्मांवर अधिक आहे. बरें. हेच ईश्वराजवळ प्रार्थना करितों जे यांचें उत्कृष्ठ चालो. आणखी काय लिहावें ?

यानंतर आमच्या सोबतीस दहा वर्षें रामाजी केशव[२१] आहे. आमचा म्हणवितों. त्यास खानदेशचे महाल पहिले कोणी न करी तेव्हां आह्मी या ब्राह्मणास देवविले. त्यास पांच साहा वर्षे चालत होते. त्यास एका महापुरुषानें आपलें पुण्य खर्चून मामला काढिला. त्यास दोन तीन वर्षें तो ब्राह्मण आमच्याच आशेनें राहिला आहे. यंदा तुह्मीं देणारच होतां हें दीक्षितांहीं आह्मांस लिहिलें होतें. त्यास आतां गतवर्षीं ज्यास महाल होते त्याणें चढविला, परंतु तोटा आला. त्याजवर आपांहीं त्यांस वीस सहस्र सूट दिल्ही असतां यंदा सोळा सहस्र चढकरून मामला त्याणें केला. बरें तुमचें कार्य जाहालें. तें हे आह्मांस समाधानच आहे. परंतु तेच महाल एक वेळ त्या ब्राह्मणास करून द्यावे, हा हेत आमचा आहे याकरितां लिहिलें असे. सुज्ञाप्रति बहुत काय लिहिणें ? येथें वैशाखमासीं पंचपक्कान्नाचें लक्ष भोजन करावयाचा प्रारंभ करून मग कार्तिकमासापर्यंत वाचलों तर एकवेळ त्या प्रांतास सिंहस्थास गोदा स्नानकरून, उत्तम लक्ष भोजन गोदातिरीं करून, सर्वांच्या भेटी घेऊन यावें. दर्शनानंतर सर्व विदित होईल. हे आशीर्वाद.

---

[ २७ ] श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं:—

विद्यार्थी रघुनाथ बाजीराव नमस्कार. विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित गेलें पाहिजे. विशेष. कलमें येणें प्रो–

कैलासवासी रावयांनीं कैलासवासी तीर्थरूप नाना दीक्षित यांस प्रांत मथुरा सुटल्यावर दाहा गांव देऊं केले आहेत[२२] ते हल्लीं देवावे ह्मणोन तुह्मीं विदित

---

२१. हे शिफारस केलेले रामजी केशव कोण ?

२२. वर पत्र [ २५ ] पहा.

केलें. ऐशास तीर्थरूपांनीं थोरले दीक्षितांस लेहून दिल्हे आहे त्याप्रो प्रांा मथुरा हस्तगत जाल्यावर दाहा गांव नेमून देऊं. १

प्रांा गुजराथ आपणाकडे जाली आहे थोरले दीक्षितांचे दैवत श्रीकृष्ण द्वारका क्षेत्र आपणाकडे जालें आहे. तेथें शंभर ब्राह्मण भोजन नित्य घालावें ऐसें चित्तांत आहे. त्याचे खर्चास त्या प्रांतीं गांव नेमून द्यावे ह्मणोन तुम्हीं विदित केलें. ऐशास आह्मीं पुणेयास आलियावर पांच हाजाराचें गांव वसुली सरकारांतून नेमून देऊं. १

येणेंप्रमाणें दोन कलमें करार केलीं असत. सदरहू प्रो होतील. रा छ० २९ जमादिलावल सुमा अर्बा खमसेन मया व अल्लफ. बहुत काय लिहिणें. हे विनंती.

---

[ २८ ] ॥ श्री ॥

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामींचे सेवेशीं—

विद्यार्थी रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेष स्वामींनीं आशीर्वाद पत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहालें. लिहिला अर्थ सर्व कळला. तीर्थस्वरूप राजश्री नानासाहेबीं पत्रें आपणाकडे रवाना केलीं तें पण अजुरदार[२३] कौसिदा[२४] हरी आम्हांकडे पाठविलीं तें पावोन लेखन अर्थ कळला. त्याचीं प्रत्योतर लेहून पाठविलीं आहेत. तीर्थरूपांकडे रवाना करावीं. आपल्याकडील वर्तमान वरचे वरि लिहीत जावें. छ २१ जमादिलावल. बाबुजी नाइकांकडील वर्तमान लिहिलें तें कळलें. सर्वदा वर्तमान लिहीत जावें. येथील वर्तमान तर अहमदाबाद[२५] झुजत आहे. आपल्या आशीर्वादें लौकरच येईल. हे विनंती. काशिदास कांहीं दिलें नाहीं हे विनंती.

पो. छ १३ जमादिलाखर सन ११६२ चैत्र शु॥ १५ मंगळवार.

---

[ २९ ] श्री

श्रीमंत वेदशास्त्र राजश्री बाबा दीक्षित स्वामींचे सेवेशीं—

आज्ञा धारक खंडोजी अरगडे दंडवत विनंती विज्ञापना ऐशीजे येथील कुशळ तागाईत छ. ५ माहे शाबान मुक्काम बुंदी कोट जाणोन

---

२३. अजुरदार = मजूर भाडेकरी.

२४ काशिदा, कासिद = जासूद, हरकारा.

२५. सन इ० १७५३ सालीं वेढा घालून अहमदाबाद शहर रघुनाथरावांनीं सर केलें.

लेखनाज्ञा केली पाहिजे. याजवर इकडील वर्तमान तर खिचीचे[२६] निम्मे मुलुख घेऊन व बुंदी कोटियाचे अद्याप चुकलें[२७] नाहीं. एका दोन रोजांत चुकणार. दहा बारा लक्ष पर्यंत चुकणार आहे. बुंदीवर मुक्काम आहे. पुढें जाटाचे मुलखांत जाणें आहे. जाट हि स ल पुरावर. त्याजवर गोपाळराव बर्वे आहेत पुढें बिनीस यांचीच फौज आहे. पुढें जयनगराचे सुमारें आमची फौज जाणार आहे. जयनगर [ व ] हे एकत्र होऊन जाणार आहे. जाटाचें पारपत्य करूं ऐसें ह्मणतात. रा। तुकोजी होळकर हे समागमेंच आहेत. यांची त्यांची भेटी कु र ई वर झाली. शिंदे तो उदेपुरास होते. इकडे येणार आहेत. आठा पंधरा दिवसां एक होतील. प्रागैर्कर[२८] अली गौवर पथाव्याचीं [ ? ] पत्रें आलीं आहेत. ते व उमरावगीर गोसावी यांचीं पत्रें आलीं आहेत कीं, "तुह्मीं आह्मीं मिळून जाटाचें पारपत्य करून घेऊं." त्यास माधोसिंगाचा[२९] पुत्र ह्मणतो कीं, "तुह्मीं जाटाचें पारपत्य करावें. तुह्मांस पन्नास लक्ष रुपये देऊं. 'तुह्मीं व शिंदे होळकर मिळोन वाटून घेणें." उदेपुराची मामलत चुकली आहे. पुढें जाटाचे तोंडावर राजश्री शिवाजी[३०] विठ्ठल व गंगाधर गोविंद आहेत. बाळाजी गोविंदें[३१] यांची मामलत चुकली. राजश्री विश्वासराव झांशीकर पुण्यास आले आहेत त्यांची मा व क[!] फसली आहे. रा॰ गोविंद शामराव गौर किल्लीं आहेत. कळलें पाहिजे. या प्रांतीचें वर्तमान तर स्वामींस विदितच असेल. चंबेल उतरून पार झालों आहों. आठा पंधरा रोजांत जाटाची गांठ पडेल. जयनगरास जात आहों. इकडे मागाहून शिंदे येणार आहेत. एकत्र होऊन जाटावर जाणार. स्वामींस कळलें पाहिजे. आमचीं मुलें माणसें स्वामीच्या आज्ञेंत केलीं आहेत. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

---

[ ३० ] ॥ श्री ॥ पै॰ पौष व॰ ८ गुरुवार.

श्रीमंत वेदशास्त्र संपन्न बाबा दीक्षित मौजे कायगांव प्रांत गांडापूर स्वामींचे सेवेशीं—

'अपत्या समान चरणरज आज्ञाधारक खंडोजी अरगडे मुक्काम चमिली प्रांत बुंदीकोट जाणोन स्वामींचे आशीर्वादें कडून छ॰ ७ माहे शावान उर्फ माह मार्गेश्वर पर्यंत शरीरेंकडून सुखरूप असों विशेष. येथील वर्तमान तर हिंदु-

२६. खेचिवाडा.

२७. चुकलें नाहीं = निकाल झाला नाहीं.

२८. प्रयागकर. शहाअम दुसरा प्रयागास स॰ इ॰ १७७० पर्यंत होता.

२९. माधवसिंग, जयनगरचा राजा.

३०. 'शिदाजी' असेंही होईल.

३१. बाळाजी विठ्ठल [ ? ]

स्थानची फौज येथें स्थित आहे. खेचिवाडा यांत छावणी करून दोन महिने राघोडा वगैरे किल्ले खेचीचे अर्धे घेऊन राजा आपले दस्तांत आणिला. त्याज-पासून कांहीं खंडणी गुदस्तांपैकीं घ्यावी. त्यास राजा [कडून] रा। तुकोजी हो-ळकर यांचे विद्यमानें कांहीं थोडी खंडणी चुकली. त्यांत हल्लीं घोडे व हत्ती दोन असे भरणा करून दिला. बाकी नक्त द्यावे. त्यास समागमेंच तुकोजी बरोबरच आहेत पुढें झाडून खंडणी आलियासि तो आपले मुलखास जाईल. बाकी अरूप किल्ला मोतीबार दिला. त्याजखालें दो लक्षांचीं जमाबंदी आहे. आणि कांहीं तुकोजीकडे किल्ले ठाणें दोन तीन बसले आहेत. वर्षासण खंडणीपैकीं मुलुख दिला आहे कळावें. दुसरें, भुपाळची खंडणी घेतली. पुढें बुंदीकोट येथीलही मामलिय़त रा। तुकोजी होळकर यांचे विद्यमानें चु-कली आहे. शिंदाही आठ पंधरा दिवसांत येऊन पोंचतो. उदेपूरची त्याणें खंडणी साठ लक्ष रुपये घेऊन छावणी केली होती. त्यास श्रीमंतांस दहा वीस लक्ष रुपये हुंडी करून परभारें पाठविली. आपणही लोकांस नालबंदी देऊन आह्मांकडेस येणार आहे. पुढें जाटाचे मुलखांत तीन फौजा शिंदे व होळकर व पेशव्यांची फौज पाऊण लाख स्वार मिळोन जाटावर मोहीम करून, त्याजला जेर करून पैसा मिळवावा ऐसें आहे. आणिक अल्ली गोवर दिल्लीकडील यांचें पत्र आलें कीं, "जाटाचे पारिपत्य करून रुपये पन्नास लक्षपर्यंत मिळवून देईन" असें आहे. पुढें पहावें. जाट हातीं आलियासि फार उत्तम आहे. रा। गोपाळराव बर्वे यांजकडे सबनीशी आहे. त्याजला दो चौं लक्षांची जाहागीर देऊन फौजा नेमल्या आहेत. दहा वीस हजार फौज व पायदळ दहा वीस हजार ऐसे आमचे तोंडावर जाटानें पाठविलें आहे. सुरजमल्ल जाट तो मेला. परंतु त्याचे कारभारी व मूल आहे. दोघे भाऊ एकच होऊन जबर लढाईस उभे राहिले आहेत. कांहीं वकील देखील येत नाहीं. माहे शिमग्यांत फार लढाईचा प्रसंग पडणार आहे. पहावें. ईश्वर कोणास यश अपेश देणार हें न कळे. जयनगरवाला आह्मांस मदत दहा हजार फौजेनिशीं येणार आहे. विठ्ठल शिवदेव त्याचा लेक बापु पहा पांच हजारानिशीं आहे. तिकडे भागीरथीकडून सीख जाटास मदत येणार म्हणोन ऐकण्यांत आलें आहे. पुढें पहावें. इतक्यावर जालियासि अधिक उत्तर वर्तमान लिहून पाठऊं. परंतु तुह्मी तिकडील वरचेवर आ-लिया मनुष्याबरोबर पत्रद्वारें तोषवीत गेलें पाहिजे. आमचे संसार सर्व प्रकारें चालविणें तुमचे स्वाधीनच आहे फार काय लिहावें. तो तुह्मांस

आमचेविषयीं सूचना मात्र लिहिली आहे. बहुत काय लिहिणें हे विनंती[३२].

---

[ २१ ] श्री

पौ मार्गशिर्ष शुद्ध १० रविवार शके १६७५

तीर्थस्वरूप राजश्री दादा स्वामी वडिलांचे सेवेशीं

अपत्य बाळकृष्ण दीक्षित साष्टांग नमस्कार विनंती येथील क्षेम ता कार्तिक वद्य २ गुरुवार जाणून स्वकीय कुशल लेखन करावयासि आज्ञा केली पाहिजे. विशेष. काशींतून स्वार होऊन श्रीमंत राजश्री रघुनाथपंत दादांचे भेटीस गेलों. वडिलांचे आशीर्वादें सर्वांशीं ओळखी भेटी जाहाल्या. चाळीस दिवस दिल्लींत होतों. श्रीमंतांनीं बहुत स्नेह कृपा केली. कांहीं मेळवावें म्हणून गेलों नाहीं. उगेंच जावेंसें चित्तांत आलें. दिल्ली शहर पहावें निमित्य गेलों. आपले आशीरवादें सुखरूप घरास आश्वीन शुद्ध १४ सोमवारीं आनंदरूप काशींत पावलों. कळलें पाहिजे. विशेष. वडिलांनीं त्रिंबक नाईक वगैरे यास कर्तव्र सातारियाच्या पादशाही फर्मानाविशीं लिहिलें होतें. त्यात वजिराचे आर्जीवरी दस्तक करून घेतले. त्यास वडिलांनीं जमीन जुमला किती, तनखा काय, परगणा कोण, तें पत्र लिहून दिल्लीस रवाना करावें. व आम्हांस पालखी रा रघुनाथपंत[३३] दादांनीं व मोत्याचा चौकडा एक दिल्हा व तीन हजार रुपयाचा गांव एक दिल्हा व पादशाहाकडून पंधरा हजार रुपयांचे गांव काशीशिव भु दा न वली [?] चंद्रोतीचें आलीकडे नेमून घेतले. वडिलांचे अर्जीवरी दस्तक जाहाले. परवाने तयार एका मासा आलीकडे करून देतों म्हणून निश्चय रा रघुनाथपंत दादांनीं व होळकर यांणीं व वकिलांनीं सर्वांनीं मान्य केलें आहे. या कामासाठीं सिद्धेश्वर महाशद्धे येथें ठेविला आहे. कळलें पाहिजे. विशेष. हरिदास कृपाराम यांचे दुकान गडबडलें. परंतु वडिलांचे आशीर्वादें ठरलें आहे. लोकांचे रुपये देतों. दोन दिवस गडबड आम्ही आलों नवतो तों जाहाली. आतां आनंदरूप आहे. वडिलांच्या जागेची हुंड्या हजारिया बद्दल रुपये साहा हाजार व हरिदास कृपाराम याजबद्दल रुपये चवतीस हजार लादण्या [?] पाठविल्या आहेत. रुपये घेऊन पावलियाचा जाब पाठविला पाहिजे. व

---

३२. हीं अरगडे यांचीं दोन्ही पत्रें इ० सन १७६९—७० सालीं—म्हणजे ज्यावेळीं महादजी शिंदे, विसाजी कृष्ण विनीवाले व तुकोजी होळकर हिंदुस्थान पुनः काबीज करूं लागले त्यावेळीं लिहिलें असें दिसतें.

३३. हें पत्र रघुननाथरावदादा यांनीं दिल्ली सर केली त्यावेळीं लिहिलें असें दिसतें.

मनसारामानें हुंडी अठरा हजारांची वडिलांकडे पाठविली आहे. ते रुपये घेऊन अमानत ठेविले पाहिजेत. आणि त्यास पावालियाचा जाब पाठविला पाहिजे. वरकड जे वर्तमान होईल तें मागाहून लेहून पाठवूं. परवाना अ ल त म गा करून घेतले आहेत. त्यास तयार व्हावयासि एक वर्ष पाहिजे बहुत त्वरेनें जाहाला तरी या प्रोाच सातारियाचा ही लाविला आहे. वडील ह्मणतील कीं काशीजवळ घेतले गांव हे हस्तगत कसे होतील. तरि राजानें आर्धा मान्य केलें तेव्हां हें कार्य केलें. हरिदास कृपारामास वीस हजार रुपयेपर्यंत लागले तरी देतों. चिंता नाहीं. तो सांभाळून घेईल. तों इतकियांत त्याचा ही ऐवज चहूंकडून येईल. कळलें पाहिजे. बहुत काय लिहिणें हे नमस्कार.

चिरंजीव गोविंद दीक्षित व रामचंद्र दीक्षितां प्रति बाळकृष्ण दीक्षित [यांचे] अनेक आशीर्वाद. लोभ असों दीजे हे. आशीर्वाद. चरण बापुजी महादेव सां नमस्कार.

राजश्री भिकाजीपंत स्वामीस सा नमस्कर विनंती ज्यांचीं पत्रें त्यांस पावतीं करावीं.

---

[ २२ ] श्री

पै० भाद्रपद शु० १२ शुक्रवार शके १६७६.

वेदशास्त्र संपन्न राजश्री दीक्षित बाबा स्वामीचे सेवेशीं

विद्यार्थी गणेश कृष्ण सां नमस्कार. विनंती येथील कुशल ता श्रावण शु॥ त्रयोदशी मुक्काम दिल्ली. स्वामीच्या आशीर्वादें सुखरूप असो विशेष स्वामींनीं पत्र पाठविलें तें पावून बहुत संतोष जाहाला. लिहिला मजकूर सविस्तर कळला. याच प्रकारें सदैव पत्र [ पाठवून ] सांभाळ केला पाहिजे. आपण श्रीमंतास पत्रें पाठविलीं तीं प्रविष्ट करून जाब घेऊन पा आहेत. दिल्लीचा पैका वसुल होत आहे. आठ दिवस तेथें रहाणे होईल. तदनंतर जिकडे जाणें ते जातील. सार्वभौम[३४] नवे जुने जाहले, हें सर्व वर्तमान आपणांस कळलेंच असेल. कसबे सातारियाचे ताकीद पत्रांविशीं लिहिलें तें कळलें. वेदशास्त्र संपन्न राजश्री बाळकृष्ण दीक्षित[३५] येथें आले आहेत. श्रीमंतांची भेट जाहाली. वरकड मंडळीची भेट जाहाली. त्यांणीं आणखीं कितीएक मजकुराच्या यादी लिहिल्या आहेत, त्यांस हें कलम लि॥ आहे. आपले आज्ञे

---

३४. सार्वभौम=दिल्लीचे पादशाहा. | ३५. मागें टीप ३३ पाहा.

प्रमाणें श्रीमंतांस विनंती व राजश्री मल्हारबाबा, राजश्री गंगोबा तात्या यांस सांगोन जें होईल तें करून घेऊन सेवेशीं लिहून पाठऊं छ० १० रमजानीं जयाजी शिंदे मारवाडांत गेले. सरकारची फौज चार हजार बराबर दिली. तेही मारवा-[36] डची कार्यसिद्धी करतील. बहुत काय लिहिणें ? कृपा केली पाहिजे हे विनंती.

---

[ ३३ ] श्री

वेदशास्त्र संपन्न राजश्री बाळकृष्ण दीक्षित स्वामीचे सेवेशीं.

विद्यार्थी रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लिहीत जावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावून बहुत संतोष झाला. याचप्रकारें निरंतरी पत्रीं सविस्तर लिहित जावें. यवनाची फौज बुडवितों. आपणांस कळेलच. हल्लीं शहरास जातों. असो. निजामअली खान बाकी राहिले त्याचें पारपत्य श्रीकृपे करून होईल. रा छ २४ सफर. आ-ली दया पूर्ण असावी. सर्व देव ब्राह्मणांचे आशीर्वादें करूनच उत्तम फळ प्राप्त जाहालें. बाकी राहिलें तें होईल. बहुत काय लिहिणें हे विनंती.

पो श्रावण वद्य १४ मंगळवार सवा प्रहर दिवसास.

---

[ ३४ ] ॥ श्री ॥

पो आश्वीन शुा ४

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव दीक्षित स्वामीचे सेवेशीं

विद्यार्थी बाळाजी बाजीराव प्रधान कृतानेक नमस्कार विनंती उपरी येथिल कुशळ जाणून स्वकीय लिहित असले पाहिजे. विशेष. राजेश्री काशी बल्लाळ व अरवे रमण [ ? ] याज बरोबर खिजमतगार वगैरे माणसें देऊन हिंदुस्थान प्रांतें कामगारीस रवाना केले आहेत. मागाहून याजबरोबर आणिक सरंजाम पाठवावा लागतो. त्यास आठ दहा दिवस सातारियांस[37] राहतील. त्यास यांचा समाचार घेत जावा. जागा राहण्यास द्यावी. रा छ ४ मोहोरम. बहुत काय लिहिणें हे विनंती.

---

[ ३५ ] श्री

पै० चैत्र शुद्ध १ शके १६७९

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेवबावा दीक्षित स्वामीचे सेवेशीं

सेवक जानोजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विज्ञापना येथील कुशळ

---

३६. भाऊसाहेबांची बखर, मारवाडावरील स्वारी पहा. ( १७५३ स० इ० )

३७. सातारें हें औरंगाबादेपाशीं आहे. हें दीक्षितांचें जाहगिरींतील एक गांव होय.

ता। छ ९ माहे रज्जब मु॥ नजीक आफाराबाद येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष—स्वामींनीं पत्र पाठविलें तें प्रविष्ट होऊन लेखनार्थ अवगत जाला. भेटीचा मार लिहिला कीं पैठणावरि मुक्काम होत तरि येणें होतें लांब यावयासि योग्य घडत नाहीं ह्मणोन लिहिलें. त्यास पैठणावरि मुक्काम करणें तरि तो विचार कांहीं विस्तारयुक्त व्याहावा असें नाहीं. संकलित[38] मजकूर पहिले पत्रीं आपणास लिहिलेलाच आहे. यास्तव उपरीवरि त्वरेनें नावें लागेल ह्मणोन गंगातीरीं मुक्काम नेमले. उपरीवरि मुक्काम नेमले आहेत. तेथेंच मागाहून म ह त ह स पंढरी बाबा व बाबुराव कोनेर येतील त्यांस स्वामींच्या भेटीची अपेक्षा फार आह्मांस आहे. कैलासवासी तीर्थरूपांमागें[39] स्वामी वडील आहेत. तीर्थरूपांपेक्षां आमचे ठायीं ममता विशेषात्कारें धारिली पाहिजे. वर्षासनाचा मार लिहिला तरि कैलासवासी यांणीं वर्षासन चालविलें आहेत. त्यांत तिल तुल्य अंतराई होणार नाहीं· तरि स्वामींनीं कृपाकरून उपरीच्या मुक्कामीं येऊन भेटीचा लाभ दिला पाहिजे. येतेसमयीं राजश्री शामराव विश्वनाथ यांसही घेऊन यावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[३६] पौ चैत्र शु॥ १० ॥ श्री ॥
मंगळवार शके १६७९.

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेव बावा दीक्षित स्वामीचे सेवेशीं सेवक जानोजी भोसले सेनासाहेब सुभा, दंडवत. विज्ञापना येथील कुशल ता। छ ७ माहे रज्जब मुक्काम मालडगांव पर्यंत सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. यानंतर स्वामींचे भेटीची बहुत अपेक्षा आहे· यास्तव आपणाकडे पत्र लेहून जासुद जोडी पाठविली आहे. ऐसियास उदईक मंगळवारीं आमचा मुक्काम दुधनातीरीं करंडोवर आहे. तेथून दर मजल स त्क च वराडप्रांतीं जाणें आहे. येविशींचा अर्थ सेवेशीं लिहिला आहे· तरि स्वामींहीं कृपा करून सत्वर भेटीस आलें पाहिजे. येते समयीं राजश्री शामराव विश्वनाथ यांस समागमें घेऊन यावें. सेवशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ ३७ ] ॥ श्री ॥

वेदशास्त्र संपन्न राजश्री वासुदेवबावा दीक्षित स्वामीचे सेवेशीं सेवक रघोजी भोंसले सेनासाहेबसुभा दंडवत विनंती उपरी येथील कुशल तागाईत श्रावण शुद्ध ११ पर्यंत स्वामींचे आशीर्वादें करून यथास्थित असे विशेष. स्वामींनीं राजश्री रामचंद्र बल्लाळ पांजवरावरि

---

३८. संकलित = थोडक्यांत.
३९. म्हणजे रघूजी भोंसले ज्यांणीं नागपूरचें राज्य पैदा केलें.

आशीर्वादपत्र व प्रसादवस्त्र पाठविलें तें मस्तकीं वंदून सनाथ जालों. याचप्रकारें निरंतर आशीर्वादपत्रीं संतोषवित जावें. यानंतर स्वामीचे सेवेशीं वस्त्रें पाठविलीं आहेत बि॥

चांदणी तिर्वेट पैठणी. चांदणी पैठणी सक [ ला ? ]

येकूण सनगें दोन व ब्राह्मण संतर्पणाकारितां दुबत्या म्हशी उत्तम ४ चार पाठविल्या आहेत. प्रविष्ट होतील. विदित व्हावें याजकरितां विनंती लिहिली असे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ ३८ ] ॥ श्री ॥

वेदशास्त्र संपन्न राजश्री गोविंद दीक्षित पाटणकर स्वामींचे सेवेशीं—विद्यार्थी माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें. विशेष, तुह्मांपासून कर्ज घेतले मुद्दल रुपये ४०००० दिंमत बाबुराव सदाशिव यांस राजमरे [!] यात ५००० हुंडी पुण्याची बाबुराव दीक्षित पटवर्धन यांजवर एकूण पंचेचाळीस हजार रुपये घेतले. यांस व्याज दरमहा दर सदे रुपये १। सवोत्रा बिनसूटप्रा करार केले असे. जाले मुदतीचें व्याज मुद्दल हिशेब करून[४१] देऊं. मित्ती मार्गशीर्ष शुद्ध प्रतिपदा शाके १६८३ वृषनाम संवत्सरे जाणिजे. छ ५, जमादिलावल, सु॥ इसन्नेसितैन मया व अल्लफ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

[ ३९ ] ॥ श्री ॥

वेदशास्त्रसंपन्न राजश्री रामचंद्र दीक्षित व लक्ष्मीनारायण दीक्षित गोसावी यांसि—

सकल—गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ येशवंत राव होळकर दंडवत विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहित असावें. विशेष. आपण पत्र पाठविलें तें पावलें. खानदेश प्रांतीं खासा स्वारी आल्यावर पुढें राजश्री फत्तेसिंगराव मोने वगैरे फौजा या प्रांतीं रवाना जाल्या. जनवार्ता सैन्याचा उपद्रव यामुळे कायगांव टोकें प्रवरासंगम तीर स्थळीं क्षेत्राची जागा, ब्राह्मणांस भय उत्पन्न जालें. साल गु॥ क्षेत्र कायगांव पेंढारी यांणीं लुटलें. त्यामुळें भय अधिक प्राप्त जालें. त्यावरून

४०. तिवट = पागोटें.

४१. पहिल्या ४ पेशव्यांस नेहमी कर्ज असे. सवाई माधवरावांच्या कारकीर्दीत हें सर्व खलास झालें.

४२. स० इ० १८०२ मध्यें येशवंतराव पुण्यावर चालून येत असतां त्यानें फत्तेसिंग माने यास पुढें पाठविलें होतें. फत्तेसिंग हा यशवंतरावाच्या कंपूंतला मोठा शूर सरदार होता. त्यानें पेशव्याचे प्रांत लुटून जाळून उद्वस्त केले व विंचूरकर, गोडबोळे वगैरे पेशव्याचे सरदारांस पराभवून मागें लाविलें.

क्षेत्रस्थ ब्राह्मण श्रीफल घेऊन मान्यांच्या भेटीस पुण्यस्थंभीं गेले. त्यांनींही अभय दिलें. जे आह्मांस येविशीं सुभेदार* साहेबांची आज्ञा आहे जे, क्षेत्रास उपसर्ग होऊं नये. त्यावरून सर्वांस संतोष जाला. हल्लीं राजश्री नबाब अमीरुद्दौले[४३] फौजेसुद्धां कसबे गांडापूर येथें आवंडाकडे स्वारी जाणार त्याजकडील उपसर्ग क्षेत्रास किमपि लागला नाहीं. मानें यांणीं खात्री केली त्याप्रमाणें अनुभवास सर्वांच्या आलें. पूर्वापार कैलासवासी थोरले सुभेदारां[४४]पासून या स्थलाचा अभिमान आहेच. त्याप्रमाणें सांभाळ करूनच आह्मांकडील गांडापूर परगण्यांतील तीन गांव नेवास परगण्यांतील एक गांव येकूण चार गांव आहेत. आज पांच सहा वर्षें पायमालीनें खराबा जाली. त्यास त्याचे व तीरस्थळीचें संरक्षण घडावें याकरितां नबाबास पत्र दिल्हे पाहिजे. ह्मणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. ऐशियास तुह्मांकडील लक्ष्मण उमाजी याजबराबर राजश्री अमीरुद्दौले याजला पत्र पाठविलें आहे. हें त्याजकडेस पावतें करावें. गांवास उपद्रव देणार नाहींत. सर्वदा पत्र पाठऊन तोषवीत जावें रा छ ११ रबिलाकर. सु॥ सल्लास मैयातैन व अल्लफ. बहुत काय लिहिणें हे विनंती. मोर्तबसुद.

[४०] श्रीसकळ तीर्थरूपराजश्री श्रीमत्परमहंस[४५] स्वामींचे सेवेशीं.

अपत्यसमान शाहूजी राजे कृतानेक दंडवत विज्ञाप्ति येथील कुशल फाल्गुन शुद्ध तृतीया सौम्य वासर स्वामीचे आशीर्वादें यथास्थित असो विशेष. स्वामींनीं आशीर्वादपत्र प्री दि लें.[प्रेरिलें?] तेथें आज्ञा जे, श्रीनें जें वदविलें त्यास संदेह आहे असें नाहीं. पत्र पत्रिकार्थ जाणून जतन करून ठेवणें ह्मणून त्यावरून स्वामींनीं आशीर्वादप्रसाद दिला. त्यास संदेह चित्तांत आणिजेतो असें नाहीं. सूचनार्थ विनंति लिहिली होती. त्यास निर्वाहरूप पत्रिकाच आज्ञा प्रमाण, संग्रहीं ठेविली असे. विदित होय. श्रीपदप्रसाद पाठविला तो पावला. सेवेशीं विनंति.

[४१] श्री.

श्रीसकल तीर्थरूप श्रीमत् परमहंस श्री स्वामींचे सेवेशीं.

अपत्यसमान शाहूजी राजे कृतानेक दंडवत विज्ञाप्ति येथील कुशल भाद्रपद शुद्ध तृतीया, सौम्यवार स्वामींचें आशीर्वादें यथास्थित असों विशेष.

---

* सुभेदार = यशवंतराव.

४३. यशवंतरावाच्या पदरचा एक पठाण सरदार. अमीरखां ?

४४. थोरले सुभेदार = मल्हारराव होळकर.

४५. हे धावडशीचे ब्रह्मेंद्र स्वामी. यांचें चरित्र हल्लीं प्रसिद्ध होत आहे.

नाहीं. बहुतच अमर्यादा मांडिली. यास्तव त्याचेही डोळे उघडावे. याकरितां तजविजेनें पाल व मिरगड दोन्ही जागे संभाजीच्या हातास जात होते, तेथील लोकांचा दिलासा करून ते जागे घेऊन आपलीं निशाणें चढविलीं. तैसेंच फिरंगी याचें उरण बळाविलें होतें तेंही घेतलें. आजच फत्ते जाल्याचें पत्र उरणाहून आलें. सारांश त्याचे डोळे उघडले. व सर्व प्रकारें संभाजीचे हातीन जीवही ये समया वाचविला असे. सारांश इतकाही प्रताप स्वामींचे आशीवादाचा आहे. तेणेंकरून सर्व विचार होतात. दुसरा अर्थ नाहीं. कर्ज फिटेल ऐसें स्वामींचे मुखावाटे निघालें आहे, तेंही शेवटीस जाईल. स्वामींच्या आशीर्वादाविगळे दुसरें जाणत नाहीं. उद्यां परवां घाट उतरोनही (!) कुलाब्या पावेतों जाणार आहे. तेथें न पावतां अगोदर संभाजीचा निकाल जाला तर उत्तमच आहे. नाहीं तर तेथवर जाऊन होईल वृत्त तें लिहून पाठवूं. निरंतर आशीर्वाद पत्र पाठवीत जावें. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

---

## खड्र्याच्या लढाईचा पवाडा.

[५९] हिंदुस्थान गुजराथ सोडुन शिंदा दखनेंत आलीं ॥ हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ ध्रुपद ॥ मजल दरमजल नर्मदा उतरून आले पार ॥ धरला दखनचा सुमार ॥ बेगुबेग येऊनि पाणी घेतले गंगातीर ॥ फौज होती चाळीस हजार ॥ मनीं मनसुबा करुनी चढले बालेघाटावर ॥ धरला ञ्यंकाजी तस्कर ॥ मग कित्येकासी जरब पोंचली मरून झाले चूर ॥ पळाले पुंड पाळेकर ॥ तेथुन जलदिनें कूच करुनी दाखल तुळजापुर ॥ आले दखनांत झाले जाहिर ॥ दखनदेशीं अंबा भवानी दैवत अनिवार ॥ देविसी केला नमस्कार ॥ चाल धुमाळी ॥ दिले तुळजापुर सोडुनी ॥ गेले चंद्रभागा उतरुनी ॥ खबर ऐकिली श्रीमंतांनीं ॥ दोन कोस आले चालुनी ॥ भेटले हाडपसराच्या रानीं ॥ नेमिली पुण्याची छावणी ॥ जवळ पेठ आहे भवानी ॥ मुक्काम वानवडीवर केला ॥ हुकूम केला बादशाहानें त्याला ॥ १ ॥

---

१०. उरणबेटांत द्रोणागिरी पर्वतावर फिरंग्याचें देऊळ असून त्याभोंवतीं तट व दरवाजा आहे. दरवाज्याच्या वरील उंबरठ्यावरील खुरूस काढून गणपतीची मूर्ति खोदिली आहे ती याच वेळीं खोदिली असावी.

११. मोठमोठ्या स्वाऱ्या पेशवे करीत असत त्यामुळें त्यांस खर्च फार येऊन नेहेमी कर्ज असे. हें कर्ज पुढें नाना फडणीस यांणीं निःशेष फेडीपर्यंत चाललेंच होतें. यास उद्देशून वरील वाक्य आहे.

१२. हें पत्र व मागें अंक (५५,५६,५७) हीं रा० रू० वि० कालगांवकर यांणीं नकला करून पाठविल्या होत्या त्यांवरून घेतलीं आहेत. ग्रां० ड० यांणीं या (५८) पत्रावरूनच या स्वारीची सर्व हकीगत लिहिली असावी असें वाटतें.

१. शिंदे दक्षणेंत सन १७९२ मध्यें आले. २. गंगा=गोदा.

सहा चार महिने तिथें गुजरले पुण्यास येऊनी ॥ मनसुबा बहु सबळ करुनी ॥ न बाबासी पत्र लिहिलें फार फार अर्जीनी ॥ खर्चि द्या आम्हांस पाटवूनी ॥ जासुदजोड्या केल्या रवाना पोंचल्या जाऊनी ॥ पत्र टाकिलें मुजरे करुनी ॥ नबाब बहादर मशारनमुलुख एक मसलत करुनी ॥ पत्र पाहिलें त्यांनीं ॥ वाचुन परगण्यावर चिठ्ठ्या नेमिल्या समय सम पाहुनी ॥ नगदी ऐवज दिला लावूनी ॥ पांसष्ट लाख रुपये पोंचले नाहीं भरले मनीं ॥ दखनचा हिशोब घेऊं म्हणुनी ॥ चाल धुमाळी ॥ ऐसें करणें भगवंताला ॥ हिंदुस्थान ज्यानें काबिज केला ॥ परतुन दखनमधी आला ॥ पुणें शहरीं काळ झाला ॥ खबर कळली नबाबाला ॥ नबाब बेदरावरी आला ॥ खरे खोटे भासे लोकांला ॥ तक्तीं दवलतराव स्थापिला ॥ हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदुस्थान सोडुन० ॥ २ ॥

नबाबानें पत्र लिहिलें श्रीमंत नानांसी ॥ शिवाय दवलतराव बापूसी ॥ पांसष्ट लाख रुपये आम्हीं कर्ज दिले शिंद्यासी ॥ लवकर द्या आमचे आम्हांसी ॥ आटोकाट सरदार मिळोनी बसले मनसुब्यासी ॥ क्रोध आला दवलतरावासी ॥ तुम्हीं बसून रहा पुणें-शहरीं हुकूम करा आम्हांसी ॥ पाहुनि घेतों नबाबासी ॥ तमाम फौजा मिळोनि दिले रोजमुरे त्यासी ॥ बोलाविलें जिऊबा दादासी ॥ तिथें जेवत असला तर इथें या तुम्हीं पाणी पियासी ॥ घेऊनि द्येवजी गवळ्यासी* ॥ चाल धुमाळी ॥ येऊनि लवकर पोंचलें ॥ श्रीमंत पुण्याबाहेर निघाले ॥ मुळा-मुठावर डेरे दिले ॥ बावन-उमराव मिळाले ॥ एकंदर बसुनि मनसुबे केले ॥ भोंसले ते हि लवकर आले ॥ शिंदे आघाडीस घातले ॥ येऊन सिनेवर शह दिला ॥ हुकुम० हिंदुस्थान० ॥ ३ ॥

बेदर सोडुन नबाब लौकर बाहेर निघाले ॥ अमिरउमराव संगें घेतले ॥ चला चला म्हणून लवकर धारूरावर आले ॥ पुण्याकडे झेंडे फिरविले ॥ तेथुन जलदिनें कूच करुनि बीजरानदीवर आले ॥ फिरंगी आघाडीस घातले ॥ शेकसलाची[४] कहं कंदुरी मशीरन बोलले ॥ पेशवे थरथरां कांपुं लागले ॥ पासष्ट लाखांचा मुलूख मागतां तेही विसरून गेले ॥ स्वप्नीं नबाब दिसूं लागले ॥ सांडीवरती सांडी फिरती डाकवाले बसविले ॥ वरचेवर वातमी आणऊं लागले ॥ चाल धु० ॥ घाट उतरले मोहोरीचा ॥ मार्ग धरिला पुण्याचा ॥ एकच गट करून फौजेचा ॥ माळ चढले नायगांवाचा ॥ तक[ला?]वा आला तिकडुन पेशव्याचा ॥

---

३. ता० १२ फेब्रुवारी १०२४ रोजीं वानवडी येथे.

* कोण ?

४. सेकसलास—पुण्यांतील.

५. महंमदाची मुलगी फातिमा इच्या नांवानें मुसलमान उत्सव करतात तो.

निश्चय केला यांनीं झुंजाचा ॥ धडाधड बार सुटे तोफेचा ॥ मुसा[6] रहिमानच मोरचा तुडवीला ॥ हुकूम० हिंदु० ॥ ४ ॥

नबाबानें मोरचा तुडविला कळलें श्रीमंताला ॥ अजुरदे[7] जाले बहु मनाला ॥ अमीर सारे बोलावूनी आणिले डेऱ्याला ॥ वक्त हा बुडायाचा आला॥ नाना फडणीस एक मसूदी[8] तर्क त्यानें काढिला ॥ बोलाविलें जिउबा दादाला ॥ तुम्हीं आघाडीस असतां मनसुबा कसा नाहीं कळाला ॥ नबाब गफलतीनें आला॥ तीच विरशरी[9] धरून सव्या फौजा आघाडिला ॥ चुरस लागली तेव्हां शिंद्याला ॥ भिवराव पानसे[10] तोफखाना त्यांचे हवाली केला ॥ फिरंगी लोक तैनातीला ॥ चाल धु० ॥ पेशव्यांनीं बिंचरणा रोखून ॥ सव्या फौजा पुढें देऊन ॥ रास्त्यांनीं एक अलंग[11]धरून ॥ फडक्यांनीं तवाफरा[12] बांधुन ॥ राजे बाहदर नाम निशाण ॥ फौजा नानाच्या आध्यान[13] ॥ तेथें मिळाले अष्टप्रधान ॥ हौद्याशीं हौदा भिडुनी गेला ॥ हुकूम केला० ॥ ५ ॥

करून स्वारी तयार नबाब जरदा अंबारींत ॥ बेगम्यापुढें[14] हुजुरांत ॥ त्यांची उमेदवारी पेशवे सर करूं सहजांत ॥ बांधली रांडांनीं हिंमत ॥ मशरल मुलख त्याचे मसुदी[15] राजा नेमिवंत ॥ झाडुन फौजा त्याच्या अंकित ॥ रोशनाखा पर बिनीवाले नबाबाच्या हुकुमांत ॥ भरअमल दोन्ही दळांत माहित ॥ इस्मालखा दनी पठाण गारदी त्यांचे संगत ॥ नामी करवळ[16] आहे हुजुरांत ॥ फाजलखा रोहिले खांसि बारा हजार जमात ॥ जंबुरे जोडुन उंटावर [त] ॥ चा० धु० ॥ नबाबानें हल्ला केली ॥ फौज लोणिचा माळ चढली ॥ दोन्ही दळें उभीं ठाकलीं ॥ नामी सरदार आसदअल्ली ॥ तोफखान्याला शिलक[17] दिली ॥ देवडी

---

६. मुसा रहिमान हा पेशव्यांचा आरब सरदार होता.

७. अजुरदे=खट्टू, खिन्न.

८. मसुदी=मुत्सद्दी. एक मुत्सद्दी=अद्वितीय राजकारणी पुरुष.

९. वीरश्री ( चालीवर बसण्यासाठीं )

१०. भिवराव पानसे—पुणें येथील शुक्रवारांतील पानसे यांचे पूर्वज.

११. अलंग=लांब ओळ, बाजू.

१२. तराफरा=तवातोबरा ? पूर्वी प्रत्येक घोडेस्वारानें मुलुखगिरीवर जाते वेळीं एक तवा व एक तोबरा इतकी सामुग्री तरी जवळ बाळगावी असा प्रघात असे. त्यावरून तवातोबरा ह्मणजे मुलुखगिरीस लागणाऱ्या वस्तु यांचा समाहार झाला. फरा म्हणजे शिपायांची रांग असा अर्थ आहे पण मग 'तरा' शब्दाचा उलगडा चांगला होत नाहीं.

१३. आध्यान = आध्यानें = ध्यानानें, सभोंतीं ?

१४. नबाबाचा जनानखाना बरोबर हत्तीवर वागत असे त्यास उद्देशून हें व पुढील वाक्य अशीं लिहिलीं आहेत. मुळांत 'बेगम्या, बेगमा' असें असतें तर बरें.

१५. मुत्सद्दी.

१६. करवळ—करोळ=बंदुखीस्वार.

१७. शिलक=सरबत्ती.

मार जेव्हां बसविली ॥ पेशव्याची फौज मागें हटविली ॥ फिरुन खरनदीवर मुक्काम केला ॥ हुकूम के० हिंदुस्थान गु० ॥ ६ ॥

रातोरात आणून तोफखाना जोडिला जिउबा दादानीं ॥ लोणीगारमाळ पसरूनि ॥ एकापरीस एक शिपाई रांगडा हिंदुस्थानी ॥ दोन कंपु फिरंगाणी ॥ मन्याबापु भोंसले परशरामभाऊ आज्ञा घेऊनी ॥ एक मोरचा त्यांनीं रोखुनी ॥ भवानराव प्रतिनिधी आले अनूपान[18] भोगुनी ॥ एक मोरचा त्यांनीं रोखुनी ॥ चौकोसाची लांबण पडली कोणांत नाहीं कोणी ॥ बहिऱ्यांमधीं[19] फौज गेली मिसळुनि ॥ चाल धुमा० ॥ तोफेचा एकच वर्षला कहर ॥ गगनीं लागुनि गेला धूर मायसी पारख [ लें ] लेंकुरं[20] ॥ नवाबासी कळुनि आला फितूर ॥ मजल काय [!] सुटेल तोफेचा बार ॥ पांचजण निवडले रणशूर ॥ मुसा रहिमुचें बुडविलें लष्कर ॥ रमणा[21] बहुत तिथें मातला ॥ हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदु० ॥ ७ ॥

लालखान वजिरखान ह्यांनीं रणांत घोडीं घातलीं ॥ परशरामभाऊसीं जखम चढविली ॥ दाजीसाहेब येथ शामजंगास स्वारी केली ॥ पठाणी लोक संग हाटेली ॥ कटाव करीत चालले जेव्हां तिराचे मार बसविली ॥ भोंसल्यानें गर्दबाण उडविली ॥ वजिरखानासी बाण लागतां हौद्यांत जान[22] सोडिली ॥ लालखांची सुद नाहीं लागली ॥ बाळासाहेब ठार जहाले वस्त शान पडली[23] ॥ खनाखना लव्हा गर्द उडाली ॥ भलेभले सरदार ह्यांनीं बहिरींत तोंडें घातली ॥ आंबारी नवाबानें फिरविली ॥ चाल धु० ॥ लोक लोक झाले चंयत ॥ नवाबमशरलमुलुक हौद्यांत ॥ आनंदराव किल्ला ठेवा नजरेंत ॥ हावाई लाविली किल्यांत ॥ नवाबदखल सुलतान दुर्गांत ॥ बुणगे आले शिवपट्टणा भोंवत ॥ वेढा काय शिंद्याचा पडला ॥ हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदु० ॥ ८ ॥

खरनदीवर दिले मोरचे किल्याशीं रोखून ॥ फौज नवाबाची घेरून ॥ जिउबादादा श्रीमंतांशीं बोले अर्ज करून ॥ नवाबास क्षणांत घेइन लुटून ॥ लुटुल्यावांचून कारण नाहीं बसा शह देऊन ॥ नाना करील तेंच प्रमाण ॥ बे-

---

१८. अनुपान भोगून=ह्याचा अर्थ स्पष्ट कळत नाहीं.

१९. बहिऱ्यामधीं—तोफांच्या आवाजामुळें बधिरपणा आला त्यांत. किंवा खोंडा, दरी, नळी ?

२०. मूळांत 'मायशी पारख लेंकर' असें आहे. त्याचा 'आई म्हणून तिलाच लेंकराची पारख, ओळख राहिली—बाकी सर्व धुंदी झाली', असा निर्वाह करतां येईल. परंतु वर दिलेलाच पाठ असावा असें वृत्तावरून होतें व त्याचा अर्थही बरा होतो. पारखलें=परके झालें, त्याची ओळख बुजाली.

२१. रमणा=तुमुल युद्ध, हातघाईची लढाई, गर्दी.

२२. जान=जीव.

२३. 'वस्तशैन्य' असें मुळांत आहे. कदाचित् 'मस्त सेना' असेंही होईल.

दे[२४]ड्यासी हुकूम टाका रस्ते बंद करून ॥ रुपयाशेर तेव्हां मिळेना अन्न ॥ पाण्या वांचुनि फौज त[२५]रसली नबाबानें ऐकून ॥ सल्यास धाडिले गोविंद किसन ॥ चाल धु० ॥ गोविंद किसन आले परतून ॥ नबाबासि वर्तमान सुचवून ॥ मशीरल मुलूख दिले पाठऊन ॥ पेशव्यांनीं टाकिलें कैद करून ॥ जसा सांपव्यांत व्याघ्र कोंडून ॥ नबाबासि नानाचें वचन ॥ खातरजमा झाली येथून ॥ अवघा चित्तिचा विकल्प उडाला ॥ हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदुस्थान गुजराथ सोडुन शिंदा दखनांत आला ॥ ९ ॥

शके १७१६ आनंदनाम संवत्सर ॥ फाल्गुन वद्य ६ षष्ठी बुधवार ॥ किल्यामधिं येऊनि नबाबासी आठवला विचार ॥ द्यावी निंबाळकरासि जहागीर ॥ नबाव बोलतां हजर श्वियासराव बापु सुपेकर ॥ आणविले आपासाहेब निंबाळकर ॥ भेट देऊनिया [ करा ] कुचाचा विचार ॥ किल्यामधीं सदर ज्याहा बाहादर ॥ शके १७१७ राक्षसनाम संवत्सरे ॥ चैत्र पौर्णिमा शुक्रवार ॥ दळभार घेऊन नबाव आंजरानदीच्यावर ॥ संगें होते निंबाळकर ॥ चाल धुमाळी ॥ कनिया अखेर त्या वेळेस ॥ नबाव गेले भागानगरास ॥ श्रीमंत पोंचले थेट पुण्यास ॥ गैबिचे देणें भुजंग आयास ॥ कादरभाई चाकरू दिले बिनीस ॥ त्यांनीं जाऊनि गांठिलें हारदाम ॥ रामछंद गातो मजलसीला ॥ हुकूम केला बादशाहानें त्याला ॥ हिंदुस्थान गुजराथ सोडुन शिंदा दखनांत आला ॥ हुकुम केला बादशाहानें त्याला ॥ १० ॥

---

[ ६० ] ॥ श्री ॥

७ ११ जमादिलोवल प्रहर दिवस प्रातःकाळ.

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री बापुजी भीवराव स्वामी गोसावी यांसि- पो॥ बाळाजी जनार्दन प्रधान नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष–तुम्ही रा॥ राघो गोविंद यांचा व अंतुरकर मोगलांचा कजिया जाहालियाचा मजकूर दोन चार बंद विस्तारें लिहिला, परंतु कोणे गोष्टी वरून कजिया जाहाला, कजिया व्हावयास कारण काय, तो मजकूर किमपि लिहिला नाहीं. याजवरून तुमच्या लिहिण्याची तारीफ काय ल्याहावी ! जरी शिपी, रंगारी यांचे मजकुरावरून अंतुरकर मोगलांनीं कजिया फैलाविला असेल

---

२४. पेंढाऱ्यांसी ? वेरड यांसि ?

२५. तरसली=त्रासली.

२६. या पोवाड्यांत शेवटीं शेवटीं बरेच ठिकाणीं अर्थ स्पष्ट लागत नाहीं. स्थळांचीं व पुरुषांचीं नांवें आलीं आहेत तींही परिचित नाहींत. ज्या कोणांस याबद्दल जी माहिती मिळेल त्यांनीं आम्हांकडे मेहरबानी करून पाठवावी.

हा पोवाडा रा० रा० कृष्णाजी रघुनाथ [illegible]कर यांजकडून आम्हांस मिळाला.

तर तो जुंजमुकादिमा[1] आहे. जैसा जेथें जीव देखावा तैसा तेथें पैका वसूल करावा. जातीचा मुकादिमा त्यास पैका सुटेल असें नाहीं. व पैका दिल्या खेरीज तेही जातींत येथेपूर्व[2] वर्तणारनाहीं. या करितां दारनादार पाहून घेणें तें घ्यावें व त्यांनींही बोलावें. असें असोन जुंज कारभारावरून इतकें दररोज लावावेंसें नाहीं. थोडे बहुतांनीं कजिया चुकल तर चुकवणें. माणसें इकडील मेलीं व जखमी झालीं याजप्रमाणें तिकडीलही मेलीं व जाया झालीं असतील त्याचा मजकूर[3] नाहीं. परंतु घोडीं गेलीं मेलीं असतील तीं द्यावीं. येणेंप्रमाणें होऊन अंमल करारबांकें[4] चालवीत असिलियास कजिया वारून टाकणें. वर्तमान वरच्यावरी लिहीत जाणें जाणीजे. छ० ८ जमादिलोवल मु॥ सीत आबें मया व अलफ बहुत काय लिहिणें. अगर मामलती वरून कजिया जाहाला असेल. आणि सालबसाल मालियत चालत आल्या प्रमाणें सुरळीत करून देतील तरी उत्तम आहे. कजिया वाढवूं नये. याप्रमाणें करावें. तरि तुम्ही काय त्याशीं बोलतां व ते काय कोठपर्यंत बोलतात, व कोणत्या गोष्टी [ वर ] अट येऊन पडते तें वरचेवर वर्तमान लिहीत जाणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें हे विनंती.

[ ६१ ] ॥ श्री ॥

राजश्री नाना पंडित प्रधान गोसावी यांसि—

छ सकळ गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ मानाजी आंगरे वजारतमाव रामराम विनंती उपरी येथील कुशल जाणुन स्वकीय लेखन आज्ञा करीत असलें पाहिजे. विशेष—राजश्री महादाजी रघुनाथ यांस मजमुचा धंदा सांगोन खेदंडियास पाठविल्यापासून कारभाराचा बंदोबस्त व लोकांची समजावीस यथास्थित करून अमीनपणें येकनिष्ठेनें वर्ततात ऐसें समीपवर्ती कुलाबियास श्रवणांत येतच होतें. एकनिष्ठतेविशीं आपलाही निशा जाहालाच आहे. सांप्रत जंजिरे याचे मोहीमचे प्रसंगांत जमाव व साहित्य सहवर्तमान मशारनिले येथें आलियावर तरतुद[5] व तसबीर[6] पाहून बहुत संतोष जाहाला. सेवक लोक निष्ठेनें वर्ततात त्यांची सर्फराजी बहुमान खावंदांहीं करावा उचित जाणोन राजश्री रामाजीपंतांकडून तपशीलें विनंती लेहविली आहे. आम्ही लिहिल्याचें जरूर जाणोन या समयांत मशा-

शिक्का. *

---

१. मुकदिमा=प्रकरण, खटला.
जुंज-झुंज=युद्ध, भांडण.

२. येथपूर्व=यथापूर्व ( ? ) पूर्वीप्रमाणें.

३. मजकूर=मातबरी, हिशेब या अर्थी. कारण मेलेलीं माणसें परत देतां येत नाहींत.

४. बांका=प्रकरण, खटला, हकीगत. करारबांकें=कराराप्रमाणें ?

५. तरतूद=उपाय.

६. तसबीर=प्रयत्न.

* शिक्यावरील अक्षरें लागत नाहीत. हा दीर्घवर्तुलाकृति आहे.

रनिल्हेचे बहुमानास पालखीची आज्ञा करणार आपण समर्थ आहांत. मोर्चेबंदीचे प्रसंगास हरएक साहित्यास रेवदंडासमीप अनुकूल आहे. साहित्याचे तरतुदीस मशारनिल्हेस रवाना करविले असत. सारांश बहुमाना योग्य जाणून लिहिले आहे. येविशीं उपेक्षा नसावी. रा। छ० २४ माहे रमजान. बहुत काय लिहिणें कृपा निरंतर वर्धमान असावी हे विनंती.

(मोर्तब सूद.)

[ ६२ ] ॥ श्री ॥

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यांसि—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद सु॥ सबा आर्बैन मया व अलफ तुम्ही फौज सुद्धां बुंदेलियावरि कालिंजराकडे गेलिया आलीकडे कांहीं वर्तमान अवगत होत नाहीं. पत्रही येत नाहीं. तरि प्रस्तुत तुम्ही कोण्हे जागां आहां, काय मनसुबा योजिला आहे, बुंधेलियानें सुप्रवृत्त होऊन तुमच्या मनोदयानुरूप मामिलियत विल्हेस लाऊन टाकली कीं नाहीं ? यॉ तह करूं नये, झुंजावेंच, हाच त्यांनीं विचार चित्तांत आलिला आहे ? पुढें तुम्हीं काय कैसें करावयाचें केलें आहे. तें सर्व वरचेवरि लिहिणें. इकडील कांहीं नवीन लिहिनेसें नाहीं. अद्यापि सातारियासच आहों. पुढें होईल वर्तमान तें लिहिलें जाईल. जाणिजे छ० ९ रजब बहुत काय लिहिणें—

(श्री राजा शाहु नरपति हर्षनिधान बाळाजी बाजीराव मुख्य प्रधान)

(लेखन सीमा)

पै॥ छ॥ २ रमजान.

[ ६३ ] ॥ श्री म्हाळसाकांत ॥

राजश्री रावजी गोविंद गोसावी यांसि—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—स्ने॥* मल्हारराव होळकर दंडवत विनंति उपरी तुम्ही ज्येष्ठ वद्य ६ व एकादशीचीं पत्रें पाठविलीं तीं पावून लेखनार्थ अवगत जाहला. येथें पावल्यावर सरकार पत्रें उभयतां बाबांस दाखऊन आज्ञेचे भाव सर्व दर्शविले. त्यांनींही बोलण्याचा क्रम चालू केला आहे. धन्याचा लोभ कारभारी यांचे मन:पूर्वक जपणें हें बारीकपणें ध्यानीं आल्यावरून लेखन केलें आहे. राजश्री बाळाजी लक्ष्मण नि॥ विंचूरकर यांची भेट करविली. त्यांचेही बोलण्यांत उचित तेंच निदर्शनास आलें. पुढें घडल्याचें लेखन

७. या=किंवा, अथवा. | * स्ने॥ =स्नेहांकित.

श्री
म्हाळसाकांत चरणीं
तत्पर येशवंतराव सुत
मल्हारराव होळकर.

होईल म्हणोन लि॥ ऐशियासि तुम्ही सरकार पत्रें व आज्ञेअन्वयें बोलून क्रम चालू करविला हें नीटच. यावर दिनावधीवर न पडतां आरंभिला विचार सत्वर बनून ये तें करवणें. खावंदाचा लोभ दिवसेंदिवस दिसण्यांत येईल तसें सेवाही करण्याची उमेद इकडे हे भाव कारभारी व बाळाजी लक्ष्मण यांस दर्शवून त्यांचे जपणें मन ज्या दौलतीविशीं आहे त्याची वृद्धी घडे तें करणें. करीम पेंढारी सरकार कैदेंत त्याचें बोलणें लाऊन सुटका होती ह्या आवया राजश्री खंडो माहादेव व सखाराम जगजीवन यांनीं ऐकून तेथील मर्जीचे भाव विस्तारें लेहून पाठविले. त्यास येथें होणें तें दूरां देशींने तेथील सल्लेनेच होणें तें होईल. तुम्ही बोलण्याचा क्रम चालता जाला ते पक्षीं दररोज होईल तसें लेहून वरचेवर कळवीत जाणें. आळस न करणें. रा॥ छा॥ ९ रजब सु॥ सल्लास अशर मया तैन व अल्फ. बहुत काय लिहिणें हे विनंती.

[ ६४ ] ॥ श्री म्हाळसाकांत ॥

मोर्तब
सूद.

राजश्री रावजी गोविंद गोसावी यांसि—

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ मल्हारराव होळकर दंडवत विनंती उपरी तुम्हीं भाद्रपद व॥ ९ चें पत्र पाठविलें तें पाऊन लेखनार्थ अवगत जाहला. फणशा मंदाणकर निंबोण्यास पावून उत्तर आलें. चांदवडचें पत्र आलें नाहीं. आल्यावर लेखन करीन. श्रीमंतांची स्वारी भीमातीरीं कपिलाषष्ठी करून येणार. अजम अलफिस्टन साहेबांस व खुशरुदीन मोदी व त्र्यंबकजी डेंगळे यास पत्रें सरकारचीं येतात तीं योग्यते प्रमाणें येत असावीं म्हणोन राजश्री खंडोपंत बाबांनीं साहेबांस लिहिलें आहे. त्या अन्वयें पत्रें येण्यास आज्ञा व्हावी म्हणोन लिहिलें ऐशियाशि फणशा व मूल आज पावेतों चांदवडीं पोंहोचऊन तुम्हाकडे पत्रें आलींच असतील. त्यांजला तेथें ठेवणें सांप्रतचे प्रसंगास अप्रशस्त जाणोन नेमाड प्रांतीं आणावावयाचें ठरून राजश्री परशराम होळकर यांजपाशीं पावते करण्याविशीं पत्रें राजश्री रामदास आगरवाले व भिकाजी गोमाजी यांस पाठविलीं त्याप्रमाणें ते करतील. याचा तपशील राजश्री खंडो महादेव यांचे पत्रीं लिहिला आहे. तेथें प्रसंगानुरूप बोलावयाचें तें बोलून इकडेही कळविणें.

श्री
म्हाळसाकांत चरणीं तत्पर
येशवंतराव सुत मल्हारराव
होळकर.

आज पावेतों श्रीमंतांची स्वारी पर्वाचें[८] स्नान करून पुण्यास आलीच असेल, पुढें श्री स्वामीस[९] जाण्याचें ठरेल तैसें कळविणें. साहेब व मोदी व हेंगळे यांस पत्रें यावर मशारनिलेचे लिहिल्या अन्वयेंच लिहिण्यांत येत जातील रा। छ ५ जिलकाद सु॥ खमस अशर मयातैन व अलफ बहुत काय लिहिणें हे विनंती. (मोर्तब सूद)

[ ६५ ] ॥ श्री ॥

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री बाळाजी गोविंद स्वामी गोसावी यांसि— पो। रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणें. विशेष—राजश्री पुरुषोत्तम महादेव हिंगणे यांस जातीस सरंजाम रुपये १५,००० पंधरा हजार रुपये द्यावयाचा करार करून हे सनद तुम्हांस सादर केली असे. तरि सदर्हू पंधरा हजार रुपयांचे तनख्याचे गांव पा। कोंच पै। अव्वलसाल सन समान सितेना पासून नेमून देणें आणि आकार होईल तो साल दरसाल बा। मु॥ खर्च लिहीत जाणें जाणिजे छ ५ मोहरम सु॥ सबासीतेन मया व अलफ, बहुत काय लिहिणें हे विनंती.

[ ६६ ] ॥ श्री ॥ [१०]

* पु॥ राजश्री बळवंतराव गणपत स्वामी गोसावी यांसि—

विनंती उपरी. श्रीरंगपट्टणकरांचा प्रकार कसा आहे, बुद्धि स्थीर राहून सरकारचा पैका टक्का हसेबंदीचा देऊन दोन पट्टयांतील कोणती पट्टी सोडवितात, किंवा पैका द्यावयास अभाव करून लबाडीवर आहेत, वकील पाठविले याजशीं कसे वर्ततात, यांचे त्यांचें अंतर बाह्य कसें, व सरकारी निष्ठेनें वर्तावयाचा या[११] न वर्तावयाचा ढौल कसा घातला आहे, ते बातमी तुम्हांस येतच असेल तरि विस्तारयुक्त त्यांजकडील वर्तमान लिहीत जावें. अदवानीकरांनीं हा कालवरि ऐवजाचा निकाल केला नाहीं. मौलवी तेथें यख्त्यारी जाले आहेत तरि तुम्हीं त्यांस वरचेवरि ताकीद करून ऐवज राजश्री मल्हार नाईक यांस देविला आहे, त्यांचे पदरीं पडे ते करावें. छ० १४ सवाल हे विनंती.

[ ६७ ] ॥ श्री ॥

पु॥ राजश्री रामचंद्र बावा[१२] स्वामी गोसावी यांसि—

विनंती उपरि दरबारचें वर्तमान व राजश्री श्रीपतराव[१३] निवर्तलियाचा अर्थ पहिला तुम्हांस लिहिलाच आहे. आलीकडील वर्तमान तर श्रीपतराव यांचे

---

८. पर्व-कपिलाषष्ठीचें.

९. स्वामी=कार्तिक स्वामी.

१०. मेहेंदळे यांस बाळाजी बाजीरावानें हें पत्र लिहिलेंसें दिसतें.

११. या=किंवा, अगर.

१२. हे प्रसिद्ध रामचंद्र बाबा शेणवी.

१३. श्रीपतराव प्रतिनिधी (मृ० १७४८.)

* पु॥—पुरवणी.

बंधु राजश्री जगजीवनराव परशराम यांजवरि राजश्री——स्वामींनीं कृपा करून छ १४ जिल्हेजीं पौष शुद्ध प्रतिपदेस प्रतीनिधीपद दिल्हें. वस्त्रें व हत्ती, बहुमान दिला. वरकडही त्यांचे समागमीं मुतालीक व राजश्री कृष्णाजी परशराम यांचे पुत्र दोघे यांसही वस्त्रें [ दिलीं. ] राजश्री उदाजी चव्हाण येथेंच आहेत. अद्याप कांहीं बोलीचाली नाहीं. पुढें होईल वर्तमान तें लिहिलें जाईल. सारांश उभयतां महालचें[१४] अती मान्य जहालें आहे. याचा विस्तार कोठवरि ल्याहावा ? आम्ही युक्ति करून रेटणें तें रेटितों. कांहीं आइकावें लागतें. कांहीं करून देणें म्हणतों. या रीतीनें येथील विचार आहे. राजश्री रघोजी भोसले वराडांतून शाहूर प्रांतें आले. त्यांच्या चित्तांत आमच्या मुलकांत घांवशणें घ्यावें ऐसा विचार आहे. जागांजागांहून महालकरी यांचीं पत्रें येतात. मशारनिले तो स्नेहयुक्तिभावभक्तिचीं पत्रें पाठवितात. तथापि त्यांचा प्रकार कपटी आहे. तो तुम्ही जाणतच आहां. आम्हीही कागदींपत्रीं स्नेहयुक्तच लिहीत असतों. पुढें होईल वर्तमान तें लिहिलें जाईल. येथें येणार ऐसेंही वर्तमान आहे. हे विनंती[१५]

—

[ ६८ ] ॥ श्री ॥

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रामचंद्रबाबा स्वामी गोसांवी यांसि—

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष—तुम्ही पत्रें अधिक शुद्ध त्रयोदशीचीं पाठविलीं तीं छ २९ रबिलाखरीं पंढरपुरीं पावलीं. सर्व वर्तमान कळलें. त्यांचीं उत्तरें आलाहिदा पुरवणी पत्रीं लिहिलीं आहेत. त्याजवरून कळेल. येथील वर्तमान तरि आम्ही क्षेत्र मजकुरीं आहों. या उपरि पुण्यास जाऊं. चिरंजीव राजश्री भाऊ याजकडील वर्तमान तरि ते सावनूर प्रांतीं आहेत. सावनूरकरांची त्यांची भेट होणार. उपरांतिक तिकडील तालमाला पाहून यावें. फार तर पंधरा दिवस तिकडे मोडतील. नाईक सिरे प्रांतीं आहेत. नासरजंग आरकाटकडे जाणार तिकडे छावणी करणार. पाहवें. नबाब बाजरानदीचे तीरें जात आहेत. औरंगाबादेस छावणीस जाणार हेंही वर्तमान असे. तुम्हांस कळवावें म्हणोन लिहिलें असे. *सावनूरकरांची भाऊंची भेट जाहाली. या उपरि पंधरा विसा दिवसां आलीकडे चिरंजीव येतील. नाईक नासरजंगाचे आश्रियानें

१४. महाल—राजस्त्रियेस महाल अशी संज्ञा असे. थोरला किं॰ वडील महाल=मोठी स्त्री. धाकटा महाल=धाकटी स्त्री.

१५. शाहू महाराज यांची तबियत १७२८ सालीं नादुरुस्त होती तेव्हां हें पत्र लिहिलें असावें.

* येथपासून पुढील मजकूर खुद्द बाळाजीच्या हस्ताक्षरीं लिहिलेला आहे.

ते प्रांतीं छावणी करून बिदनूर प्रांतीं उत्पात करणार व करतील. सांप्रत वरसात जवळ आला. काय काय होतें तें पहावें. छ ६ जमादिलावल हे विनंती.

[ ६९ ] ॥ श्री ॥

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसावी यांसि—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ बाळाजीराव प्रधान आशिर्वाद सुरुसन सबा आर्बेन मया व अलफ तुम्ही पत्र छ २४ रबिलाखरचें पाठविलें तें छ २४ जमादिलोवलीं प्रविष्ट झालें. जैतपुरास राजश्री जयापा अगोदर येऊन मोर्चे दिले. मागून आम्ही आलों. बुंधेलियांनीं जैतपुरास सामान बरें विपुल ठेविलें होतें. तोफा, जेजाला व बरकंदाज, दारुगोळा व वाजे सामान बहुत होतें. †रेवणींतून हमेशा झुंजत. आपलेकडील हजार माणोस मेले. चार हजार जखमी जाले. तथापि सुरंग चालवून दोन सुरंग उडविले कांहीं भिताड पडलें तणेंकरून गांवकरी कौलास येऊन अजीच किल्ला फत्ते केला. म्हणोन विस्तारें लिहिलें तें श्रवण होऊन संतोष जहाला. जैतपूर बांकी* जागा व लढाऊ सामान बहुत दारुगोळा विपुल असतां तुम्हीं व बाजे§ सरदारांनीं व लोकांनीं श्रम साहस करून जागा फत्ते केली. शाबास तुमची व शाबास लोकांची. मोठी गोष्ट जाहाली. जैतपूर लहान सामान्य जागा नव्हती. जर हस्तगत न होतें तरि ‡बदनक्षास कारण होतें. तुम्हांसारखे उमदे सरदार इरेस†† पडल्यावर जैतपूर काय आहे? किंबहुना याहूनही बांकी बिकट जागा असल्यास हस्तगत कराल. या उपरि ही तिकडील नवल विशेष व कर्तव्य मनसुबा उल्लेख पुरःसर लिहीत जाणें. जाणिजे छ २८ जमादिलोवल बहुत काय लिहिणें.

(शिक्का.) (लेखन सीमा)

पै॥ व जा-पासुन स्वामीन ( ? ) पै॥ छ शाबान मु॥ गहबरा पे॥ सेवळा.

[ ७० ] ॥ श्री ॥

राजश्री सदाशिवपंत भाऊ गोसांवी यांसि—

सकळ गुणाळंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ मल्हारराव होळकर दंडवत विनंती उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहीत असावें. विशेष—इकडील सरदारींत खर्चाची वाढ. महलांत पेशजी प्रो॥ उत्पन्नास जागा नाहीं. फौज बाहेर मोहीमीस रहात गेली. सध्यां तो प्रकार

---

† रेवणी-रेवण=मातीचा ढीग किंवा बुरूज.
* बांकी=मजबुदीची.
§ बाजे=दुसरे, हाताखालचे, अवांतर. वर 'वाजे सामान' पहा.
‡ बदनक्षा=कमीपणा; दुर्लौकिक.
†† इर=ईर्षा.

सर्व आपले ध्यानांत. तीर्थरूप कैलासवासी बाबासाहेबांनीं पदरचे माणश सर्व लोभांत ठेऊन फौजेची हुशारी ठेविली तो ओघ यथास्थित चालून सरकार चाकरी घडावी याहून दुसरें लक्ष नाहीं. राजश्री गणपतराव नारायण येथें कामाकाजांत व राजश्री बाळाजी लक्ष्मण देशीहून आले, त्यांचें म्हणणें श्रीमंत स्वामींचे अभयोत्तरें व भाऊंचे लोभानें सर्व विचार घडतील. येविषयींच मार राजश्री खंडो महादेव व सखाराम जगज्जीवन यांजला लिहिण्यांत आला आहे. उभयतां कळवितील त्याशीं श्रीमंतांस विनंती होऊन क्रमें यथापूर्व प्रवाहास येऊन वडिलांचा लौकीक राहणें आपल्याकडे आहे.

[ ७१ ] ॥ श्री शंकर ॥

राजश्री बाळाजी पंडित प्रधान गोसावी यांसि—

छ सकळगुणाळंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो॥ हणमंतराऊ निंबाळकर दंडवत विनंती उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लेखन करीत गेलें पाहिजे—विशेष आपणांकडून राजश्री काशीराऊ दिवाण व राजश्री राजजी जुंझारराऊ घाटगे व रा॥ तुकोजी चव्हाण आले यांनीं आपणांकडील कितेक स्नेहाचें व उत्तर प्रत्योतर जाल्याचें वर्तमान सांगितलें त्यावरून कळोन आलें. ऐशियासि आपणांशीं जो निश्चय हे करून आले त्याप्रमाणें राजश्री फिरंगोजी निंबाळकर यांजबा॥ दोन हजार फौज देऊन रवानगी केली येविषयीं राजश्री दतवांनींही गोसांवी यांसि पत्र लिहिलें आहे. त्यावरून विदित होईल. उभयपक्षीं दुसरा विचार आहे ऐसें नाहीं. रा॥ छ. २६ रोवल बहुत काय लिहिणें कृपा असो दीजे हे विनंती.

(श्री
शिवचरणीं तत्पर
बापुजी सुत हणमंतराव निंबाळकर)

(मोर्तब
सूद)

[ ७२ ] ॥ श्री ॥

राजश्री यादवराव बल्लाळ दिमत बजाजीराव घाटगे स्वामींचे सेवेशीं पो॥ शामराज बल्लाळ फडणीस कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती विशेष राजश्री पांडुरंगराव यादव यांजकडे मजमदारीचें काम देविलें त्यास त्यांचे हातून काम घेऊन वेतन देववीत जाणें. राजश्री परशराम पंडित व जयवंत बावा मंत्री व रघुनाथराव पंडित सचिव व रघोजी भोसले सेनासाहेब सुभा व राजमंडलचे कारभारी व बाळाजी जनार्दन व परशराम रामचंद्र व परशराम सदाशिव व त्र्यंबकराव सदाशिव व जयवंतराव बावा व फत्तेसिंग बावा गायकवाड याप्रमाणें हुजूरची मंडळी

* बाबासाहेब=बाजीराव बल्लाळ.

यावयाची. त्यास राजाजीराव घाटगे व बहिरजीराव व निराजी शामराज व शामराज निळकंठ पेशवे व निजाम अलीखान व हैदरखान व मुरादखान वगैरे व राघोजी आंगरे वजारतमाव सरखेल व गोविंदराव गायकवाड हिंमत बहादूर याप्रमाणें राजमंडल यावयाचें त्यास त्यांची बरदस्त बरावर मंडळी सुभानराव व घोरपडे व पिराजीराव घोरपडे व शामराव गोविंद व जानराव बाजीराव हालकर [ ! ] याप्रों यावयाची. त्यास त्यांची बरदस्त ठेवणे. रा छ २ जमादिलावर बहुत काय लिहिणें हे विनंती.

[ ७३ ] ॥ श्री ॥

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रामचंद्र बाबा स्वामी गोसांवी यांसि—

पोष्य बाळाजी बाजीराव प्रधान नमस्कार विनंती उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहीत जाणें. विशेष—दरबारचा मजकूर विस्तारें §सरदारांस लिहिला त्याजवरून कळेल. आमचा गुत्ता आजपर्यंत दरबारीं व्हावयास कारण काय म्हणाल तर राजश्री स्वामींचें सरकार कर्जदार झालें व महालचे खर्च अनिवार. नित्य ला [ क ! ] थळें यास्तव राजश्री—स्वामींनीं आपले कारभारी यांस ताकीद करून बंदोबस्त करितात. परच्याच कारभारांत राजश्री—स्वामी दंग आहेत. त्यांहीं होऊन आम्हांस निरोप द्यावा तर आपले कारभारांत गिरिफ्‌दार[16]. आम्हीं विनंती करावी तर त्यांची मर्जी दीक्‌[17] पाहून आज पावेतों चर्चा न केली. राहात राहात गोष्ट राहिली. आम्ही निरोपाच्या विचारांत आहों. राजश्री—स्वामींची मर्जी पाहून निरोप घेऊन, परंतु (?) यश येणें आमचें तिकडे होतें असा विचार नाहीं. निरोपासच किती दिवस लागतील तें नकळे. निरोप होऊन पुणियात आलियावर कोंकणचा वगैरे कारभार करणें लागेल. तुम्हांस कळावें याजकरितां लिहिलें असे. छ १६ सव्वाल बहुत काय लिहिणें हे विनंती.‡

[ ७४ ] ॥ श्री ॥

राजश्री मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे गोसांवी यांसि—

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—स्नेो बाळाजी बाजीराव प्रधान अशीर्वाद सु॥ सबा अर्बैन मया व अलफ. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. बुंदेलियांनीं बदअमली[18] केली तदरहावर गोष्ट पडून बेरीज ठहरली. बोला कांहीं दिल्हा. कुंवर बोलेत द्यावे. इतकी बाकी असतां उभयतां राजे पळून गेले. कालिंजर व अजेगडास गेले. बुंदेलि यांचा मोठा गुबेर[19] होता तो

§ सरदार=शिंदे व होळकर.
१६. गिरीफदार=गुतलेले.
१७. दिक्‌=खिन्न.

‡ मागें पृ० ६१ टी० १५ पहा.
१८. बदअमली=उद्दाम वर्तन.
१९. गुबर, घोबार=भ्रम.

त्यांचा त्यांणी गमाविला. अतःपर जें करणें तें नेट धरूनच करावें लागेल. स्वामींच्या पुण्यप्रतापेंकरून उत्तम होईल. म्हणोन लिहिलें तें कळलें. ऐशास तुम्ही श्रमसाहस कर्तव्य तें केलें. व बुंधेली यांचा बचाव करून दारमदार[20] केला असतां त्याचे दुरादृष्टें[21], दुर्बुद्धे तदनुरूप यांचे मनांत येऊन पळून गेले. येणेंकरून सर्व गोष्टीनें खराब तेंच जाहाले. तुम्हीं कर्तव्य तें करालच व केलेंच पाहिजे. असो. येविशींचे कितेक पर्याय राजश्री रामचंद्र बाबांच्या पत्रीं लिहिले आहेत. त्याजवरून कळेल. आपल्याकडील सदैव वर्तमान लिहीत जावें. जाणिजे. छ २९ जमादिलावल बहुत काय लिहिणें. पै।। छ ७ साबान मु।। गहबरा पो चे [से?] वद्य.

(शिका.)

(लेखन सीमा.)

[ ७५ ] ।। श्री ।।

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री रामचंद्रपंत तात्या व ता।। राजश्री त्रिंबकजीपंत दादा स्वामींचे सेवेशीं—

पो विष्णु महादेव साष्टांग नमस्कार विनंती उपरि येथील कुशळ ता।। छ १० साबान मु।। नजीक महेश्वर, वर्तमान यथास्थित जाणोन स्वकीय कुशळ लिहीत असलें पाहिजे. विशेष—आम्ही करवादचे मुकामीं होळकराजवळ दाखल झालों. आपलीं पत्रें त्याच मुक्कामीं आलीं. त्यांत लिहिलें आम्ही शिवणी कुसंगाबादेवरून भूपाळावरून खेचिवाड्यांत येतों. ऐशास आपला पहिला करार जे बढव्याचे घाटे यावें,-आणि शिंदे, होळकर सर्व इकडेच आहेत. हे, आपण येकत्र होऊन मनसबा पुढें करणें तो करावा. हा उत्तम विचार. आणि तुम्हीं त्या मार्गें जावयाचा मनसबा केला म्हणजे हे उभयतां इकडे मनसबे करतील. शिंदे यांनीं तो उदेपूरचे मुलींचा पक्ष धरून त्याजला घेऊन संस्थानाकडे[23] चालले. ते मुलींची स्थापना करून संस्थानचा पैका घेणार. हा त्यांचा मनसबा. होळकर महेश्वराहून निघाल्यावर मनसबा काय करतील तो करोत. आम्हांस श्रीमंतांनीं इकडे पाठविलें व आपला आग्रह जाणोन आलों. श्रीमंतांची आज्ञा आपणांस व हे उभयतां सरदार एकत्र करून सरकारी काम करावें. आपण त्या मार्गें गेले-तेव्हां तिघांचे तीन मनसबे जाले म्हणजे आम्ही मग राहून उपयोग नाहीं त्यास सविस्तर वर्तमान रा दादोपंत दादांनीं लिहिलें आहे, त्यावरून कळों

२०. दारमदार=मानसन्मान.
२१. दुरादृष्ट दुरदृष्ट=कमनशीब, दुर्दैव.
२२. मूळांत 'खु' असें दिसतें.
२३. मूळांत 'सं।।नाकडे' 'सं।।चा' असें आहे.

येईल. तदनुसार आपण याच मार्गे यावयाचा मनसबा *क्षेपनिक्षेप करावा त्या मार्गे जाऊन सां चुकतील. त्याहून या मार्गे मोठ्या मनसब्याचा बंदोबस्त करून उदेपुरचाही बंदोबस्त केल्याने सरकार काम आहे. आम्हासही तूर्त उपयोग पडेल. यास्तव याच मार्गे यावें हें उत्तम आहे. याउपर आपली मर्जी त्याचमार्गें जावयाची असल्यास मग आम्ही यां समागमें कशास रहावें? रा। दादा व आम्ही देशास जाऊं. आम्हांस सर्व प्रकारें लक्ष आपलें यास्तव आम्हीं येथपर्यंत आलों. पुढें आपलें पत्र जसें येईल त्याप्रमाणें तजवीज करूं. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विनंती.

[ ७६ ] ॥ श्री ॥

छ १ रमजान वैशाख तिसा खमसेन.

राजश्री नाना पंडित प्रधान गोसावी यांसि—

सकळ गुणाळंकरण अखंडित लक्ष्मी अळंकृत राजमान्य स्ने॥ राघोजी आंगरे वजारतमाब राम राम विनंती येथील कुशल जाणोन स्वकीय लेखन आज्ञा करीत असलें पाहिजे. विशेष—छ ५ शाबानचें पत्र पाठविलें तें छ २२ मिनहूस उंदेरीचे मोर्चेबंदीस थळचे मुक्कामीं येऊन पावलें. मुख्यार्थ कीं, उंदेरींत पाण्याची अनुपत्य[२४] जाहाली आहे. वैशाखांत तरि भारीच होईल. सुरतेकडाल वळ तुटलें. यामुळें शामल[२५] अवसान खाता जाला असतां चोरपाइ[२६]की अवसान धरून करितो. राजपुरींचीं गलबतें नेलीं. उंदेरीस साज सामान घेऊन येतो. उलटी सलाबत[२७] त्याचीच पडोन आली आहे. त्याचें पारिपत्य होत नाहीं हें अपूर्व असे. किरकोळ उपद्रव मुलकांस होतात ते केवळ जंजिरे याहूनच होतात ऐसें नाहीं. उंदेरीहून होतात ऐसें निदर्शनास येतें. याउपरि सारीं आरमारें येकत्र होऊन या समयांत सर्वांनीं एकदिलीनें लगट केलियास स्थळ हस्तगत होऊन यावयास अगाध नाहीं. येविशीं विस्तारें राजश्री रामाजीपंतास लिहिलें आहे. म्हणोन नशीहतपूर्वक आज्ञा केली. ऐशास उंदेरकरांचे व जंजीरकरांचे पारिपत्याची योजना होऊन राजश्री शंकराजीपंतास व राजश्री नारोपंतास व राजश्री रामाजीपंतास पत्रें सादर जालियाची आज्ञा छ १४ मिनहूचें पत्र खास दस्तुराचें मुजरद[२८] जासुदा समागमें आलें तें छ १८ तेरखेस माहे मजकुरीं पावलें. आज्ञेचे निकडीप्रमाणें वसैपैकीं व राजश्री नारोपंतीं आरमार सुद्धां येऊन पावावें. सारें येकत्र होतांच

* क्षेपनिक्षेप=ठाकोठाक.

२४. अनुपत्य=अनुत्पत्ति=दौर्लभ्य. अभाव.

२५. शामल=हबशी.

२६. चोरपाइकी ( चोर+पायिक ) चोरून हल्ला करणें.

२७. सलाबत=सुदैव, यश, जरब.

२८. मुजरद=नाबदतोब, मुद्दाम.

जीवांभ्य[२९] अर्सेकडून श्रम साहसास अंतर न करावें. हाच करस्त[३०] धरून आरमारची प्रतीक्षा आज पावेतों करीत आहों. तथापि अद्याप येऊन पावलें नाहीं. पत्राची विनंती लेहून पाठविली आहे. त्यावरून सेवेशीं निवेदन जाहालेंच असेल. अखेरीचे दिवस, अवकाश बहुतसा राहिला नाहीं. आज्ञेचा अर्थ निकडीचा जाणोन येथून मुजरद महागिरी[३१] मशारनिल्हे शंकराजीपंताकडेस व नारोपंताकडे पाठविली आहे. त्यांनें यावें म्हणोन लिहिलें असे. वरकड किरकोळ उपद्रव चोरी छपीनें उंदेरीहूनच होतात. जंजिराहून होत नाहीं म्हणोन तरि उंदेरीचे मोर्चेनेहीस चौकशा कुलाबापासून थळ नवगांवचे खाडी पावेतों आम्हांकडील नवगांवापासून केहीम, आव्हास, सासवेन, मांडवें, रेवस पावेतों राजश्री महादाजी रघुनाथ यांहीं रेवदंडकर, रायगड भोरपकर लोक जागा येऊन बंदोबस्त केला आहे. उरण खाडीची खबरदारी उरणाहून होत असतां उंदेरकराची महागिरी तडीस लागावी ऐसें नाहीं. एक दुसरा होडीस्वर काळोखे रात्रीस येत जात असेल. तरीच कोठें आग लावावी, धोंडे मारावे हे उपद्रव होतात. याजवरून नित्य चौकीदारांचें पारिपत्य करणें तें करीत असों. व राउतांचा छबीनाहि होतो. खबरदारीस आम्हांकडून व महादाजीपंताकडून अंतर पडत नाहीं. किरवाडी माडलतपा(?) अष्टमीकडून चोर येऊन तुमचे टापेंत रयतेस मारामार उपद्रव केला. जंजीरकर प द म (पद्म ?) दुर्गकरी ऐसे रयतीजवळ सांगत गेले. त्यांचे शोधास आम्हांकडील व मशारनिल्हे महादाजीपंताकडील लोक मुलखांत घालून रात्रंदिवस शोधास लागलोंच आहों. जंजीरकरास व प द म दुर्गकरी यांस बंदरें अनकुल व राना जंगलाचा आश्रय बहुत. रानांत दबा देऊन काळोखे रात्रीचे संध्यानून चोरी कर्म आचरतात. तिकडील मामलेदार खबरदारी करीतच आहेत. सारांश योजिले मनसबे याप्रमाणें येसाई जागा निकडीचा प्रकार या समयास व्हावा हेंच कार्याचें आहे. श्री कृपेनें व आपले तपोबलें कार्यसिद्धि होऊन आलियास सारेच उपद्रव दूर होतील. जळमार्गें उंदेरीस सामान चोरी छपीनें नेतो त्याचे बंदोबस्तास आम्हांकडील गुराबा[३२] गलबतें महागिरिया दक्षिणभागीं मार्ग अवरोधोन ठेविल्या आहेत. याचप्रमाणें उत्तरभागीं महागिरिया व गलबतें मशारनिल्हे महादजी पंताकडील येऊन रात्रंदिवस छबिना होत असतां उंदेरीस सुर्वेसमीप काळोखे रात्रीस चोरी छपीनें महागिरी येते जाते त्याचे पैरवीस आरमारकरी लाविलेच

शिक्का

---

२९. जिवाभ्य=जीवापलीकडे.
३०. करस्त=कष्ट, निश्चय.
३१. महागिरी=एक प्रकारचें तारूं.
३२. गुराबा=एक प्रकारचें तारूं.

आहेत. गांठ पडतां जीवाभ्यश्रम करून दस्त[33] करावयास चुकणार नाहीं, फाल्गुनमासीं रात्रौ महागेरी येतां आम्हांकडील आरमारकरी यांनीं पिच्छा केला. तडीस येतां रेवदंड करांहीं मर्दुमी करून फोडून दस्त केली. या प्रकारचें वर्तमान आहे. दर्या अफाट, चौगीर्द[34] आरमारचा परीघ असावा. सारें आरमार येकत्र जडाव जालियावर चित्तानरूप सेवा घडोन येईल व यावी हाच कस्त व उमेद असे. स्वामी सेवेचे ठायीं आम्हांपासून कसूर कोताई हा काल पर्यंत जाली नाहीं व पुढेंही होणार नाहीं. हेंच निश्च मनोमानसीं असेच. अंतरसाक्ष आपण समर्थ आहांत. राजश्री रामाजीपंतही लौकरीच नेणार येतील. त्यांचें अनुमतें श्रम साहसास दुसरा विचार घडणार नाहीं. रा॥ छ २४ माहे शाबान बहुत काय लिहिणें कृपा वर्धमान असावी हे विनंती. (मोर्तब-सूद)

[ ७७ ] ॥ श्री ॥

पु॥ राजश्री रामचंद्र बावा स्वामी गोसांवी यांसि विनंती उपरि बाबूजी[35] नाईक यांणीं कर्नाटक प्रांतीं न जावें. गेले तरि धुडाऊन काढावें याजकरितां चिरंजीवांची[36] रवानगी कर्नाटक प्रांतीं केली. त्याचा मजकूर विस्तारें लिहिलाच आहे. प्रस्तुत नाईक यांणीं राजश्री—स्वामींस दोन लाख रुपये रोख द्यावे ऐसें केलें होतें ते रोख निशा केली. बाकी राहिले ऐवजाचे हते करून याद राजश्री येसाजी भोंसले यांजपाशीं दिल्ही. व धेरनुरचा साडेतीन लक्षांचा कतबा होता तो मा॥रनिल्हे जवळ देऊन निरोप घेऊन गेले. पुढें नवाबास[37] भेटून नवाब म्हणतील तें द्यावें आणि तेवढियावरि ठाकुरकी[38] वाढवून कर्नाटक प्रांतीं जावें ऐसें आहे. नवाबाचा विचार पाहतां दोहीं दगडीवर हात आहेत. नाईकांची प्रतीक्षा करीत आहेत. व आमची फौज सोंधे बिदनुर प्रांतें गेली आहे. यांसही पैका न मिळावा याही उद्योगांत आहेत. श्री इच्छेनें इतकियाही गोष्टींचें निराकरण होऊन उत्तमच होईल. कांहीं फिकोर आहे ऐसें नाहीं. तुम्हांस वर्तमान कळावें म्हणोन लिहिलें असे. पुढें ही होईल तें लिहिलें जाईल. रा॥ या मनसब्याचे मजकूर किरकोळ किरकोळ फार आहेत. पत्रीं काय ल्याहावें श्री कृपेनें दर्शनोत्तर कळतील. छ २२ सफर हे विनंती.

---

३३. दस्त=ताबेंत, हस्तगत.

३४. चौगीर्द=चहूंबाजूंनीं.

३५. बाबूजीनाईक बारामतीकर—यांनीं आपल्यास पेशवाई मिळावी ह्या अर्थे सन १७४० सालीं बाजीराव बल्लाळ निवर्तल्यावर रघूजी भोसलें यांचे मार्फत उद्योग चालविला होता. पण तो सिद्धीस गेला नाहीं. त्यामुळें नाईक यांशीं बाळाजी बाजीरावाचें बरें नवतें.

३६. चिरंजीव—सदाशिव चिमणाजी असावे.

३७. हे नबाब सावनूरचे असावे.

३८. ठाकुरकी=लौकिक, अबरू.

[ ७८ ] ॥ श्री ॥

पु॥ राजश्री रामचंद्र बावा स्वामी गोसावी यांसि—विनंती उपरि चिरंजीव राजश्री बाळा निरोप घेऊन गेलियावरि फिटूर म्हणोन ठाणें गिराशि[३१]यांनें राजश्री नारायणराव घोरपडे यांचें होतें तें बळाविलें म्हणोन घेऊन दिल्हें. पुढें मजल दरमजल सोंधियाचे लति[३२]यांत गेले आहेत. सावनूरकरांचा तह रह होणें तें होत आहे. अद्यापि चुकला नाहीं. सोंधेकरी यांची रदबदल लागली असे. बिदनुरास वकील गेले आहेत. फिरंगि[३३]यांवरि दबाव असे. जयराम सांवत येऊन भेटले आहेत. तेही आपलें सांहित्ये[३४]च्या गोष्टी बोलतात कीं रेडी वगैरे फिरंगियानें घेतले आहेत त्यास तवी पोंहाचाऊन घ्यावीं, आपली स्थापना करावी. फिरंगी आपली बोली बोलतात कीं सांवत आम्ही समजोन घेऊं. तुम्हीं त्याचा पक्ष न करावा. या प्रकारचें वर्तमान आहे. पहातां अर्थी फिरंगी बेइमान त्याचें पारपत्य करावें तरि येसमयीं बनत नाहीं. दोन्ही ही अलग अलग राखिले आहेत. कां कीं, सावनूरचा दार मदार करणें तो करून घेऊन, सोंधेकरांचीही मामलियत चुकऊन बिदनूरकरांकडे जावें, तेथील मामलियत विल्हेस लाऊन खबरदार होऊन राखा [हा ?] वें. सारे पठाण एकवट करावे. नाईक[३५] आले तरि त्यांस धुडाऊन द्यावें. ऐसा विचार असे. पुढें विचारें होतां होईल तें करीतच असों. रा॥ छ २२ सफर हे विनंती.

[ ७९ ] ॥ श्री ॥

तीर्थरूप राजश्री नाना स्वामीचे सेवेशीं—

आपत्यें सदोबानें साष्टांग नमस्कार विनंती उपरि येथील कुशळ ता॥ छ १२ जमादिलोवल मुक्काम पुणें. स्वामींच्या आशिर्वादें करून यथास्थित असे विशेष—स्वामी कोठें आहेत, माघारे फिरले न फिरले, कोणे जागां आले, हें कांहींच वर्तमान कळत नाहीं. तरि स्वामींनीं सविस्तर वर्तमान वरच्यावरि ल्याहावयास आज्ञा केली पाहिजे. इकडील वर्तमान तर आम्ही राजश्री* स्वामींचा निरोप छ २ जमादिलोवलीं घेऊन पुण्यास आलों. स्वामींस वर्तमान कळावें यास्तव लिहिलें असे. राजश्री बापूजी नाईक यांस राजश्री स्वामींनीं कर्नाटकचा मामला मुकासा सांगून गौरव केला. तो अर्थ विस्तारें स्वामींस लिहिलाच आहे, त्याजवरून विदित होईल. राजश्री आबाजी नाईक राजश्री—स्वामींच्या दर्शनास

३१. गिराशी=डोंगरी लुटारू.
३२. लतियांत=हद्दींत, शिवेंत.
३३. फिरंगी—हे गोंवेकर पोर्तुगीज.
३४. साहित्याच्या=मदतीच्या.
३५. नाईक बारामतीकर बापूजी.

वरील २२ सफरचें पत्र पहा.

* राजाचें नांव अदबे खातर न घालतां 'राजश्री' शब्दापुढें कोरी जागा टाकून पुढें 'स्वामी' वगैरे बहुमानदर्शक शब्द लिहिण्याची वहिवाट असे.

गेले होते. त्यांस छ ९ जमादिलोवलीं राजश्री—स्वामींनीं निरोप दिल्हा. वस्त्रें:—१ मंदील, १ महमुदीचा झगा, १ चादर मोराची. १ पदक हत्तीचा मजुरा दिल्हा.

येणें बहुमान करून आबुराव किताब देऊन निरोप दिल्हा. स्वामींस कळावें यास्तव लिहिलें असे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंती.

[ ८० ] ॥ श्री ॥

श्रीमंत राजश्री—भाऊ साहेब स्वामींचे सेवेशीं.—

विनंती सेवक जयाजी शिंदे कृतानेक विज्ञापना येथील वर्तमान ता॥ छ १ सवाल पावेतों मुक्काम नजीक सिपाबरड स्वामींचे कृपावलोकनें करून यथास्थित असे विशेष. मजल दरमजल रेवापार आलियाचें वृत्त पूर्वीं विनंती पत्रीं सेवेशीं लिहिलें आहे, त्याजवरून विदित जालेंच असेल. स्वामींचे आज्ञे प्रें॥ जल-दीनें येऊन पोहोंचावें, परंतु पर्जन्याचे अतिवृष्टिमुळें जागां जागां गुंता होत गेला. हल्लीं कांहींशीं उघाडी जाल्यांवर तिन्हीं लष्करें§ वार उतरलों. प्रस्तुत पर्जन्यही थोडका आहे. याउपर जलदीनें च्यार पांच रोजीं बऱ्हाणपुरास दाखल होतों. बऱ्हाणपुरचा बंदोबस्त होऊन येईल तदनुसार मागाहून सवि-स्तरें सेवेशीं लिहून पाठऊं. वरकड निराळें पुरवणी पत्रीं सेवेशीं लिहिलें आहे, त्याजवरून निवेदन होईल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ ८१ ] ॥ श्री ॥

राजश्रिया विराजित राजमान्य राजश्री बापूजी बाजीराव स्वामी गोसावी यांसि पोष्य सदाशिव चिमणाजी नमस्कार विनंती उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत जाणें—विशेष तुम्हीं निरोप घेऊन गेलां तेव्हां राजश्री व्यंकटराव यांजकडील स्वार पथक तुह्मांबरोबर पाठवितों म्हणोन सांगि-तलें व त्याजवरून मशारनिल्हेकडील कारकुनासही आज्ञा केली. ते तुम्हांकडे आले त्यांणीं तुम्हांस खर्चावेचाचा मजकूर पुसला त्यास तुम्हीं त्याजपाशीं साफ बोललां कीं "श्रीमंत राजश्री नाना स्वामी यांणीं कांहीं आपल्यास द्यावयाची बेगमी केली नाहीं. आपण कोठून द्यावें ? तरि श्रीमंत राजश्री भाऊ यांज-पाशीं जाऊन आपली रोजमरीयाची बेगमी करून घेणें." त्याजवरून मा॥र-निल्हेचे कारकून येथें आले कीं, "आपल्यास खर्चावेचास देत नाहीं याप्रमाणें बोलतात. तरि त्याजबरोबर जाऊन पोटास काय करावें ! आणि लावयासही

§ ग्याजुदीनखां, निजाम उल्मुकाचा व-डील मुलगा, यास हैदराबादचा सुभा बन-विण्याकरितां शिंदे होळकर घेऊन दक्षिणेंत येत होते त्या वेळचें हें पत्र आहे. तीन लष्क-रें शिंदे होळकर व खुद्द ग्याजुदीन यांचीं. वार—'पार' तर नव्हे.?

मार्गे पुढें घेतात. " त्यास तुम्ही सरकारचें निशाण व हत्ती बरोबर घेऊन जातां. फौज अलबत्ता हजार बाराशें असली पाहिजे. केवळ हत्ती आणि चार तट्टें आपण जाईन म्हटल्यास कैसें बनतें? ह्यामध्यें राजश्री राणोजी शिंदे लांबले तेथपर्यंत तुम्ही जा [ ल ] तोंपर्यंत बरोबर फौजही पाहिजे. व जे फौज येईल त्यांस कांहीं पोटासही दिल्हें पाहिजे. विना दिल्याघेतल्याबगर सरदारी कैशी चालते? व बोझ कैसा राहतो? हा अर्थ तो सर्वही तुम्हांस ठावकाच आहे. हें जाणून राजश्री त्रिंबकराव विश्वनाथ याजपाशीं तुम्ही बोलला होतां कीं, " श्रीमंत राजश्री नाना स्वामींनीं तो कांहीं खर्चावेचाची बेगमी केली नाहीं. भाऊ जवळ मागावें तरि त्यांस कांहीं लिहिलें नाहीं ऐसें असतां हे कांहीं देतात ऐसें नाहीं. सरदारी तो चालली पाहिजे. याजकरितां श्रीमंतांचे नांवावर व सरदारीवरि पांच हजार रुपयेपर्यंत घेऊन रोखा लिहून दिल्हा. घेऊन जातों. पुढें देणार खावंद आहेत. " ऐसें बोलले असतां मा॥रनिल्हेकडील कारकुनास साफ जाब दिल्हा हें कैसें कार्यास येतें? या उपरि मा॥रनिल्हेस पाठवावें तरि ते जात नाहींत तरि मशारनिल्हेचे राऊत तुम्हांबराबर पाहिजेत व यांस राजश्री रामचंद्र बावापर्यंत जा[ ल ] तों. थोडे बहुत खर्चा[ स ] देऊन घेऊन जावें लागतें. तरि या पत्राचें उत्तर जलदीनें पाठवावें कीं, मशारनिल्हेकडील राऊत पाठऊन द्यावे. त्यांस थोडें बहुत खर्चास देऊन घेऊन जातों, या प्रकारचें उत्तर जलदीनें पाठऊन द्यावें म्हणजे तेंच पत्र बजिन्नस[२४] त्यास दाखऊन त्यांजला तुम्हांकडे रवाना करितों. सारांश बा[२५] की सरदारीचा बोझ उचलल्याखेरीज भारीपणा कैसा पडतो! केवळ आंगावेगळेंच टाकलें तरि सरदारीचा आबही राहिला पाहिजे. हा अर्थ सर्व तुम्ही जाणतां. लिहिणें काय आहे! तरि या पत्राचें उत्तर जलदीनें पाठऊन द्यावें. दिरंग न लावावा. रा॥ छ १० जिल्हेज बहुत काय लिहिणें हे विनंती.

[ ८२ ] ॥ श्री ॥ छ २२ साबान.

पुरवणी तीर्थरूप राजश्री नाना व राजश्री भाऊ स्वामींचे सेवेशीं.

विनंती उपरि राजश्री फत्तेसिंग बावा याणीं सांगितलें याप्रमाणें स्वामींस लेहून पाठविलें, त्याचें उत्तर स्वामींनीं लिहिलें त्यांत मजकूर कीं, रघोजी बावांस कर्नाटक होतें कीं काय? हा अर्थ स्पष्ट उघडक पाहिजे. दुसरें, बावानीं तमाम सरदार सरंजामी फौज जमा करावी. कर्नाटकांत पाय पडला तरि घालावा. न पडे तरि बराड देवगडाकडे जावें. गेले तरी चालेल. परंतु हिम्मत

२४. बजिन्नस=खुद्द तेंच, अस्सल.
२५. 'बा' आणि 'की' यांचे दरम्यान एक अक्षर असून तें फाटलें गेलें आहे.

झाली पाहिजे. व निरोपही व्हावा. आपण खामखा* घ्यावा. बाहेर निघावें. आम्हीही फौजेचें साहित्य करूं. कर्ज मात्र आम्हांस द्यावयास अनुकूल पडणार नाहीं. बाबानीं उत्पात केला तरि कर्नाटक यास होईल कीं काय हा शोध बाबानीं थोरले वाडियांत§ चालून पहावा म्हणून लिहिलें. ऐशियास फत्तेसिंग बाबाचा कारभार आहे, तो स्वामी† जाणतात. त्यांचें सर्व साहित्य मनसुब्याचें आपण केलें पाहिजे. पैका कर्ज द्यावयास मात्र मिळणार नाहीं तरि तेवढी गोष्ट नसो, परंतु वरकड तरी सर्व जालें पाहिजे. सरंजामी फौज ते मेळवितील. आपली ही मातबर फौज समागमें व मनसबा आपणास करावा लागतो याचा स्पष्ट भाव त्याशीं बोलला पाहिजे तेव्हां ते उद्योगास लागतील. ऐशियास त्यांस सरदारी करणें आणि आम्ही होऊन उत्पात कां करावा ? त्यांची त्यांस दरकार आहे कीं नाहीं ? असें स्वामी† म्हणतील. तरि त्यांची त्यांस अवश्यकता असावी [ हें ] उचितच; परंतु त्यांस घरीं राहिल्यानें काय सुख नाहीं ते बाहेर निघोन हैराण व्हावें ? मशारनिल्हेनीं स्वामींचा† अविलंब धरिल्यास तीन वर्षें जालीं. परंतु फलादेश कांहीं उत्कर्षें करून जाला नाहीं हें त्याचें टेपर स्वामींवर† आहेच. दुसरें, हे लगामी असल्यास कित्येक गोष्टी उपयोगास पडतात. बाहेर काढिल्यानें त्याचें टेपर दूर होऊन त्यांत आपलाही कार्यभाग असे. हौल चित्तांत आणून यांस बाहेर निघण्याविशीं उत्तेजन देऊन करावें. त्यास येविशीं स्पष्ट स्वामींचा भाव कळला पाहिजे. तेव्हां त्याशीं बोलावें अथवा त्याणें विचारिल्यास अव्वल जाब करावा. कर्नाटक रघोजीबावास होतें न होतें याचा अर्थ पेशजी चोपदारास मोघम लिहिलाच आहे. अद्यापि कांहीं चर्चा नाहीं. परंतु राजश्रींचा‡ भाव आबाजी नाईक यास पुढें करून रघोजीस आंत घालावा असा आहे. हाच घडिल्यास फत्तेसिंगबावासही त्यामध्यें मिळावयास उत्पात केलाच पाहिजे. न करीत तरि आम्हीं करावा. काय निमित्य कीं, बाबूजी नाईक व आबाजी नाईक यांच्याशीं खरीं का व्या [ ? ] लागावयाची बाकी राहिलीच नाहीं. **आबाजी नाईक जाले तरी काय ? वाडियांतील वगैरे पेच पडतील. व आपण वाढविला त्याचें बरें कसें चालावें या अर्थें मात्र आबाजी नाईक यांस पुढें करणें. नाहीं तर रघोजी बाबाचेच स्वाधीन असें जालियास कर्नाटक त्यांचे घरास जाऊं देणें उचित नाहीं. यास्तव जरूर पाय धरून पाडावें. येविशीं स्वामींची आज्ञा काय ? तिसरें, फत्तेसिंग बावानीं थोरले वाड्यांतील

---

* खामखा, खामखाय=खचित, कांहीं झालें तरी.

§ थोरले वाडियांत=थोरल्या राणीकडे.

† स्वामी=नाना व भाऊ.

‡ राजश्री=शाहू महाराज

** हे नाना सांचे मेहुणे.

मर्जी कर्नाटक होतें न होतें हे पहावी ऐशी आज्ञा स्वामींची. तरि थोरले बाईंचे कर्ज नाइकांकडे आहे. त्याचा निकाल तीं आधीं पुसतील. दुसरे राजश्रींचे देणें याचा विचार जाला पाहिजे. जे कर्नाटकाचा कारभार जालियास दिवाणांत ऐवज देणें पडेल तो फतेसिंगबावा स्वामींस द्यावा म्हणतील. हा एक पक्ष. दुसरे कदाचित बाईनीं म्हटलें कीं, आवाजी नाइकास पुढें करून राजश्री दुसरे साहित्यास देणार तरि नाईक माझे अगत्यवादाचा, मी कर्ज दिल्हें आहे तें मामल्यावरीच दिल्हें आहे, तेव्हां मामलाही माझाच आहे. आवाजी नाईकास समागमें घेऊन तुम्हींच करावें. म्हणजे दोन्हीही पक्ष मजकडेच लागले. रघोजी धाकटे बाईचे पक्षींचा, त्यासही तोंडघशी दिल्हें. असें बोलली तरि याचा विचार काय करावा. आणि जरी बाईसी लाघावळ लाऊन कांहीं आशा दर्शविली व राजश्री धाकटे बाईचे अगत्यवादामुळें रघोजीस कर्नाटक सांगणार असें बोलल्यास आवाजी नाईक यांस राखून तुम्हीं करा असें बाई बोलतीलसें वाटतें. यास्तव सुचला विचार स्वामींस लिहिला आहे. तरी तीहीं पर्यायाचे स्फूर्दरूप समर्पक साल्जाब [ जावसाल ? ] पाठवावयास आज्ञा करावी. त्रिचनापल्ली वाहत [ ? ] सनसीतचे ऐवजाचा हिशेब वगैरे याची पुरवणी आलाहिदा लिहिली आहे त्याचेंही उत्तर सादर करावें. विदित जाहालें पा।. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.[४६]

[ ८३ ] ॥ श्री ॥ पै॥ छ २२ साबान.

राजश्री भाऊ गोसावी यांसि—

(छ) सकळ गुणालंकरण अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य—स्ने॥ राघोजी आंगरे वजारत माब रामराम विनंती उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लेखन आज्ञा करीत असले पाहिजे–विशेष छ १४ शाबानचे स्वहस्ताक्षर पत्र आलें तें छ १८ मिनहूस मौ॥ थळ उंदेरीचे मोर्चेबंदीस प्रविष्ट जाहालें. गौरवाभिवृद्धीस पावलों. श्रवणेंकडून संतोष जाला. सुरतेकडील आरमार राजश्री नारोपंत सहवर्तमान आठा दहा रोजांत येईल. सर्व एकत्र होऊन उंदेरींत पाणी नाहींसें जालें आहे या समयांत भारगिरी करून लगट करावा म्हणोन आज्ञा केली. आज्ञेचे अन्वयांत सविस्तर विनंती श्रीमंत पंतप्रधान यांचे सेवेशीं लिहिली आहे. त्यावरून निवेदन होईल. आम्हांस आपली आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करावी, श्रम साहासास अंतर न करावें, हेच निष्ठा.

---

४६. शाहूमहाराजांच्या मनांत एकदां बारामतीकर यांस कर्नाटकचा सुभा सांगावयाचा होता त्या खटपटीबद्दल हें पेशव्यांच्या तर्फदारांचें पत्र आहे. धाकटी राणी, थोरली राणी व पेशवे ह्या तिघांचे तीन पक्ष होते.

दुसरा विचार नाहीं. मा। निल्हे नारोपंतास व बसैस आज्ञापत्रें जाऊन पावलींच असतील. त्याप्रमाणें आरमार व महागेरिया आविलंबें येऊन पावलियास शत्रूवरि निकर्ष[४७] होऊन येईल. मुख्य गोष्ट सारा आरमाराचा जडाव व महागेरिया मारगिरीचे पोंस्तें सामान अल्प अवकाशें कडून आलें पाहिजे. विलंबावरि गेलिया अखेर मुसुब[४८] आली आहे. वारा, तुफान जालें म्हणजे आरमाराचा टिकाव होणार नाहीं. येविशीं राजश्री महादाजी रघुनाथ यांहीं लिहिलें आहे त्यावरून सविस्तर श्रुत होईल. राजश्री साबाजी प्रभु जाऊन पावलियावरि हलाखीचें साद्यंत वर्तमान निवेदन केलें असेल व करितील. अनकुलतेविशीं सर्व प्रकारें भरंवसा आपले कृपेचा आहे. विस्तारें विंनंती ल्याहावी तर सर्वजाण आपण समर्थ आहेत. रा। छ २१ माहे शाबान. बहुत काय लिहिणें कृपा लोभ असो द्यावा हे[४९] विनंती.

(शिक्का.)

(मोर्तब सूद)

[ ८४ ] ॥ श्री ॥

श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबांचे सेवेशीं—

आज्ञाधारक दमाजी गायकवाड समशेरबहादर कृतानेक दंडवत विज्ञापना येथील क्षेम तागाईत आश्विन कृष्ण पंचमी पावेतों साहेबांचे कृपाकटाक्षें करून यथास्थित असें. विशेष, साहेबांकडून आज्ञापत्र सादर जाहालें तें उत्तम समयीं प्रविष्ट होऊन अक्षरशहा विलोकनें परम प्रमोद जाहला. पत्रीं आज्ञा कीं, "चांचवे[५०] व जाफराबादकर एकत्र होऊन, लोक जमा करून, जाहजावर चढवून राजपुरीस[५१] कुमक पोहचवावी, मनमाने तैसा उपद्रव करावा, ऐशी तरतूद करितात. त्यांजला उत्तम प्रकारें ताकिदीचीं पत्रें लिहावीं आणि बंदोबस्त करावा." ऐशी आज्ञा सादर होतांच जाफराबादवाले व चांचवे यांशि ताकीदपत्रें लिहून पाठविलीं आहेत कीं, "तुम्हीं कुमक जंजिरीयाशि परिच्छिन्न[५२] न पाठविणें. यद्यपि न ऐकिलें तर पारपत्य यथास्थितपणें होईल." त्या प्रांतीं कमाविसदार नाहींत. जोरतलबी[५३] मुलुख. तेथील भुमे[५४] आहेत त्यांस पत्रें लिहिलीं आहेत. व घोगे वगैरे बंदराचे कमाविसदारांस एतद्विषयीं लिहिलें आहे. व फौजही त्यांचे बंदोबस्तानिमित्य रवाना जाहाली आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञाप्ती[५५].

---

४७. निकर्ष=निकराचा हल्ला किंवा वेढा.
४८. मुसुब-मुसम=अगोठ, प्रज्यन्यकाळ.
४९. मागें पत्र ( ७६ वगैरे ) पहा.
५०. चांचवे=चांचे, समुद्रावरील लुटारू.
५१. राजपुरी—जंजिऱ्याजवळच. हें हबशी यांचें ठिकाण.
५२. परिच्छिन्न=बिलकुल, कोणत्याही प्रकारें.
५३. जोरतलबी—शक्तीच्याच योगें अंमल चालवावा लागतो जेथें असा.
५४. भुमे=तद्देशीय (पाळेगार)
५५. हें पत्र जंजिऱ्याच्या हबश्याबरोबर जें युद्ध चाललें होतें त्यास अनुलक्षून आहे मागें पत्रें ७६ व ८३ पहा.

[ ८५ ] ॥ श्री मोरया ॥ छ २६ सवाल.

श्रीमंत राजश्री भाऊसाहेब स्वामींचे शेवेसि—

विनंती सेवक मल्हारजी होळकर व जयाजी शिंदे कृतानेक विज्ञापना स्वामींचे कृपावलोकनें करून ता॥ छ १० शवाल रेवातीरी यथास्थित असे विशेष. स्वामींकडून आज्ञा पत्रें सादर जालीं त्याजवरून लेखनार्थ सविस्तर कळला. उत्तरें निराळे पुरवणी पत्रीं सेवेशीं लिहिलीं आहेत त्याजवरून सविस्तर निवेदन होईल. आम्ही व नवाब निजाममुलक सहवर्तमान नर्मदातीरास येऊन पोंहोचलों. या उपर सारें लष्कर लौकरच पार उतरोन येत असों. स्वामींनीं "तिकडून फौज जमा करवून पुण्याहून कूच करून आलीकडे अविलंबें आलें पाहिजे. आम्ही ब्र्हाणपूरचा बंदोबस्त करून येतों. मग पुढील बंदोबस्त होणें तो उत्तमच होऊन येईल. स्वामींच्या विचारानुरूप साऱ्या गोष्टी होतील. वरचेवर आज्ञापत्रें सादर केलीं पाहिजेत. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापी.

[ ८६ ] ॥ श्री ॥

पु॥ राजश्री रामचंद्रबावा स्वामी गोसावी यांसि—

विनंती उपरि सफदरजंग यास निमरजाबंद करून आपले लगामीं लावाव. याचा विचार केला असे, म्हणून लिहिलें तें कळलें. ऐशियास हा विचार उत्तम केला. आम्हांसही दिल्लीहून लिहिलें आलें होतें. आम्हींही त्यास येविशीं विचारानुरूप लिहिणें तें लिहून त्यास लगामी लाऊं ध्यावें, त्यानीं रकार पूर्वकाचे साह्य न करावें असें करावें, म्हणोन लिहिलें असे. तुम्हींही त्यास वरचेवर उचित जाणून लिहीतच असाल व लिहिणें. ज्यांत आपल्या मनसुबियास व कर्तव्यतेस उचित, आणि उपयोगी, परिणाम उत्तम, लोकोत्तर, योग्यतर, लौकिक कीर्तीस्पद तेंच करणें व कराल हा निशा आहे. सफदरजंग उमदा मनुष्य, त्याचा स्नेह हरप्रकारें रक्षण करणें उचित. दुसरें, काशी त्यांचे हातीं त्याशीं निखालसता असलिया कालगतीनें काशीचें स्पष्ट दर्शन होणार तो महा लाभ आहे. यासाठींही स्नेह रक्षावा. दुसरें अत्यंत अर्थाअर्थी संबंध नाहीं जाहला. अप्रिय

---

५६. हा निजामनमुलुख याचा वडील पुत्र ग्याजूद्दीन होय. मागें पत्र ८० पहा.

५७. सफदरजंग—हा अयोध्येचा नबाव हा दिल्लीच्या बादशाहाचा वजीर होता. याचे व ग्याजुद्दीन यांचें वांकडें होतें.

५८. (निम=अर्धा. रजाबंद=खुषी, अनुमत) कांही त्यासारखें करून, कांहीं त्याचे ऐकून.

५९. रकारपूर्वक—हे कोण ? रोहिले असावे असें वाटतें.

६०. निशा=विश्वास.

६१. येथपासून खुद्द स्वाशांच्या (बाळाजी बाजीरावाच्या ) हस्ताक्षरीं मजकूर लिहिला आहे.

भाषण करून विग्रह वाढविणें उचित नव्हे. थोडासा तोटा जाहला तरी सोसून स्नेह रक्षणें उचित असे. हे विनंती[६२].

[ ८७ ] ॥ श्री ॥

तीर्थरूप राजश्री दादासाहेब वडिलांचे सेवेशीं—

अपत्य माधवराव साष्टांगनमस्कार विनंती येथील कुशल ता॥ छ १३ सफर पावेतों वडिलांचे आशिर्वादें यथास्थित असें विशेष. वडिलीं आशीर्वादपत्रें त्रिंबकजी मुंढा खिजमतगार याजबरावर पाठविलीं तीं पावोन त्याचीं उत्तरें विस्तारें लिहून हरजी चव्हाण खिजमतगार याजबरोबर पाठविलीं आहेत. येऊन पात्र-तील त्याजवरून सविस्तर सेवेशीं निवेदन होईल. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ ८८ ] ॥ श्री ॥

श्री.
राजा शाहू नरपति हर्ष-
निधान, माधवराव नाराय-
ण मुख्य प्रधा८. *

छ म॥ अनाम देशमुख व देशपांडये पो॥ जालनापूर यांसि माधवराव नारायण प्रधान सु॥ सलास समानीन मया व अलफ. नरहरी रनाळेकर यवनमय होऊन भ्रष्ट जाला त्याजला प्रायश्चित्ताचा अधिकार नसतां शामाचार्य व कांहीं प्रभृती ब्राम्हण पैठणकर यांणीं शुद्ध केला. सबब पैठणीं परस्परें ब्राम्हणांचा तट जाला. उपरांतिक जाबीनंग यांजकडील का॥र्दार पेशजी आला होता. त्यानें बलात्कारें शुद्ध ब्रम्हणांची व बहिष्कृत ब्राम्हणांची पंक्ति करून एकाकार केला. सबब पैठणकर झाडून ब्राम्हण सर्व बहिष्कृत जाले. त्यांस प्रायाश्चित द्यावयास सरकारचे कारकून शंकराजी राम व जयराम रायदेव पाठविले त्यांणीं झाडून पैठणकर सर्व ब्राम्हणांचीं प्रायश्चितें परगण्यासुद्धां केलीं. पैठणचा संसर्ग तुम्हांस घडला आहे. तरि तुम्हीं सर्व ब्राम्हणांस ताकीद करून झाडून प्रायश्चित्तें परगण्यासुद्धां उभयतां कारकून यांचे विद्यमानें संसर्गानुरूप फडशा करणें. जाणिजे. छ १८ जिलकाद आज्ञा प्रमाण.

लेखन सीमा

---

६२. हिंदुस्थानांत पेशवे, शिंदे व होळकर मिळून मराठ्यांच्या तीन फौजा असत. पैकीं पेशव्यांच्या फौजेचा अधिकार किंवा दिवाणगिरी रामचंद्र बाबाकडे या वेळीं असावी. हेंही पत्र नाना साहेबांच्या मुत्सद्दीपणाचें द्योतक होय.

६३. कमाविसदार.

* 'न' लिहून दुसऱ्या कागदावर उठविला असतां जसा उलटा उठतो तसा मूळ शिक्यांत सर्वत्र आहे. तसा वर काढतां आला नाहीं. हा उलटा 'न' असण्याचें कारण असें. पिंगळे यांचे घराण्यांत पेशवाई होती ती त्यांजकडून काढून भट यांस दिली हा बदल केला तो दर्शविण्याकरितां शाहूनें हें शेवटचें अक्षर 'न' उलटें वठावें असें ठरविलें.

दोन रोजां वर्तमान निवेदन जालें पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ १५० ] ॥ श्री ॥

साहेब साहेबांचे सेवेशीं आज्ञांकित बँयाजी नाईक विज्ञापना, मेस्त्र इलफिनइस्टोन वकील दिम्मत इंग्रज कलकत्तेकर यांजकडील दिनचर्येची बातमी--

१. छ ७ मोहरमचें वर्तमान. मशारनिले प्रातःकाळीं दापोडी पावेतों जाऊन सहल करून आले. गोपाळराव खंडेराव रास्ते यांजकडील कारकून व बापूजी गोपाळ सांने मा।र निलेशीं वेगळाले बोलून गेले. करवीरकर यांजकडील कारकून मेस्त्र रसल यांशीं बोलून गेले. प्रभाकर पंत जोशी मोधीशीं बोलून गेले. मुंबई व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व ब्र्हाणपूरचीं पत्रें डांके बरोबर आलीं. जाब रा। जाले.

१. छ ८ मोहरमचें वर्तमान. करवीरकरांकडील वासुदेवभट गुरुजी व तीन असामी कारकून ऐसे येऊन मा।निलेशीं बोलणें करून गेले. गंगाधर शास्त्री व बापू मैराळ मा। निलेशीं दोन घटका बोलणें करून सायंकाळीं गेले. चिंतामणराव पटवर्धन व मिरजकर व तासगांवकर व कुरुंदवाडकर यांस मा।-निलेनीं पत्र लिहून चार थैल्या तयार करून त्यांजकडील कारकून बोलावून आणोन चौघांचे हवालीं चार थैल्या रवाना करावयास केल्या. त्या घेऊन चौघांनीं कपताम कलोस यांशीं बोलणें करून गेले. बापूजी गोपाळ साने मशार निलेशीं व मोधी याशीं बोलून गेले. मुंबई, हैदराबाद व श्रीरंगपट्टण व ब्र्हाणपूरचीं पत्रें डांके बरोबर आलीं. जाब रवाना केले. गारपीरचे लष्करांतील शिपाई व गंगाधर शास्त्री यांजकडील माणसें मोहरमची फकीरी मागावयास आले. सबब मशारनिलेनीं लष्करवाले यांस रुपये दहा व शास्त्री यांजकडील माणसांस पांच एकूण पंधरा रुपये दिल्हे.

१. छ ९ मोहरमचें वर्तमान. निपाणीकर यांस मारनिलेनीं पत्र लिहून थैली करून रवाना करावयास बापूजी गोपाळ साने यांचे हवालीं केली. ती घेऊन साने गेले. मशारनिले व कप्तान कलोस व मेस्त्र रसल व कप्तान

---

७८. बयाजी नाईक—हा एक हुजुऱ्या असून हेराचें काम त्याजकडे होतें.

७९. बापू साने—मोदीच्या वतीनें धारवाड सरसुभ्याचें काम पहात असे. मोदी मरण पावल्यानंतर त्यानें केलेल्या दुर्वर्तना बद्दल बापूस जाब विचारूं लागले व कैदही त्यास केलें. पुढें त्रिंबकजीच्या विलक्षण शिक्षेच्या धाकानें तो कैदेंतच मरण पावला.

८०. गंगाधरशास्त्री पटवर्धन व बापू मैराळ हे बडोद्याहून पेशवे व गायकवाड यांचा मागोल बाकीचा लढा पडला होता तो तोडण्याकरितां इंग्रजांच्या बाहेदारीवर पुण्यास आले होते. पैकीं गंगाधरशास्त्री हे पूर्वी फडके यांच्या पदरीं होते. मैराळ हे हल्लींच्या बडोदकर मैराळांचे पूर्वज असावे.

पाटेंजर व दु स रे व जी [ खुसरुजी ? ] मोधी ऐसे चार घटका दिवस राहतां राजश्री सदाशिवपंत भाऊ यांजकडे नाना फडणीसांचे वाड्यांत येऊन भाऊंशीं बोलणें केलें. श्रीमंत महाराज साहेबाचे सेवेशीं मशारनिलेनीं पत्र बापू साने यांचे हातें लिहून थैली करून बराबर आणली ती भाऊंचे हवालीं करून दोन घटका रात्रीं गेले. मोधी मागें राहून एक घटका बोलून गेले. आनंदराव मल्हार व धोंडो मल्हार बोलण्यांत होते. कप्तान फोर्ट दोन वेळां येऊन मशारनिलेशीं बोलणें करून, खाना खाऊन, दोन प्रहर रात्रीं गेले. आंगरे यांजकडील कारकून प्रातःकाळीं मशारनिलेशीं बोलून गेले. मुंबई, हैदराबाद व श्रीरंगपट्टण व बऱ्हाणपूरचीं पत्रें डांके बरोबर आलीं. जाब रा। जाले. भिकाऱ्यांस चार रुपयांचा खुर्दा मशारनिलेनीं खैरात केला—

---

३

तीन रोजां वर्तमान निवेदन जालें पाहिजे सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ १५१ ] ॥ श्री ॥

सेवेशीं धोंडो गोविंद गोडबोले कृतानेक साष्टांगनमस्कार विज्ञापना ता। माघ वद्य ९ तृतीयप्रहर पावेतों सुखरूप असों विशेष—राजश्री पंतप्रतिनिधी व चंदन-वंदनकर व सातारकर यांस निक्षूण ताकीद झाली पा।. वारंवार तेंच लिहितोस हें काय? असें कदाचित म [ नां ] त येईल. त्यास स्वामींची स्वारी त्या प्रांतीं जाऊन माझा अम्मल सुरळीत चालण्याविशीं ताकीद होणें यांत मला भूषण बहुत आहे. स्वामींचे साहाजिक भाषण परंतु सेवकास महाभूषण याजकरितां वारंवार विनंती लिहितों. हेंही स्वामींचे ध्यानांत आहेच. रास्ते यांस आरब दूर करण्याविशीं ताकीद जाहली म्हणोन कळलें. फार संतोष जाहला. क्षेत्राचा उपद्रव गेला. राघोपंत सफरे म्हणून कोणी कऱ्हाडे गृहस्थ पूर्वीं बाबूराव केशव यांचे पदरचे त्यांनीं सालगुदस्त बंडांत पुण्यास येऊन सातहजार रुपये भरून कऱ्हाडची मामलत केली. तेव्हां ते दोषी याजकरितां मशारनिलेस धरून वैराटगडास आटकेंत ठेविले आहेत याविशीं रा। चिंतोपंत देशमुखांस माहीत

---

८१. सदाशिवपंत भाऊ—माणकेश्वर—टेंभुर्णीचे कुळकर्णी. पूर्वी हरदासाचा धंदा करीत. पुढें गोविंदराव पिंगळे यांचे मार्फत हैदराबादेस होते. पे० ब० पृ० २१९ टी० २५ व पृष्ठ २२१ टी० ५० पहा.

८२. कॅप्तन् फोर्ड—हा मराठी फौज मोडून इंग्रजी पलटणें बाजीराव साहेबानीं तयार केलीं होतीं त्यांजवरील मुख्य. यालाच पेशव्यांचे बखरींत 'पोट' साहेब म्हटलें आहे. पे० ब० पृष्ठ २३१ पहा.

८३. वरील दोन पत्रांवरून इंग्रजांची व्यापकता व महत्त्व हीं या वेळीं कितीं होतीं हें समजेल.

८४. बाजीरावींत मामलती मक्त्यानें देत असत.

पुर्तेपणें आहे व सेवेशीं विनंतीही केली आहे. त्यास त्यांचा चार रुपये खंड ठराव-याचा तो दरम्यान वे॥ रा॥ वैजनाथ भटे मामांचें बोलणें पडेल व पडतें त्यांत भाव यांस उगेंच कैद केलें, दोष नाहीं, याजकरितां त्यांस सोडून द्यावें याप्रमाणें झालें. त्यास मी आक्षेप घेतला. सरकारचे अपराधी अटकाविले आहेत. त्यास परवानगी सरकारची. ते पक्षीं परवानगी शिवाय सोडतां येत नाहींत. तेव्हां इकडे निरुपाय जाणोन वेदमूर्ती रा॥ मामा सरकारांत विनंती करून मशारनिलेस सोडवावयाचा उद्योग करतील व चालला आहे. सरकारांतून ते गृहस्थ सुटल्यास सरकारचे चार रुपये मात्र येणार नाहींत. परंतु बोलणें बोलतील ते मात्र मध्येंच रुपये खातील. आणि अपराध पक्का याजकरितां त्यास मुक्ततेची परमाणगी नच व्हावी. कदाचित् सरकारचा खंड देऊन सुटत असिल्यास मग नीटच आहे. माझा ज्वर परिहारला. पंधरा दिवशीं पूर्ववत शक्ति येईल सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ १५२ ] ॥ श्री ॥

पुरा॥ राजश्री बाबा स्वामींचे सेवेशीं. विनंती ऐसीजे. इकडील राजक्रांतीचें वर्तमान तरि जलचरांचीं[८६] पळटणें बंगाल्यांतील व चिनापट्टन लगायेत गुजराथ वगैरे या प्रांतींचे दरोबस्त जमाव पलटनें सुमारी पाऊणशें केला. क स र याचा कौसल ठहरून बादबरसाद आश्वीन अखेर तयारी करून हिंदुस्थान प्रांतीं आपल्या मुकाबिल्यास येतात यांत संदेह नाहीं. जंगी सरंजाम तयार करण्याकरितां या प्रांतींचे महालानिहाय मिळोन येथें साहुकारापासून पन्नास लक्ष रुपये घेतले. वराता सावकार मा॥रांस् कलकत्याकडे लाऊन दिल्या. पोख्त सरंजाम लेश करविला आहे. याप्रमाणें तांम्रांचे[८७] अधिकारी यांनीं मसलतीचे घाट बांधून स्वार सरंजाम सुद्धां येत आहेत. तरि आपण श्रीमंत महाराजांस राज्यक्रांतीचे भाव सुचवून तयारींत असावें. दुसरें येथून हो ळि या नें मा व र घाट येथील मुक्कामा पावेतों माणसांची डाक रवाना जाहली आहे. हालकरे चारशें व कारकून इंग्रेजांनीं नेमून पाठविला आहे. आज पंधरा रोज जाहाले. बेटांत आपल्याकडील गृहस्थ आहे त्यांनीं तथ्य वृत्त सांगितलें त्यावरून सुचना लिहिण्यांत आली आहे. कारण कीं, सर्वांस आधार तेथील. येथील उमेद तिळमात्र नाहीं. आतां छद्म [ छनद? ] करितां परंतु सिद्धीस जाणार नाहीं.

[ १५३ ] ॥ श्री ॥

श्रीमंत राजश्री आबासाहेब[८८] साहेबांचे सेवेशीं—विनंती सेवक मल्हार चिंता-

---

८५. पे॰ द॰ पृष्ठ २१४ पहा.
८६. जलचर=इंग्रज.
८७. तांम्र=इंग्रज.
८८. हे आबासाहेब कोण ?

मण बोधनी अकबरनीस कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना छ २९ माहे रमजान पावेतों आपले कृपें करून सरकार कामावर हजर असों विशेष. ता॥ वांफगांव येथील आकबार येणेंप्रमाणें श्रुत व्हावी. कलमें.

१ हुजुरींहून नारायणराव हालकारे सरकार आज्ञेवरून श्रीजेजुरीलिंगाचे * नवस फेडावयाकरितां आश्वीन शुद्ध ७ पुणें मुक्कामीं येऊन राजश्री बाबाजी बाजीराव मामलेदार तालुके म॥ हे नारायण राव बरोबर जेजोरीस जाऊन तेथें श्रीचा गोंधळ व कुळधर्म व ब्राह्मण भोजन उत्तम प्रकारचें करून देवाची पूजा अर्चा वस्त्रप्रावर्णासह उत्तम प्रकारें केली. व सर्व आश्रित व पाध्ये वाघे मुरळी यांचा सन्मान करून बहुत चांगला समारंभ केला. आसमंतात जेजुरीचे मोठा लौकीक जाहला. या कृत्यास बारा चौदा दिवस कमावीसदार तेथें होते. नंतर नारायणराव श्रीपंढरपुरास गेले व बाबाजी पुण्यास सरकार कामावर हजर आहेत.

१. ता॥ वाफगांव देहे नव येथील इकडील रिवाजाप्रमाणें गांवकरी यानीं कमावीसदार यांजकडे पीक पाणीचे आर्ज्या केल्या आहेत कीं आमची पहाणी पिकाची करून नजरेस आणावें, त्यावरून का॥दार यानीं कोठें कोठें कारकून पाठविले आहेत व आणखी पाठविण्याची योजना आहे. कलम.

१. नवगांवीं शेंकून पोत्याच्या चिठ्ठ्या केल्या आहेत. नवगांव मिळोन शें सवाशें रुपयांचा आकार होईलसा दिसतो. कलम.

१. का॥[१२] आले. येथील पाटील कुळकर्णी यांचा व रयतेचा तंटा त्रिंबकराव रामचंद्र यांचे अमलापासून वाढला दिसतो. रयतीस फूस देणार का॥ मा॥रच्या दोन तीन असाम्या येक गोपाळराव बारेकर व एक आनंदराव शेटे

---

८९. वाफगांव ता॰ खेड-हा गांव पूर्वी होळकर यांचा. परंतु त्याचा मोबदला होऊन हल्लीं खालसा आहे. येथें होळकरांचा तटबंदी वाडा गांवकुसू वगैरे आहे. गांव नदी व ओढा यांच्या चिमटयांत आहे. होळकरांचा वाडा मोडला आहे तथापी एक दिवाणखाना दुमजली शाबूत आहे. व त्यांत खालीं विष्णूची गरुडारूढ मूर्ती स्थापिली आहे. दुसरी एक गंडकी शिळेची लक्ष्मीनारायणाची मूर्ती आहे ती सवालाख रुपये खंडणी बद्दल होळकरांनीं राजस्थानांतून आणिली असें सांगतात.

* मल्हारी व म्हाळसा यांचीं दोन लिंगें असून खेरीज मूर्तीही असतात. मल्हारी हा महादेवाचा अवतार.

१०. जेजुरीस पेशव्यांचें जुनें तळें व तेथील पाणी बागेस नेण्याकरितां केलेला खजिना व नळ, होळकरांचें तळें, जेजुरीनाथाचें तटबंदी देऊळ, आंतील सुवर्णाच्या व रुप्याच्या मूर्ती, व मल्हारराव होळकर यांचें देऊळ व आंतील त्यांची व त्यांच्या स्त्रियांच्या संगमरवरी पाषाणाच्या मूर्ती या गोष्टी पहाण्या जोगत्या आहेत. येथें मार्गशीर्ष, माघ व चैत्र या महिन्यांत यात्रा भरते.

११. शकुन पोतें ( याच्या चिठ्ठ्या )—'शकुन पोतें' ही एकाप्रकारची पद्धी असावी.

१२. कमाविसदार.

व एक नारायण पा। भुजबळ हे त्रिवर्ग आणीक एक दोन असे मिळोन असे रयतेस बिछडून कुभांड गांवांत मोठें मांडलें आहे. रात्रंदिवस कचेरी दरबार साहेब लोकांपर्यंत अर्ज्या रयतीकडून देऊन पुढें बोलण्यास आपण होऊन तकरार कुभांड करीत आहेत. पाटील कुळकर्णी यांजकडे विशेष दोष आहे असें नाहीं. परंतु कुळकर्णी यानें लिहूं नये, गांवांत पाटलामीं कामांत येऊं नये, असे नाना प्रकारचे तकरारी करून मोठा बखेडा मांडला आहे. अशा खट-ल्यानें का।दार यास रात्रंदिवस मोठी दगदग पडून वसुलाशींही हरकत गु।। ही अखेरसालपर्यंत केली असें दिसोन आलें. यंदाही तसाच प्रकार दिसण्यांत येतो. याविशीं साहेबांकडे यादबिद देऊन बंदोबस्त करण्याचे तजविजींत अक्षयी आहेत. परंतु बारेकर वगैरे तीन असाम्या यांचा बंदोबस्त इंग्रज सरकारांतून अगर आपले सरकारांतून जाल्या वांचून गांवचा बखेडा मोडत नाहीं असें दिसतें ही मोठी जिकीर आहे. कलम.

सदहू कलमें लिहिल्याप्रमाणें मनन होऊन उत्तरास आज्ञा जाहली पाहिजे. कळावें सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ १५४ ] ।। श्री ।।

श्रीमंत राजश्री भाऊ स्वामींचे सेवेशीं—

विनंती सेवक लक्ष्मण बल्लाळ साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशळ ता।। छ २६ र।। वल मुक्काम बीरगांव पें।। आकोलें यथास्थित असे. विज्ञापना पें।। दिंडोरीकडे बातमीस स्वार पाठविले होते. व र।। फत्तेसिंग काळे याजकडे जासूद पाठविले होते. दोहोंकडून तहकीक वर्तमान आलें कीं, जयराम मोरेश्वर सुटले. खांसा कामास आला. येविशीं फत्तेसिंग काळे यानीं मजला पत्र लिहिलें त्याची नक्कल सेवेशीं पाठविली असे. त्याजवरून सेवेशीं विदित होईल. मातुश्री उमाबाईकडील वर्तमान तरि नाशिकावरि आहेत. परंतु गंगा-तीरीं मौजे निफाड पें।। चांदवड येथें मीर महमद बाकर नाशिकचा अमीन हजार बाराशें फौज सुद्धां अकस्मात सेनापतीचें कूच होऊन पुढें जाणार. येका दो दिवशीं जातील. सेवेशीं कळावें म्हणून लिहिलें असे. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना.

[ १५५ ] ।। श्री ।।

र।। विसाजी देवराव गो।। याशीं—

सुरुसन सलास आशर मयातैन व अलफ शेखचांद शिलेदार यास सरका-रांतून बक्षीस रुपये ५०० पांचशें पाठविले असत. तरि त्यास देऊन पावती घेऊन हुजूर पाठवून देणें. जाणिजे. छ २१ जा।वल असलपत्र बाळाजीपंत

कारकून नि॥ त्रिंबकजी डेंगळे यांजकडे देऊन डाकेबरोबर लष्करांत रवाना केलें. छ २३ जा॥वल सु॥ सलास अशर मयातैन मु॥ नाशिक.

[ १५६ ] ॥ श्री ॥ पै॥ छ २० जा॥वल सीत.

राजश्री अमृतराव स्वामींचे सेवेशीं–

विनंती उपरि तुम्ही छ ६ जा॥वलचें पत्र पाठविलें तें पावलें. मालीट इंग्रज आज श्रीमंतांचे दर्शनास आला होता. अगोदर त्यांनीं कचेरीस यावें. नंतर श्रीमंतांनीं यावें असा बेत करून भेठ जाली. मालिटास मात्र भेटले. नजराणा केला. त्याची याद पाठविली आहे. मालीट पर्वतीचे रमण्यांतच राहिला आहे. बायका वगैरे वाड्यांत राहिले म्हणोन लिहिलें तें कळलें. त्यास बेत अगोदर त्यांनीं यावें, नंतर श्रीमंतांनीं यावें, असा करून भेट करविली. उत्तम केलें. नजराण्याची यादी पाहिली. पुण्यांतील नेमणुकेचे फौजेस रोजमरा वाटावयाचें लिहिलें त्यास एक दुमाही व दोन आठवडे द्यावे रा॥ छ १४ जा॥वल हे विनंती.

[ १५७ ] ॥ श्री ॥

पै॥ छ १८ मोहरम सन खम्मस अशर

साहेब साहेबांचे सेवेशीं. आज्ञांकित बयाजी नाईक विज्ञापना. मेस्त्र इलफिस्टन वकील दिम्मत इंग्रज कलकत्तेकर यांजकडील दिनचर्येची बातमी–

१. छ १ मोहरमचें वर्तमान–मशारनिले प्रातःकाळीं गणेशखिंडी पावेतो जाऊन सहल करून आले. गोपाळ खंडेराव शास्ते यांजकडील कारकून प्रातःकाळीं मशारनिलेशीं बोलून गेले. जिऊबाई भानूकडील कारकून मेस्त्र रसल याशीं बोलून गेले. गंगाधर शास्त्री यांजकडील नासूद एक लखोटा घेऊन आला. तो मुंबईचे डाकेवर रवाना करावयास मशारनिले जवळ पावता करून गेला. मुंबई व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व ब्र्हाणपूरचीं पत्रें डाके बरोबर आलीं. जाब रा॥ जाले.

१. छ २ मोहरमचें वर्तमान–मशारनिले व कपतान कलोस वगैरे पांच असामी प्रातःकाळीं गा॥रपीरचे लष्करांत जाऊन तेथून घोरपडी पावेतों सहल करून आले. खुसरवजी मोधी येऊन मशारनिलेशीं दोन घटका बोलणें केलें. कप्तान कलोस व मेस्त्र रसल व बापूजी गोपाळ साने बोलण्यांत होते. नंतर निघोन आदितराम साहुकार यांचे येथें जाऊन घरास गेले. करवीरकारांकडील कारकून मशारनिलेशीं बोलून गेले. गंगाधर शास्त्री यांजकडील आगशीकीरस्ताई मेस्त्र रसल याशीं बोलून गेला. पांडोबा नाईक पिपडी करवीरकरांकडील पत्र घेऊन आले. ती थैली मशारनिलेस पावती करून दोन घटका

बोलून गेले. जीऊबाई भानू कडील कारकून व प्रभाकरपंत जोशी मोधीशीं बोलून गेले. मुंबई व हैदराबाद व श्रीरंगपट्टण व ब्र्हाणपूरचीं पत्रें डांके बरोबर आलीं. जाब र॥ जाले. शीरूरनजीक लष्करचे छावणीचे गीर्दनवाईस पेंढारी येऊन उपद्रव केला. म्हणोन छावणींतील टोपकारांकडून डांके बरोबर बारा घटका रात्रीं मशारनिलेस पत्र आलें. एक टोपकर व दहा शिपाई छावणीनजीक जखमी जाले. अशी बातमी आहे. हैदराबादचे डांकेस इंग्रजाकडील जासूद आहेत त्यांस मौजे चिंचोली येथील टप्यावरील जासूद डांकेचीं पत्रें घेऊन येत होता, त्याची पेंढाऱ्यांची गांठ पडून पेंढाऱ्यांनीं भाला मारिला. जासूद जखमी झाला. ह्मणोन मशारनिले कडे बातमी आली. कप्तान फोट मुंबईस गेले होते ते बोर घाटावर खंडाळ्याचे मुक्कामीं आले, म्हणोन दापोडीचे छावणींत बातमी आली. त्याजवरून छावणींतील टोपकारांनीं लौकर येण्याविशीं पत्र पाठवून डांक बसावयास घोडे रवाना केले.

२

दोन रोजां वर्तमान निवेदन जालें पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ १५८ ]    ॥ श्री ॥

राजश्री बाळाजी जनार्दन स्वामी गोसावी–

विनंती उपरि सालमजकुरीं स्वारी पुण्यांत असतां कोण कोणते महालांच्या रसदा करार जाहाल्या, व स्वारी निघाल्यावर कोणते महाल विल्हेस लागले, त्या पैकीं तूर्त यावयाचा ऐवज कीती व मुदतीचा ऐवज कीती त्यापैकीं पोतां ऐवज जमा कीती जाहला व बाकी काय तें लिहून पाठवणें व पोत्यास ऐवज येऊन बाकी ऐवज तूर्तचा व मुदतीचा राहिला तो झाडून पोत्यास जमा करणें व ज्या महालांच्या रसदा घेणें असतील तेही महाल विल्हेस लाऊन ऐवज घेणें. लिहिले प्रमाणें आधीं करणें. र॥ छ ९ र॥वर. सारांश ऐवज रसदेचा पोत्यास जमा करणें. मुदतीचा ऐवज रसदेपैकीं किती त्यास या ऐवजापैकीं पोत्यास आणिल्यास व्याज किती पडतें हें सविस्तर लिहून पें॥. र॥ छ ४. बहुत काय लिहिणें हे विनंती.

[ १५९ ]    ॥ श्री ॥

अखंडित लक्षुमी अलंकृत राजमान्य राजश्री जिवाजी रघुनाथ गोसावी यांसि–

सेवक माधवराव नारायण प्रधान नमस्कार सु॥ समान सबैन मया व अलफ. राजश्री बाबूराव केशव मजमदार पें॥ सिंदखेड यांणीं हुजूर विदित केलें कीं, र॥ मल्हारराव रामकृष्ण याजकडे पें॥ मा॥ची मामलत सन खमसांत होती. त्या वेळच्या आमच्या वेतनाचे वगैरे व्याज सुद्धां रुपये ४५० साडेचारशें येणें आहेत

ते मागतों. परंतु देत नाहीं. त्यास हल्लीं सरकारांतून मल्हारराव रामकृष्ण यांस रद्द कर्जाच्या ऐवजीं वरात बाबती नांदेड येथें दिल्ही आहे. त्यापैकीं देवावे म्हणून त्याजवरून हें पत्र तुम्हांस सादर केलें असे. तरि मशारनिलेचा वेतनाबाबत वगैरे बाकी असेल तो वाजवीचे रुईनें वजा करून सदहू ऐवज पै॥ घेणें. ऐवज मशारनिलेस देणें. जाणिजे. छ १ जिलकाद आज्ञाप्रमाण. लेखनसीमा.

[ १६० ] ॥ श्री ॥

पै॥ छ १७ माहे रमजान सन १२००

राजश्रियाविराजीत राजमान्य राजश्री गोविंदरावजी स्वामींचे सेवेशीं—

पोष्य बळवतराव भवानीशंकर कृतानेक साष्टांग नमस्कार विनंती उपरि येथील कुशळ तागाईत छ १ माहे रमजान मुक्काम हुमनाबाद जाणोन स्वकीय कुशळ लिहीत जावें विशेष. श्रीमंत महाराज यजमान साहेबीं राजश्री तात्या यांजकडे फौज सुद्धां रवाना केलें तेव्हां आज्ञा हेच कीं, तात्यांची व हजरतीची भेट होणार त्या पूर्वीं तात्यांजवळ जाऊन पोंहचावें. त्यांचे विचारें नबाब बंदेगान अल्लीची भेट व्हावी. त्यास लोकांचे स म जो त्या स [ समजुतीस ? ] चार दिवस अधीक वाशीमाबर लागले. यांत तात्यांची व हजरतीची भेट होऊन मसलहत प्रकरणीं बोलणें होऊन तात्या यांची स्वारी पुढें कृष्णा उतरून गेली. त्यास त्वरेनें तात्यांजवळ जाऊन पोहचण्यास मार्ग हुमनाबादेचा नीट जाणून येथपर्यंत येणें जाहाले. त्यास नीट मार्गें येतां हजरतीची स्वारी मध्यंतरीं आहे. पृथक भेटीचें तो प्रयोजन नाहींच. इकडील वाजेकरी [ ? ] व या दौलतीची कळकळ तात्यांस व आपणांस आहेच. तात्या यांचे व हजरतीचे भेटीचे प्रसंगीं इकडील मतलब उगविलेच असतील. प्रत्येक आम्हांस काय बोलावयाचें आहे. त्यांस मार्ग जवळून तेव्हां परस्पर जाणें हें चांगलें. किंवा वीस पंचवीस कोशीं असतांना एक दिवस राहून सरासरी भेट घेऊन जावें. जैशी येविशीं करीन[ ? ] सल्लाह असेल त्याप्रमाणें सूचना व्हावी. हा मार्ग सोडून जावें तरि दिवसगत लागेल. वासना तो तात्यांजवळ सत्वर जावें हेच. व यजमानाची आज्ञा याचप्रमाणें. सर्वात्मना यजमानांचा विश्वास आपले ठायीं तेव्हां उचित प्रकार जो असेल तोच आपण लिहीतील. येविशींची विनंती तात्या यांस लिहिली आहे. या उपरि जाण्यास दिवस बहुत थोडके राहिले. पत्राचीं उत्तरें सत्वर यावींत. त्याप्रमाणें येथून घडण्यांत येईल. बहुत काय लिहिणें लोभाची वृद्धि कीजे हे विनंती[९३].

---

९३. पत्रें अंक ५० ते ५२ तीन व ६० पासून तों ह्या पत्रापर्यंत सर्व पत्रें रा० रा० दत्तो विनायक खाडिलकर यांजकडून आ- (पु० चा०.)

[ १६१ ] ॥ श्री ॥

पु॥ राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि—

आशीरवाद उपरि. नासरजंगास हिदायतमोहीदीखानाकडे[९४] पठाणांनीं भेदून नासरजंगास मारलें. हिदायतमोहीदीखान औरंगाबादेकडे येऊं लागला. तेव्हां आम्हीं जप्ती केली. औरंगाबादेजवळून रुपये घेतले. याजमुळें मोंगलानें विषम मानिलें. तेव्हां तुम्ही जयनगरापाशीं होतेसें[९५]. तेव्हां वारंवार पत्रें पाठविलीं कीं, गाजुदीखान इकडे येतील तर उत्तम. तुम्हींही यावें. सा सुभे दक्षिण सोडवावी. अथवा गाजुदीखानास आणावें. त्यास स्थापावें. त्यापासून एखादा तरी निदान सुभा घ्यावा. कर्ज वारून घ्या [ वें. ] येणेंप्रमाणें करावें. तेव्हां तुम्ही न आलेसें[९६]. वजीराचे कामींवर[९७] गुंतत चाललेसें. आम्हीं खामखा[९८] आणावें तर तुम्ही कामास चाललेस. श्री इच्छेनें हिदायतमोहिदीखान व पठाण भांडून हिदायतमोहिदीखान मेला. आम्ही जवळ गेलों. परंतु मागें बापू * भिंवराव मोडले. याजमुळें शह पडला. व आम्हांजवळ फौज थोडी. सोबत्याचा भरंवसा नाहीं. उन्हाळा दिवस. जानोजी निंबाळकर तेव्हां केवळ रामदासपंताचे लेंकें[९९]! त्यांनीं थोड्या बहुतावर आम्हांस समजाऊन त्याजवर उपकार करून मजकूर विल्हे लाविला. आम्हांस गाईकवाडास जरब देणें जरूर यास्तव आम्ही दरमजल सातारियाकडे आलों. तुम्हीं वजिराचे कामावर मोठी मेहनत, मोठें जोखींव, केलें. प्रांतही सुटला. परंतु मनसब्याचा जंवा[१००] बसवून कांहीं पठाणास देऊन, कांहीं आपण घेऊन, रंग भरून माळव्यांत यावें, ते गोष्ट तेथील मुरवतीमुळें न जाहाली. एकदेशी मनसबा जहाला. आम्हीं गायकवाडाचें पारपत्य केलें. तुम्हांस नाना

---

( मागील पृ०. )
म्हांस मिळालीं. हीं बहुतेक अस्सल होतीं. खाडिलकर यानीं पाठविलेल्या पत्रांपैकीं आणखी कांहींच्या नकला आह्मांपाशीं आहेत, पण तीं इतिहासाच्या कामास विशेष उपयोगी पडतील असें वाटत नाहीं. छापिलेल्या पत्रांपैकीं बहुतेक शिक्के मोर्तब झालेलीं अशीं होतीं. कांहींवर तर खुद्द खाशांचीं हस्ताक्षरें होतीं. एकंदर ह्या पत्रांपासून इतिहासजिज्ञासूंस पुष्कळ माहिती होईल यांत संशय नाहीं. सबब रा० खाडिलकर यांचे आह्मां महाराष्ट्र जनांवर मोठे उपकार झाले हें सांगणें रास्त आहे. अस्सल पत्रें त्यांजकडे परत केलीं.

९४. हिदायत मोहिद्दिन=मुजफरजंग.

९५. 'होतेस' असाच द्वितीयपुरुषीं अनेकवचनीं प्रयोग ह्या पत्रांत बरेच जागीं केलेला आहे.

९६. वर टीप ९५ पहा.

९७. वजीराचे काम–अयोध्येचा सफदरजंग याजला रोहिले लोकांचा सूड उगवावयाचा होता तें काम.

९८. खामखा=जरूरीनें, कसेंही करून.

* हे बापूजी भींवराव कोण ?

९९. निंबाळकर फितूर झाल्यावरून त्यांस असें म्हटलें आहे.

१००. जवा बसवून=ठाकठीक करून.

प्रकारें लोकांनीं दर्शविलें कीं, यांनीं बेइमानी, दगाबाजी केली. परंतु ईश्वर साक्ष आहे. मोठे मोठे मराठे, मोठे कारभारी, यांनीं त्याचें घर बुडविलें. नाहक चढीं लाविलें. आम्हांशीं कबूल करून मागती चौथे दिवशीं फिरावें यामुळें बंदीखाने, गड सर्वही प्राप्त त्याचे कर्मानुरूप प्राप्त झालें. असो, एतद्विषयीं विस्तार कशास? परंतु आईसाहेबांशीं विरुद्ध वाढलें. आईसाहेबांचे मतें सर्व प्रकारें आम्हांस मोडावें, रामदासपंताचे पुतण्यांस पेशवाई द्यावी, त्यांनीं आम्हांस बुडवावें, दाभाडे यांणीं त्यास मिळावें, प्रतिनिधीनीं त्यांस मिळावें, रघोजीबावांनीं त्यांस मिळावें, ऐसा पूर्ण भाव. पावसाळां हीं राजकारणें परस्परें शफथपूर्वक घाटलीं. परंतु आईसाहेबांस गडावर एके दिवसाचें खावयास नाहींसें जाहलें, याजमुळें बाह्यात्कारें मात्र आम्हांशीं सलूख करून खालीं उतरलीं. आम्हीं विचार केला कीं, केवळ विरुद्धाचा लौकिक आहे तो वारावा. मनांत कांहीं तरी त्यांचें असो. जशी आमची क्रिया असेल तसें फळ आम्हांस होईल. जशीं तीं चालतील तसे आम्ही चालूं. ऐसा सिद्धांत करून सलूख केला. प्रतिनिधीस प्रतिनिधी करार केली. परंतु आंत सर्वांचे मनसबे घांटून तयार जाले. आम्ही पंचवीस लक्ष कर्ज मात्र नवें करून फौज नवी पंधरा व जुनी चाळीस येणेंप्रमाणें ठेविली. त्या उपर रामदासपंत आले. प्रथम आमची फौज जमा झाली नव्हती. छापा घातला. दुसरें जुंझ उत्तम झालें. त्याजवर

---

१. ताराबाईच्या कारस्थानांत गायकवाड सामील झाले म्हणून त्यांस पेशव्यांनीं विश्वासघात करून कैद केलें, हा जो आरोप पेशव्यांवर आहे त्याचें निराकरण येथें त्यांनीं केलें आहे.

२. नाहक चढीं लाविलें=( आमच्या विरुद्ध आचरणाची ) फुकट भर दिली.

३. कबूल काय केलें होतें व फिरले कसे हें येथें स्पष्ट लिहिलें नाहीं. दुसरे कोठेंही ही गोष्ट लिहिलेली आढळत नाहीं. तथापि गायकवाडानें कांहीं धरसोड केल्यावरून त्यास कैद करणें प्राप्त झालें असा ह्या पत्राचा आशय स्पष्ट दिसतो. ग्रां० ड० ह्याजबद्दल कांहीं लिहीत नाहींत तेव्हां त्यांस ही गोष्ट माहीत नव्हती असें दिसतें.

४. आई साहेब=ताराबाई.

५. ह्या वरून ताराबाई व दुसरी मंडळी मिळून बाळाजी बाजीरावास पदच्युत करण्याचें कारस्थान उभें केलें व त्यांत हैदराबादकरांचा दिवाण जो रामदासपंत ह्यासही सामील केलें होतें असें दिसतें. रामदास पंत ( राजा रघुनाथराव ) ह्यांनीं ताराबाईकडे बोलणें लाविलें होतें व त्याचें पत्र गोविंदराव चिटणीस यांचे हातीं पडलें यावरून ही गुप्त मसलत पेशव्यांस कळली, इतकेंच ग्रां० ड० लिहितात. पत्रांत आशय काय तें लिहीत नाहींत. पंताच्या पुतण्यास पेशवाई देण्याच्या बेताबद्दलही ते कांहीं बोलत नाहींत.

६. दाभाडे, गायकवाड, भोसले, प्रतिनिधी हे सर्व पेशव्यांच्या घराण्याचें वाईट पहाणारेच होते.

७. येथें 'हजार' ह्या शब्दाचा अध्याहार समजावयाचा.

८. या वेळीं बुसी फराशीस याची पलटणें रामदासपंताबरोबर होतीं.

सलाबत[9] बसली. इत्यादिक [ मजकूर ] जगविख्यात व इकडील पत्रावरून तुम्हांस अवगत होत गेले. वारंवार लिहिलें कीं, " लक्षा प्रकारें यावें. वजिराची अब्रू राखिली[10] व आमची गमावली हें कामाचें नाहीं. तुम्ही दौलतेचे स्तंभ[11], राज्यांत खेळ फार झाले आहेत, खामखा यावें. जे मेहनत तुम्ही वजिराचे कामासाठीं केली ते मेहनत येथें येऊन जलदीनें करतेस[12] तर बहुत लाभ होता. परंतु तेथें कामामुळें[13] ईरेमुळें शह पडला. तुमचें येणें, दोन महिने वाट पाहिली, न जहालें. शेवटीं जानबा[14], सैद लष्करखान केवळ बजीद[15] जहाले कीं, खामखा सलूख करावा. तेव्हां सलूख केला. त्रिंबक[16] एका महिन्यानें द्यावा ऐसें कबूल केलें. कां कीं, तुम्हांस पत्रें गेलीं आहेत, तुम्ही यालच, तुम्ही आलियावर जें तुमचे विचारें होईल तें करावें. व गुजराथचें काम अगदीं बुडतें, खर्चास अगदीं नाहीं, मोंगलांची[17] आग भारी, सरदार कोणी मनापासून अगदीं मेहनत न करीत, एक चिरंजीव उभयतांनीं[18] मात्र खटपट करावी. ऐसे अनेक प्रकार घरांवू[19] जाणून सलूख केला. परंतु अंतर शुद्ध नाहीं. आम्हांजवळून रघोजी बाबा मोंगलाकडे गेले. मोंगलांनीं त्यांस जाहागीर करार करून क्रिया घेऊन आपलेसे केलें. बापूजी[20] नाईक यांचें कर्नाटक काढून आम्हीं घेतलें. [ ते ] याजमुळें दुःखी. लटकें फटकें बोलून आशेस लावून दोन वर्षे आम्हीं वोढिलें. परंतु ते या उपर जाणार. आईसाहेबांजवळून कर्नाटक करून घेणार. रामदास पंताजवळून नाल बंदीस रुपये घेऊन तिकडे जाणार. ते हे एकत्र होणार. प्रतिनिधी

---

९. सलाबत=जरब, पगडा.

१०. रोहिल्यांस मोडून सफदरजंग याचे हेतु सिद्धीस नेले व त्याचा आब्रू राखिला त्यास उद्देशून हें लिहिणें आहे.

११. शिंदे होळकर पेशव्यांच्या उपयोगी कसे पडत व पेशवे त्यांस कसें जाणत हें यावरून स्पष्ट होईल. " दौलतेचे स्तंभ " हा गौरव योग्य असून सेवकांचे बाहु स्फुरविणारा होता यांत संशय नाहीं.

१२. 'करतेत' असावें. वरटीप १५ पहा.

१३. ईर=ईर्ष्या, काम करून देऊं असें वचन.

१४. जानबा निंबाळकर. सरलष्करखान हा औरंगाबादचा सुभा हा बाळाजी रावास व गाजूदीखानास प्रथम पासून अनुकूळ होता.

१५. बजिद होणें=आग्रह करणें, गळीं पडणें.

१६. त्रिंबक येथील किल्ला पेशव्यानीं घेतला होता तो परत नबाबास द्यावा.

१७. बुसी मोंगलाकडे होता. त्याचा तोफखाना फार जबर असल्यामुळें थोड्या फौजेनें ठिकाव लागेना. हें एक कारण. हीं तह करण्याचीं कारणें लक्षांत ठेवण्या जोगीं आहेत.

१८. उभयतां चिरंजीव म्हणजे दादा व भाऊ हे असावे.

१९. घराऊ=घरगुती, स्वपक्षाकडील, आपल्या राज्यांतील.

२०. बापूजी नाईक बारामतीकर यांजकडे कर्नाटकचा सुभा होता तो त्यांजकडून शाहूनें काढून सदाशिवराव भाऊ यांस दिला होता. यावरून नाईक हे पेशव्यांचे नातेवाईक असूनही त्यांच्या वाइटावरच होते.

ही वाढले. गोविंदरायाचा[21] सरंजाम घेतला. वरकडही किरकोळ कामें केलीं. शेरे[22] जहाले. त्यांचीं हीं राजकारणें कीं, नाईक आम्ही एकत्र होतों. कर्नाटकास येतों. रामदासपंतांनीं आणखी फिरंगी[23] गाडदी ठेवावे. खामखाँ[24] आझांवर मनसबा[25] मागती करावा. बाह्यात्कारें सलूख कांहीं दिवस दाखवावा व मागें जानबा आमचे मित्रें[26] पुणियांत तीन महिने येऊन बसले. नित्य आम्हांस म्हणत कीं, "मोंगलाजवळ तुह्मीं नवी जागीर मात्र न मागावी. म्हणजे आह्मी त्यांची तुमची पूर्ण निखल [ स ] ता करून देतों." लहान सहानें[27] आम्हांस लिहीत कीं, "हें सर्व लटकें. हे एकाएकीं येऊन तुमचीं घरें जाळतात." आम्हांस वाटे कीं, "लोक-आफवेवर काय आहे ? व जानबा आमचे मित्र आहेत, सहसा आह्मांस फसवणार नाहींत." शेवटीं जें जहालें तें दृष्टीस पडलें. बहुत लोक ह्मणतात कीं रामदास पंतानें जानबा याच कामासाठीं पाठविले कीं, तुम्हीं स्नेह मानून गाफील रहावें. जानबा तो दाखवितात कीं, त्यानें लबाडी केली. असो. याचा अंत ईश्वर जाणें. एकदा मात्र तुह्मांस लिहिलें होतें कीं, याउपर गाजुदीखानाचें येणें कामाचें नाहीं. यांचा आमचा स्नेह होत आहे. परंतु बिघाड जहाल्यापासून निरंतर हेंच लिहितों कीं, "खामखा गाजुदीखानास आणावें. वजीराचा लेक सुभा[31] करून आणिला तर मागें कुंचेंदे[29] दिल्लींत करितील[30]. व येथें मोंगल, मराठे भेटणार[31] नाहींत. गाजुदीखान आलिया सहल[32] पडेल. मोंगल व मराठे मातबर सर्व बराणपुरावर येऊन भेटतील. एक फिरंगी गाडदी नवी फौज मात्र राहील[33]. पठाण[34] कर्नाटकांत बलावले आहेत. महमद अलीखानें[35] त्रिचनापल्लीस बलाविला आहे सर्व गाजुदीखानास अनुकूळ पडतील. दुसरें, तुम्हीं तिकडून, गाजुदीखान दहा पंधरा [हजार, ] आह्मी हिकडून, येणेंप्रमाणें मनसबा उभा राहातांच सर्व कामें होऊन जा-

---

२१. गोविंदराव चिटणीस असावे. हे पेशव्यांच्या पक्षांत होते.

२२. शेर=समर्थ, जबरदस्त.

२३. येथें फिरंगी म्हणजे फ्रेंच.

२४. खामखां=कसेंही करून, सर्व यत्न करून.

२५. मनसबा=स्वारी, हल्ला.

२६. 'मित्र' ही व्याजोक्ति आहे. मित्र ह्मणविणारे पण खरे शत्रु.

२७. लहानसहान सरदार, जाहागिरदार.

२८. वजीराचा लेक सुजा उद्दौला.

२९. कुचेंदे=खटपटी, कारस्थानें.

३०. गाजुदीखान यांस आणिल्यास पाठीमागें ते दिल्लीस कारस्थान करतील, असा भाव.

३१. वजिराचा पुत्र सुजा यास दक्षिणचा सुभा करून आणिल्यास त्यास इकडील मुसलमान अगर मराठे अनुकूळ होणार नाहींत, असा भाव.

३२. सहल=सोपें, सोईचें.

३३. फ्रेंच व दुसरी नवी फौज.

३४. पठाण—हे कर्नोळ, कडपा व सावनूर येथील नबाब असावे.

३५. महमदअली हा अर्काटचा नबाब.

तील. सारांश रामदासपंतानें अब्रू घेतली ही एकदा हरतजवीज करून त्यास पुर्ती जरब[36] देणें घडल्यावांचून तुह्मांस कैलासवासी[37] यांणीं वाढविलें, व तुह्मी इराण तुराण पावेतों लौकिक केला, तो सर्व व्यर्थ ! आम्ही ही रायांचे वंशीं व्यर्थ जन्म घेतला[38]. या उपरि तुम्हीं खामखा त्यांसे[39] आणावें अथवा त्यांनीं दसरा करून मागून यावें. तुम्हीं खामखा देशास यावें. शपथपूर्वक हा मनसबा करावा तरच उत्तम आहे. मागें यावें यावें हें लिहित गेलों. न आलां. आतां त्याचा पुढील रंग जाणून सर्व विस्तारें लिहिलें आहे. याउपर याल यांत संशय नाहीं. या पत्राचें उत्तर यथार्थ सत्वर पाठवणें. गुजराथचे कामास फौज गेली. श्रीकृपेनें काम होत चाललें. जेव्हां म्हटलें तेव्हां जवळ आहे. या उपर गाजुदीखानास पूर्ण भरंवसा देऊन वजिराशीं लगाम[40] राखून शेवटीं न तोडितां दक्षणचे कामास उपयोगीं पडत तें करून यावें. सर्वस्व वेंचून एकदा रामदासपंत मोडावा[41]. ते आम्हांवर मनसबा करितात यांत संशय नाहीं. तुम्हीं हल्लीं लिहिल्याप्रमाणें केलिया सहजच ते हतप्रभ होऊन मोठें यश तुम्हांस येतें. या उपर तुम्ही न आलिया मनसब्यास वाईट, मनास वाईट, यास्तव मनसबा सिद्ध करून यावें. कदाचित गाजुदीखान नामर्द, फौज न ठेवी, बाहेर न निघे, तर दुसरा कोणी पंधरा हजारांचा धनी आणावा. निदानीं तुम्हीं यावें. येथेंही फौज फार आहे. रामदासपंतास तुम्ही आम्ही एकत्र जहाल्यास अगाध[42] नाहीं. रघोजी बावाही येतील. लाभही उत्तम होईल. हें सर्व मनन करून उत्तर सत्वर पाठवावें. येथेंही तरतू[ द ] करीत आहों. ऐवजाची मात्र मोठी वोढ आहे. तुम्हीं आलिया सर्व वारेल. सांप्रत नवें वर्तमान कीं, त्रिंबकें[43] आम्ही न दिला यासाठीं रामदासपंत औरंगाबादेस येणार. मग किल्लाही कदाचित देणें पडेल. जागिरीचा जाबसाल त्याकडूनही अद्याप जहाला नाहीं. मोठा लबाड दगाबाज आहे. सारांश एकदा त्यास जरब द्यावी तरच सर्व सार्थक आहे. छ २१ जमादिलावल. लेखनसीमा. पौ छ २० जमादिलावल[44].

---

३६. जरबदेणें=खोड मोडणें.

३७. कैलासवासी बाजीराव बल्लाळ.

३८. यावरून आपणास जो तह करावा लागला त्यानें व मराठेशाहींत रामदासपंत जो ढवळाढवळ करीत होता तिनें बाळाजी रावांस फारच संताप आला होता असें दिसतें.

३९. गाजुदीखानास.

४०. सफदरजंगाशीं स्नेहभाव ठेवून.

४१. पेशवे फारच इरेस पडले होते. वर टीप ३८ पहा.

४२. रामदासपंतास मोडण्यास कठीण नाहीं असा भाव.

४३ कबूल केलें ( वर पहा ) पण देण्यास उशीर लाविला असा भाव ?

४४. हें पत्र मोठ्या कारस्थानाचें आहे. पेशव्यांवर अनेक संकटें उत्पन्न झालीं असतां त्यांतून साम दाम दंड भेद यांणीं ते त्यांतून कसे पार पडले वगैरे गोष्टी या

( पुढें चालू. )

[ १६२ ] श्री.

राजश्री जयाजी शिंदे गोसावी यांसि

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नो॥ बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद उपरि येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित असिलें पाहिजे. विशेष. तुम्हीं जयनगरहून निघालियावर एक पत्र आलें त्या आलीकडे पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तुमची व नवाब वजीर[45] यांची भेटी जाली, यमुना पार होऊन कादरगंजा जवळ दहा हजार पठाण[46] सरदार सुद्धां बुडविला, तेंही वर्तमान परभारेंच येऊन पोचलें. तदोत्तर अहमदखा पठाण बंगस प्रयागास झांसरा[47] करून होता तो उठऊन फरोखाबादेस येऊन लढाईस नमूंद[48] जाहाला. त्याची तुमची लढाई सुरू जाहली. अहमदखा बंगशानीं फरोकाबाद सोडून गंगातीरास बेहंडा[49] अडचण जागा पाहून आराबा[50] रचून त्याची तुमची नित्य लढाई होऊं लागली. तथापि वर्तमान लिहिलें नाहीं. याजवरून अपूर्वता, आश्चर्य वाटलें. प्रस्तुत राजश्री दामोदर महादेव[51] यांचें पत्र छ ७ जमादिलावरचें छ ५ रजबीं येऊन पावलें कीं, "अहमदखा बंगस बाहादूरखां रोहिल्यास शरण जाऊन त्यास दहा बारा हजार स्वार व प्यादे यांजसीं कुमकेस आणिलें. सरदारांची[52] फौज व जाटाची[53] फौज व नवाब वजीराची फौज गंगापार होऊन छ २ जमादिलाखरीं लढाई जाली. बाहादुरखां रोहिला बुडविला. हजारों घोडीं घेतलीं. हत्ती पाडाव[54] केले. हें वर्तमान बंगसानीं ऐकून घाबरा जाला. दुसरे दिवशीं पळून गंगापार गेला. लष्कराच्या लोकांनीं घोडीं पाडाव फार आणलीं. तोफखाना पाडाव केला." म्हणोन लिहिलें तें श्रवण होऊन संतोषा-

---

(मागील पृ०.)

वरून चांगल्या लक्षांत येतील. गाजुदीखानाच्या मसलतीचा हेतु हा होता कीं, दक्षणचा सुभा आपले कबांत राहवा, किंबहुना पुढें मागें सर्व दक्षण आपले अमलांत यावी

हें व पुढील ४ मिळून पांच पत्रें रा० रा० काशिनाथ कृष्ण लेले इंदुरकर यांनीं आम्हांस दिलीं. हीं सर्व असल आहेत. वरील पत्रांतील शेवटचा बराच मजकूर खुद्द थोरल्यांच्या हातचा आहे. आम्ही नकला घेऊन अस्सल पत्रें लेले यांजकडे परत केलीं.

४५. नवाब वजीर=अयोध्येचा नवाब सफदरजंग.

४६. प्रथम अफगाणिस्थानांतून जे मुसुलमान आले त्यांस पठाण म्हणण्याचा प्रघात आहे.

४७. झासरा म्हणजे? आसरा तर नव्हे?

४८. नमूद=ऋजु, उद्युक्त.

४९. बेहड=नाल्याच्या प्रवाहामुळें झालेली खोल भेग.

५०. आराबा=तोफखाना.

५१. हे कोण?

५२. शिंदे होळकरांची.

५३. सुरजमल्ल जाट.

५४. पाडाव केले=धरिले.

च्या कोटी[55] जाहल्या. शाबास तुमच्या हिमतीची व दिलेरी-रुस्तुमीची[56]! व शाबास लोकांची! आमच्या दक्षिणच्या फौजांनीं यमुना गंगा पार होऊन रोहिले पठाणांसीं युद्ध करून आपण फत्ते पावावें हें कर्म लहान सामान्य न जालें! तुम्ही एकनिष्ट, कृतकर्मे सेवक. या दौलतीचे स्तंब आहां!! जें चित्तावर धरितां तें घडून येतात. पहिलीं यशावह कर्मे संपादिलींत ततोद्याधिक हें यश संपादिलेंत. या यशास जोडाच नाहीं! परंतु केल्या मनसुबियाचा अर्थ किमपि लिहीत नाहीं ऐसें नसावें. सर्वदा आपलें कुशल वृत्त लिहित जाणें. तेणें करून संतोष होत जाईल. मोठा[57] मनसबा कठीण होता. नानाप्रकारचीं येथें वर्तमानें उठतात. तुमचें पत्र तो येत नाहीं. याजमुळें चित्त चिंतेंत होतें. इरान *तुरान पावेतों लौकीक जाला कीं, वजीर मोडला, पळालेला असतां फिरोन फत्तेच्या मसनदीवर बसविला. याजहून यश कोणतें अधिक आहे? या उपरि तेथील रंग भरून, स्वकार्य साधून, आपलें मुलुखांत येणें योग्य आहे. छ ७ रजब बहुत काय लिहिणें[59]. लेखनसीमा.

[ १६३ ] ॥ श्री ॥

राजश्री साबाजी[60] सिंदे गोसावी यांसि.

छ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद सु॥ इसने खमसेन मया व अल्लफ तुम्हांकडून पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं ऐसें नसावें. सर्वदां आपले कुशल वृत्त लिहीत जावें. यंदां सरदारांनीं[61] मोठा अवघड मनसुबा करून, यमुना भागिरथी पार होऊन, पठाण रोहिल्याशीं गाठ घालून, युद्धप्रसंग करून पन्नास साठ हजार फौज बुडविली. तुम्हीं सर्व लोकांनीं जिवाचा तमा न धरितां साहेब-कामावरीच[62] दृष्टि देऊन शत्रु शासनाक्रांत केलात. तुमची निष्ठा दृढोत्तर, तद्योगें यश रामेश्वर इरान *तुरान

५५. संतोषाच्या कोटी=अति आनंद.

५६. दिलेरी-रुस्तुमेची=धारिष्टाची व पराक्रमाची.

५७. येथपासून खुद्द खाशांच्या हातचें अक्षर आहे.

५८. सफदरजंगास पठाण लोकांनी पदच्युत केलें होतें, त्यास पुन: वजीरी दिली.

५९. हें पत्र वाचून हल्लींच्या हतवीर्य लोकांसही क्षणभर स्फुरण येईल. तेव्हां ज्यांणीं असे पराक्रम केले त्या लोकांस हा स्वामिगौरव अमृताहूनही गोड लागून त्यांचें शरीर दुणावलें असेल यांत संशय नाहीं!

६०. साबाजी शिंदे हे राणूजीचे कोण हें समजत नाहीं. भाऊसाहेबांच्या बखरींत साबाजी शिंदे यांस दादासाहेबानीं लाहोर येथें ठेविलें होतें असें आहे. भा० सा० ब० पृष्ट ५१ व ५७ पहा. तेच साबाजी हे असावे. हे हल्लीं जयाजी शिंद्यांच्या लष्करांत होते असें दिसतें.

६१. शिंदे होळकर.

६२. साहेब काम=स्वामिकार्य 'स्वामी साहेब ईरित:' रा० व्य०को०.

* 'दुराण' असेंही होईल.

पर्यंत प्रफुल्लित जालें. शाबास सरदारांची ! व शाबास तुम्हां लोकांची आहे !! दुसरियांस हें यश फार दुर्लभ असे. इकडील वृत्त राजेश्री जयाजी शिंदे यांस लिहिलें आहे. त्याजवरून कळेल. अतःपर माघारें यावें. रवाना छ २६ रज्जब बहुत काय लिहिणें. लेखन सीमा.

[ १६४ ] ॥ श्री ॥

राजश्रियाविराजीत राममान्य राजश्री आपाराव स्वामींचे शेवेसीं.

पो॥ बाळाजी जनार्दन सां॥ नमस्कार विनंती उपरि येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लिहीत जावें. विशेष. तुम्हीं छ १४ सवाल छ २१।२४ व छ २९ जिलकादचीं पत्रें पाठविलीं ते पावलीं. तह प्रकर्णीं राजश्री पाटील बाबांचें व इंद्रसेनीचें बोलणें जालें त्यांतील मजकूर कलमबंदी लिहून पाठविला तो सविस्तर कळला. पाटील बावांनीं लिहिल्याप्रमाणें तहनामा व डौलें शिक्यानशीं लौकर आलें पो॥ येविशींचा मजकूर लिहिला तो कळला. त्यास येविशींचे मजकुराचीं पत्रें पाटील बावाचीं ही तीन चार रवानग्यांचीं आलीं. त्यांत लिहिलें कीं, " श्रीमंत दादासाहेबांस इंग्रजांनीं स्वाधिन करावें असें पक्कें करून घेतलें आहे व येथून कलमांची याद पाठविली होती त्यांपैकीं कांहीं कलमें बोलून करारांत आणिलीं आहेत. परंतु पूर्वीं पारशी नक्कल तहनाम्याची येथें पाठविली, त्याप्रमाणें शिक्का करून तहनामा पाठवावा; व एक डौल शिक्का करून पो॥, शिक्याचा तहनामा इंद्रसेनास *दाखवून. येणें करून त्यास इतबार पुरेल व जावयाची जलदी करणार नाहीं. हा तहनामा आम्ही आपल्या जवळ ठेवूं, त्यास देणार नाहीं. दादासाहेबांचें कलम वगैरे कलमें ठरावांत आलीं, त्याप्रमाणें डौलांत भरून त्याप्रमाणें इंद्रसेनाकडून कलम त्याचा तहनामा आणवून मग हा देऊं." असें लिहिलें. आणि मुदतीचीं पत्रें पाठविलीं. त्यावरून तहनामा शिक्यानशीं व डौल पो॥ आहे. परंतु दादासाहेब यांस अगोदर स्वाधीन करून घ्यावें. मग किल्ले मुलुख सरकारचा सरकारांत घ्यावा. तरच तह करावा. याप्रमाणें होत नसल्यास करूं नये म्हणून राजश्री पाटील बावाचे पत्रीं लिहिलें आहे व नारो शिवदेव यांस ही विस्तारें करून लिहिलें आहे. त्याजवरून तुम्हांस सविस्तर कळेल. तुम्हीही पाटील बावाशीं

---

६३. येथें बाजूवर पेशव्यांचा शिक्का आहे.

६४. पाटील बावा=महादजी शिंदे.

६५. इंद्रसेन—हा इंग्रजांचा वकील किंवा दुभाष्या. हा जातीचा कोण तें स्पष्ट कळत नाहीं. तरी बंगाली बाबू असावा असें अनुमान होतें.

६६. डौल=सही, शिक्का करून पाठविलेला कोरा कागद. ह्यावर तहाचीं कलमें लिहून इंग्रजांचे तो स्वाधीन करावयाचा होता.

* म्ह० दाखवूं.

बोलून अमलांत आणावें. इंग्रजांचे[67] तहाचें काम फार नाजूक व मोठें आहे. कोठें कसे पेंच बसतात व पुढे बसतील हें सविस्तर अर्थ मशारनिलेचे पत्रीं लिहिलें आहेत. सारांश दादासाहेब स्वाधिन होत असेल तरच [ त ] ह करावा व हैदरखांनाचे[68] कलमाचा पर्याय लिहिला आहे. हीं दोन कलमें, वरकड साधेल तेथवर, याप्रमाणें जहालें तरच करावें. नाहीं तर करूं नये. मग श्रीमंतांचें दैव आहे. रवाना छ १९ मोहरम बहुत काय लिहिणें लोभ[69] असों दिजे हे विनंती. पौष शुद्ध ९ रविवार. मुक्काम बिलोटी [ बलोटी, बमेटी? ]

[ १६५ ] ॥ श्री ॥

राजेश्री आपाजीराव स्वामीचे सेवेशीं.

विनंती उपरि तुम्हीं छ ११ जमादिलाखरचें पत्र पाठविलें तें पावलें. धुळपानीं[70] इंग्रजाचे तरांडियांसि[71] लढाई देऊन धरून नेलीं त्याविशीं इंद्रसेनास मुंबईकरानें वर्तमान लिहून पाठविलें. त्यानें राजश्री पाटीलबावास सांगोन पाठविलें. त्यावरून पाटीलबावांनीं स्वामींस पत्र लिहिलें आहे. व पांडुरंग रघुनाथ यांणींही सविस्तर लिहिलें आहे. त्यास करारापमाणें गोष्टी अमलांत याव्या. धुळपास ताकिद होऊन तरांडीं माघारीं देवावीं म्हणून विस्तारें करून लिहिलें तें सविस्तर कळलें. त्यास धुळपानीं तरांडीं वरील सरदार व लोकसुद्धां दस्त[72] केलीं ते तह जाला त्यापक्षीं सोडून द्यावयाचीं. त्यांत मुंबैकराचें पत्रही आलें. त्यावरून तेव्हांच धुळपास लिहून सोडून दिल्हीं. राजश्री पाटीलबावांस उत्तर लिहिलें आहे. रवाना छ १९ रज्जब हे विनंती.

[ १६६ ] ॥ श्री ॥

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री अंबाजीपंत[73] स्वामी गोसावी यांसि

सेवक बाजीराव साष्टांग नमस्कार विनंति उपरि येथील कुशळ तागाइत ज्येष्ठ कृष्ण सप्तमी गुरूवार पर्यंत यथास्थित जाणून स्वकीय लिहिणें. विशेष—तुमचीं

---

६७. येथपासून खुद्द नानांचें अक्षर आहे.

६८. हैदरअल्ली म्हैसूरचा.

६९. सालब्याचा तह महादजीचे मार्फत इंग्रजांशीं झाला ( १७८२ ) त्या संबंधाचें हें पत्र आहे. वरील आपाराव कोण तें समजत नाहीं.

७०. आनंदराव धुळप देवगडकर याजकडे पेशव्यांचे आरमाराचा भाग होता. धुळपांनीं इंग्रजांच्या तारवांशीं रत्नागिरीच्या सुमारास लढाई करून त्यांचा पुष्कळ नाश केला. या धुळपावरील एक पवाडा ‘ विविधज्ञानविस्तार ’ या पुस्तकांत छापिला आहे.

७१. तरांडीं=तारवें.

७२. दस्तकेलीं=जिंकून घेतलीं.

७३. अंबाजीपंत पुरंदरे सासवडकर. यांस ग्रां० डं० आबाजी असें ह्मणतात ती चुकी होय.

दोन तीन पत्रें व बाळाचें[७४] पत्र व राजश्री स्वामींचीं[७५] पत्रें ऐशीं कांहीं काळीं परवां ऐशीं पावलीं. त्यांत सारांश कीं, " छावणी केली उत्तम केलें. खर्चास व लोक राजश्री स्वामी पुरवितात. प्रतिनिधीस व सरलष्कर, कृष्णाजी दाभाडे रवाना केले. महाडास येतील[७६]. उदाजी चव्हाणाकडील कारकुनास सांगोन दोन हजार प्यादे आणविले आहेत तेहीं येतील. संभूसिंग चव्हाण यासही बोलाविलें आहे. तेही आलियावर रवाना होतील. सचिवासही निरोप दिल्हा." म्हणून सविस्तर लिहिल्याप्रमाणें कळलें. परंतु येथील मनसबा ऐसा आहे. शेखजी[७७] आम्हांस भेटले. खो क री ची वाट मात्र त्यांणीं दाखवून दिल्ही. काम करितां इतकेंच केलें. येथें येतांच दुसरे दिवशीं त्यास बोलावून हत्ती, वस्त्रें देत होतों. खर्चाची रदबदल करूं लागले. तेव्हां बोली करून तूर्त दहा हजार रुपये त्याचे पदरीं घातले. बहुमानासाठीं बहुतसा आग्रह केला. परंतु ते करून घेईनात. लोक कोणी त्याजवळ राहिले नाहींत. सारे उठउठोन आपापले कबिले[७८] काढावयास गेले. तेव्हां गड सुटले नव्हते. आतां गड सुटले. सारे कबिले मुलखांतच मागती राहिले. लोकांस मागती बोलावूं पाठविलें आहे. येतील तेव्हां खरें. पहिले लोक कोणी शें दोनशें भेटले त्यांस अटक करून ठेवावें तरि कौल दिल्हा कार्य होतें[७९] कौलाचेंच होतें यास्तव त्यास अटकही करितां नये. यास्तव निरोप दिल्हा. आंतील राजकारण होतें तें तो पहिलेच दिवशीं वारलें. आतां प्रस्तुत कांहीं शेखजीच्यानें कार्य होत नाहीं. बरेंही वाटत नाहीं. चार महिने येथें राहिल्या उपरि मग त्यांच्यानें तरतूद होईल ते करतील. खर्चास मागतील तसें देणें लागेल. गड घेतले त्यांपैकीं अवचितगड त्याचे हवाली कबिले ठेवावयास करावा असे झालें. तोही त्याचे हवाली केला. न करावा तरि बेदील होतो. करावा तरि इतबारही[८०] पुरेना. परंतु करणें प्राप्त झाला. केला. या जातीचे त्याचें वर्तमान आहे. खानजादा[८१] थोरला मेला. त्याचा लेंक बाहेर होता तो आम्हांजवळ आहे. आणि लहान भाऊ त्याचे सहाजण आहेत. हाही मूल शहाणाच आहे. आंत सिद्दीसमूल व सिद्दीअंबर अ फ ला नी ऐसे आहेत. बाराशें माणूस किलियावर आहे. पहिले थोडके होते. अलीकडे अंजनवेली व *उंदेरीहून मदत त्यास आली. एकूण भरती झाला

---

७४. बाळा=बाळाजी बाजीराव.

७५. स्वामी=शाहू.

७६. हें पत्र हबशी याच्या मसलतीच्या संबंधाचें आहे.

७७. शेखजी--हा जंजिऱ्यांतील एक फितुरी.

७८. कबिले=कुटुंबें.

७९. येथें अक्षर गेलें आहे.

८०. इतबार=विश्वास.

८१. शिद्दीच्या मुलांपैकीं वडील.

* उंदेरी कीं खांदेरी तें स्पष्ट नाहीं. तरी पुढील संदर्भावरून उंदेरीच असावें.

आहे. अंजनवेलही मजबूतच आहे. उंदेरीही मजबूनच आहे. चारी जंजिरें[८२] त्याचे बरे खबरदार मुसलमानच आहेत. अंजनवेलीस कांहीं मराठे असतील. त्यांकडे विजयगड, गोवळचा कोट दोन आहेतच. तिसरा मंडणगडही त्यानें बळाविला आहे. रायगडावर तीन चारशें माणूस मुसलमान आहेत. चार पांचशें मराठे आहेत. गड म [ ? ] बळाविला आहे. झुंजतात. कांहीं पैगामही वरील लागला म्हणून गेले आहेत. ते लिहितात सत्यमिथ्या त ही कॅ[८३] क तह किंवा नाहीं कळलें नाहीं. वर्तमान येईल तें लिहून पाठवून. ऐसें वर्तमान आहे. सविस्तर कळावें म्हणून लिहिलें असे. लोभ असो दिजे हे विनंती. छ २२ जिल्हेज शनवारीं[८४].

[ १६७ ] ॥ श्री ॥

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ५२ प्लवंग संवत्सरे चैत्र शुद्ध प्रतिपदा रविवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपति स्वामी यांणीं* राजश्री अंबाजी त्र्यंबक यांसि आज्ञा केली ऐसीजे. मनसुब्यांचा[८५] अर्थ सविस्तर राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांस लिहिला आहे त्यावरून कळेल. तरि तुम्हीं पंडित मशारनिल्हेस चार गोष्टी विचाराच्या सांगोन अमित्रांचे[८६] पिछावरि * * ८७* क य त फितूर तुटे तो अर्थ करणें. तुम्हीं स्वामींजवळ बोलोन गेलां काय, करितां काय, हा विचार कळत नाहीं. राजश्री प्रधानाचे व राजश्री सेनापतींचे चित्तीं विचार काय आहे हा तऱ्हा शोध घेऊन लेहून पाठवणें. त्यावरून स्वामी निश्चिती मानितील. गुज काढावयाचा विचार चित्तांत येत नसेल तरि इलाज काय? वारंवार ल्याहावयाची सीमा झाली. परंतु कार्यभागाचा विचार दिसत नाहीं. या उपरि तरि गुज काढावें. फितूर तुटावा ऐसें चित्तांत असेल तरि पत्रदर्शनीं फौजेनिशीं अमित्राचे पिछावर येऊन त्याची वाताहात करणें[८८]. बहुत[८९] काय लिहिन.

---

८२. जंजीरा. जजीरा=पाण्यांतील किल्ला.

८३. तहकीक?= तथ्य, खरें वर्तमान

८४. हें सर्व पत्र बाजीराव बल्लाळ यांच्या हातचें आहे. अक्षर चांगलें वळणदार नाहीं. हें पत्र व पुढील कांहीं आम्हांस श्री० रा० नाना साहेब पुरंदरे सासवडकर यांणीं दिलीं या बद्दल आम्ही त्यांचे आभारी आहों.

*येथें कोरी जागा आहे.

८५ हा 'मनसुबा' कोणता ?

८६. अमित्र=शत्रु, गनीम.

८७. येथें कोरी जागा आहे.

८८. वरील सेनापतीच्या उल्लेखावरून हा त्यांचा फितूर निजामुल्मुल्क यांजकडे झालेला असावा असें दिसतें. तो फितूर नाहींसा करण्यास निजामावरच हल्ला करावा असा शाहूचे लिहिण्याचा भाव दिसतो.

८९. येथून खुद्द महाराजांचें अक्षर.

[ २६८ ] ॥ श्री ॥

चिरंजीव राजश्री नानों[10] यांसि बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लिहीत जाणें. विशेष. तुम्हीं पत्र छ २८ रबिलाखरचें पाठविलें तें छ १२ जमादिलोवलीं सांडणीस्वाराहातीं येऊन पावलें. "गाइकवाडाचे आपले फौजेचें युद्ध[11] छ २७ रबिलाखरीं झालें. गें ड्या [ ? ] पावेतों मोडून ताराज [ ज? ] केलें. त्याचे बुनगे तिजाई लुटून आणिले. उंटें, घोडीं, पालख्या घेतल्या" म्हणोन विस्तारें लिहिलें तें कळलें. लेखनार्थ-श्रवणें संतोष झाला. मोठी गोष्ट झाली. शाबास तुमची लोकांची! बरी केली! गायकवाड कृष्णेवर राहिला, तुम्ही कृष्णेवर आहां, म्हणोन सांडणीस्वारांनीं सांगितलें. त्यास राजेश्री मानाजी पायगुडे व तात्यांहीं[12] तुम्हांजवळ येऊन पावलेच असतील. सारे एकदील होऊन गायकवाडास जाऊं न देणें. जोर पोहोंचल्यास लुटून नेस्त नाबूत करणें. जों पर्यंत गायकवाड [ याचा ] वारापाणी झाला नाहीं तों फौज न फोडणें. आमचा मोंगलाचा सलूख झाला. इकडील सर्व गुत्ते उरकले. आम्हीं मजल दरमजल येत आसों. आणि छ १२ जमादिलावलीं नि[13] जा कों ड्यावर मुक्काम झाला. जलदीनें येतों. गायकवाड जाऊं न पावे तें करणें. युद्ध-प्रसंगीं राजेश्री सोनजी भास्करें[14] व राजेश्री बापूजी[15] बावा व सरकारचे हुजूरातचे लोक व राजहुजुरातच्या लोकांनीं शर्त केली, बापूजी बावास तरवारीची जखम लागली, नागोरीं[16] यास गोळीची जखम लागली, म्हणोन [ लिहिलें ] तर ते थोर थोर मातबर लोक प्रसंगीं असतां का चुकतील ? व पुढेंही सर्व प्रकारें त्यांसीच भरंवसीं[17] असे. तुम्हीं सर्वांचीं समाधानें करणें. सोडली[18] बाजी तुम्हीं सांवरली! जी गोष्ट तुमचे वडिलांचे वडिलांस योग्य[19] तें

---

१०. नाना पुरंदरे—यांस चिरंजीव लिहिण्याचें कारण असें कीं, अंबाजीपंत पुरंदरे व बाळाजी विश्वनाथ हे आपणास भाऊ भाऊ समजत व हाच मरोसा पेशव्यांनीं शेवटपर्यंत पुरंदऱ्यांशीं ठेविला होता. तेव्हां नानाकडे धाकटे भावाचें नातें येत असावें. याचें नांव त्रिंबक सदाशिव.

११. हें युद्ध बाळाजी बाजीराव हैदराबादेकडे असतां ताराबाईनें जें राजकारण केलें त्या संबंधाचें होय. यावेळीं नाना पुरंदरे व दुसरे सरदार यांणीं पेशव्यांची आजू राखिली.

१२. तात्या कोण?

१३. 'नि' कीं 'जि' ?

१४. 'भास्कर' आहे तेथें 'भापकर' असें असावें.

१५. हे बापूजी खंडेराव चिटणीस असावे. रामराजाचें चरित्र पहा.

१६. नागोरा कीं जागोरा ? हा कोण ?

१७. यावरून आपले लोकांवर पेशव्यांचा इतबार कसा होता तें समजतें.

१८. येथपासून खुद्द खाशांचे हातचा लेख आहे.

१९. असा स्वामिगौरव झाल्यावर सेवक सेवेंत तत्पर कां नसेल ?

तुम्हीं केलें! या उपर बहुत सावधतेनें जरब देणें. मळमळीत न करणें. आम्ही येऊन पोहोंचतों. छ १४ जमादिलावल. हे आशीर्वाद.

[ १६९ ] ॥ श्री ॥

राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री अंबाजीपंत स्वामी गोसावी यांसि.

पोष्य बाजीराऊ बल्लाळ नमस्कार विनंती उपरि येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करीत जाणें. विशेष–तुह्मांकडून एक दोन पत्रें आलीं व चिरंजीव राजश्री चिमाजी यांनीं लिहिलें त्यावरून सविस्तर अर्थ कळों आला. ऐसियासि मुलकाच्या बंदोबस्ताबद्दल फौज या प्रांतें ठेवावी लागते. त्यास कांहीं फौज आंगेजणी[100] केलिया खेरीज राहते असें नाहीं. यास्तव तुमच्या आगमनाचा मार्ग लक्षावा लागला. तरि जेक्षणीं तुह्मांस पत्र पावेल ते क्षणीं अविलंबें स्वार होऊन आलिया उत्तम आहेत. पूर्वीं हीं पत्रें पाठविलीं आहेत. परंतु यावयास विलंबावर घातलें. या उपरि दिरंग लावावा ऐसें न करणें. त्वरेनें आलें पाहिजे. तुम्ही येथें आलियावरि येथील बंदोबस्त तुमचे स्वाधीन करून राजदर्शनास जावें लागतें. ज्यांनीं रहावें त्यांनीं आंगेजणी करून बाकी भरावी आणि लोक ठेवणें तें तुमचे विचारें ठेवावे लागतात. आह्मांकडे सरकार इजारा करून घेतलें. दरगांवीची बोली औरंगाबादेस गेलियावरि करून घ्यावेशी केली आहे. तेही होईल. बाराच प्रसंग इकडील अनुकूळ केला. परंतु तुमचे येण्यामुळें तटला आहे. तुम्ही आलियाविना कांहीं होत नाहीं. तरि लौकर लौकर येणें. आलियावरि तुह्मांस ठेऊन आम्ही हुजूर जाऊनें. कळलें पाहिजे. विनीं तुम्ही आल्या खेरीज एक राऊत राहत नाहीं. कंठोजी कडील कारभार तसाच बुडतो. सर्व प्रकारें आमचा घात न करणें. लौकर येणें. कीं पुढें तरी मामलियाची सांवरासांवर होईल. बारंवार लिहावें तर अडलेंसें दिसतें. परंतु न लिहितां उपाय नाहीं. लौकर येणें. तुमचे येणें झाल्या खेरीज आमचें येणें होतच नाहीं. लोभ असो दीजे हे विनंती.[6]

[ १७० ] ॥ श्री ॥

चिरंजीव राजमान्य राजश्री महीपतराव त्रिंबक यांसि बाळाजी बाजीराव प्रधान आशीर्वाद उपरि येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लेखन करणें.

---

१००. अंगेजणी=स्वतः हिमतीनें केलेलें कृत्य, साहस.

१. येथपासून लिहिणारानें मजकूर घाईनें लिहिला आहे.

२. इजारा=मक्ता.

३. जाऊन=जाऊं.

४. येथपासून शेवटपर्यंत सुद्ध बाजीराव यांचें अक्षर आहे.

५. कंठोजी ? कदम ?

६. हें निकडीचें पत्र कोणत्या प्रसंगानें लिहिलें तें स्पष्ट कळत नाहीं. तथापि खानदेशांतून लिहिलें असावें.

विशेष. मोगलाशीं छ १९ जमादिलाँखर रविवार लढाई भारी होऊन दहा हत्तीवाले त्यांजकडील मारले. पाडाव हत्ती दहा व चार पांच तोफा जाल्या. याप्रमाणें मातबर लढाई झाली. तुम्हांस कळावें ह्मणून लिहिलें आहे. चिरंजीव राजश्री नानां सुखरूप आहेत कळावें. जाणिजे छ २० जमादिलाखर सुरुसन सितैन मय्या व अल्लैफ. बहुत काय लिहिणें हे आशीर्वाद. पौ। छ २४ जमादीलाखर.

[ १७१ ] ॥ श्री ॥

चिरंजीव राजमान्य राजश्री बज्याबा यांसि प्रति सदाशिव चिमणाजी आशीर्वाद उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशल लिहीत जाणें. विशेष--तुह्मांकडील पत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. तरि वरचेवर सविस्तर वर्तमान लिहीत जाणें. आह्मी मजल दरमजल नर्मदापार झालों. पुढें ही दरकूच जातं असों. घोडयावर बसणें व लिहिणें, पढणें चांगलें करणें. तीर्थरूप बोलावतील तेव्हां पुण्यास जात जाणें. फार खेळत न जाणें. घरीं अवई मायेनें रागें भरणार नाहीं. लाडके व्हाल. तें कामाचें नाहीं. चांगलें लिहिणें, पढणें, घोडयावर बसणें करणें. छ. २ रमजान. हे आशिर्वाद. पौ छ. २२ रमजान.

[ १७२ ] ॥ श्री ॥

चिरंजीव नाना यांसि भाऊ. आशिर्वाद. सविस्तर तीर्थरूपांनीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. सारांश तुह्मी सारे जमा करून काम उत्तमच जाहालें. सलाबत वाढली. तरी बहुत विचारें हावभरी[13] न होतां सर्व कामें करणें. आम्हींही दरमजल जसें वर्तमान येईल तसे फौज घेऊन पुढें येऊन[14]. रघोजी बावास विचारें करून राखिलें पाहिजे. हया आणलियां[15] त्याचें काम बुडतें. पेंचही आहेत ह्मणून निरोप दिला. फत्तेसिंगांचे[16] फौजेंत त्रिंबक हरी[17] व दारखोजी पाटील

७. जमादिलाखर कीं जमादिलावल तें स्पष्ट होत नाहीं.

८. पाडाव=हस्तगत.

९. नाना पुरंदरे बरोबर होते असें दिसतें.

* सितैन मया व अल्लफ=११६०=हसवी सन १७५९.

१०. यावरून सोनपत पानपताच्या मोहिमेस जातांना हें पत्र लिहिलें असें होतें.

११. यावरून बजाबा पुरंदरे या वेळीं लहान असून त्यांचे शिक्षणावर पेशव्यांची नजर होती असें दिसतें. शिक्षण कोणत्या प्रकारचें होतें तेंही या पत्रावरून व्यक्त होतें.

१२. सलाबत=पगडा, दाब.

१३. हावभरी=दुर्धर आशेस भरलेला.

१४. येऊन=येऊं. हें पत्र १७५० सालीं गायकवाडाच्या मदतीनें व रामदासपंताच्या साहाय्यानें ताराबाईनें जें कारस्थान मांडलें होतें त्या वेळचें आहे.

१५. हया आणिलिया=त्रास दिल्यास.

१६. फत्तेसिंग भोसले.

१७. त्रिंबक हरी पटवर्धन.

सरदार ते आमचे बदल कदाचित राहिले तरि अक्कलकोटीं राहतील. फौज हयाँच आहे. आठ कोस प्रमाणें दर मजल कडवे देशचा दाणा खात ताजे होत येतों. वरकड तपशील काय लिहावा ? हजार प्रकारें सारे एक होऊन, आपले फौजेचा गाँहा चांगला करून, आपण जरब न खातां जें होईल तें करणें. घायगुडे वगैरे फौजही सामील जाहलीच आहे. रवाना छ. १३ जमादिलावल. हे आशिर्वाद.*

[ १७३ ] ॥ श्री ॥

चिरंजीव नाना यांसि भाऊ, आशिर्वाद सविस्तर मजकूर भेटी नंतर कळेल. वरकड तरतुदेचा मजकूर तीर्थरूपांनीं लिहिला आहे त्याप्रमाणें करणें. विशेष राजकारणांत असतील ते सविस्तर कोण कोणे प्रकारें व तुम्हांसीं ही दुसरे प्रकारें संदेहाचे लिहून पाठविणें त्याचा सुमार पेयून केला पाहिजे तर सविस्तर लिहिणें. वरकड सातारां कजिया न पडावा. सर्व उत्तम. परंतु काले करून प्राप्त जाहालें तें आपले इजँती साठीं केलें पाहिजे. तुम्हीं बहुत सावधतेनें सर्व करावयाचा काल आहे. परंतु आलीकडे तुमचें सविस्तर पत्र येत नाहीं. उचित नाहीं. सर्व लिहून पाठविणें. आमची रवानगी पुढें तुम्हांकडे करणार याचाही विचार सर्व लिहिणें. सारांश इनाम देऊन रोजचेरोज येथें लवकर वर्तमान येई तें करणें. रवाना छ. २९ जमादिलावर. दादांस पांच सात रोज बरें वाटत नव्हतें. इकडील पाणियानें परसाकडेचें जाहलें होतें. आतां उतार पडून बरे जाहले. येथील फौज दरमजल येते ही खबर तेथें पावलियावर कोणे प्रकारें भाव होतात हें सर्व लिहिणें. वरकड हजार प्रकारें लबाडया करणार आमचे दरबारीं गृहस्थ आहेत. ते चुकत नाहीं. सर्वही ईश्वर क्षेम करून परस्परें पेंच तुटतील. असो. पत्रीं विशेष काय लिहावें ! हे आशिर्वाद.

[ १७४ ] ॥ श्री ॥

चिरंजीव राजमान्य राजश्री नाना यांसि प्रति सदाशिव चिमणाजी आशिर्वाद उपरि येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहिणें. विशेष. तीर्थरूपांकडून पत्रें आलीं त्याचा वगैरे कित्येक अर्थ लिहिणें तो तुम्हांस लिहिलाच आहे. त्याचीं उत्तरें अद्यापी कांहीं येत नाहीं तरि सर्व वर्तमान लिहिणें. कर्नाटकच्या मामलियाची राजश्रींचीं पत्रें वगैरे कामें यमाजी शिवदेव व पाटणकर यांचीं करून पाठवावीं तीं अद्यापी येत नाहीं. व पैक्याचे गोपाळराव वगैरे

---

१८. हयाँच=दुर्दशेंतच.

१९. गाहा=एकीकरण, मथून राहणें.

* पर पत्र १६८ पहा.

२०. तीर्थरूप=नानासाहेब पेशवे.

२१. 'प्रतिष्ठा इजति. स्फूर्ता' रा० व्या० को०.

यांजकडील कोणाकडून काय येतो तो मजकूर सविस्तर लिहून पाठविणें. येथील विचार तर मा च णु रा हून कूच करून अंडार कवठें येथें आलों. येथें पांच सात मुक्काम होतील. पुढें होईल तें वर्तमान लिहिलें जाईल. मातोश्री आईसाहेब यांचा विचार काय? राजेश्री स्वामींची मर्जी कशी? वरकड सामादिकें कोण कसे आहेत याचा अंतर बाह्यता मजकूर लिहिणें. तुम्हीं सविस्तर मजकूर पुण्यास लिहित असाल तेथील भाव भक्ति कळत असेल ते लिहिणें. येथें तीर्थरूपांनीं नायकाची समजावीस काढावी, सरंजाम घ्यावा, पुढें त्यांनीं दाभाडियाचा कारभार उरकायाजोगी फौज गेलीच आहे तें करून आम्हीं जातों. ताराबाईची गडबड राहिलियास करनाटकांत पाय घालावा, बापूजी नाईकानें भीकच मागावी हे बाबांचे मनांत व दाभाडे याचाही निकाल [करणें त्याचे] हजार विचारच होतात या मुळें होत नाहीं. तुम्हीं त्या शहावरच दररोज राहणें. इकडे आम्हांसच मातबर गुंता पडालियास तुमचे तिकडे जाणें कळतच आहे म्हणून लिहिलें होतें. नाईकास तीन चार लाख यशवंतराव पवाराचा सरंजाम व कांहीं गुजराथेंत द्यावें अशी मर्जी आहे. आम्ही या प्रमाणेंच करावें असें लिहिलें आहे. पवार कांहीं कामाचे नाहींसे दिवसें दिवस रूप दाखवितात. बावा दाभाडिया पासून पैका घ्यावयाचा मनसुबा करतात; आम्हांसही लिहितात. आम्हीं कामाचे नाहीं, न करावें असें लिहिलें आहे. करूं दिलें, आब पुरला, तर जवळील गुंता उरकून पुढें जातील. नाईकाचे या प्रमाणें तीर्थरूपांचेच विचारेंच आहे. करतील. आम्हांस मग गुंता नाहीं. पैका मात्र पाहिजे. आठ नव लाख त्यांत बाबा तीन देतील वरकड तुम्हांस मी * * * येईल मजकूर लिहून पाठविणें. हे आशिर्वाद.

[ १७५ ] श्री.

चिरंजीव राजश्री नाना यांसि बाळाजी बाजीराव प्रधान आशिर्वाद उपरि. तुमचे सविस्तर पत्रांचीं उत्तरें अलाहिदा लिहिलीं आहेत त्याजवरून सर्व कळेल. चिरंजीव भाऊसाहेब आल्याखेरीज तुम्ही हेरगीज न व्हावें. त्या फौजेंत अवघा मदार तुमचाच आहे. तुम्ही आल्यानें ठीक पडणार नाहीं. राजश्री बापूजी नाइकास अजमेर पावेतों भाऊसाहेबांचे खबरीसाठीं रवाना करणें ते फलाणे ठिकाणीं आहेत अशी खबर आल्यावर यांस पाठवावयाची काय मजा? यास्तव

२२. सामादिक=मसलतींत असणारे?
२३. 'बाबा' कोण? रामचंद्रबाबा?
२४. हरगीज=सर्वथा?
२५ मदार—विश्वास, भरंवसा.

पुढें न जाणें. कळेल तसें करून सल्ला करून निघोन येणें. अगर मगरूरी करून पुढें गेलियास फौज गारद करून देतील. स्पष्ट समजोन माघारे फिरणें. याप्रमाणें पत्रें जयनगरचीं येतांच अनिरुद्धसिंग यांणीं तह करावा याबद्दल वकील येलेंची पाठविले. लढाईचीही जरब बसली. चौगिर्दा चौकी दिली. यामुळें दाणा वैरण बंद होऊन महर्गता पडली. आम्हीं सांगोन पाठविलें कीं, तहच करणें तरि तुह्मीं खासा व संस्थानिक आहेत त्यासुद्धां बोलीस येणें. फौज लावून देणें. नागोरास क ल्यै[५१] व र ज्याप्रमाणें राजश्री पाटीलबावा आज्ञा करतील त्याप्रमाणें वर्तणूक होईल. म्हणून. त्याजवरून त्यांनीं मान्य करून शकावत, राजावत व कुपावत तंनरूके[५३] इत्यादि संस्थानिकसुद्धां तीनशें राऊत घेऊन सेवकाचे लष्करांत उतरले. वरकड फौज जयनगरास गेली. रामबाण व कृष्णबाण दोन तोफा नामी पंचरसी होत्या त्या घेतल्या. आणि कूच करून नागोरास आलों. उभयतां शिंदे दोन कोस येऊन लोकांच्या भेटी घेतल्या व सेवकाची भेट जाहली. उभयतां राजे समागमें होते. त्यांच्या भेटी बहुमानें संप्रदायाप्रमाणें जाहल्या. लष्कराचा मुक्काम जाहला. अनिरुद्धसिंग जयनगरवाले वगैरे संस्थानिकांच्या भेटी जाहल्या. दुसरे दिवशीं तयार होऊन नागोरावर लढाई केली. राठोडाची शिपायगिरीची स्तुत काय लिहावी ? बिजेसिंग तयार होऊन आला. लढाई सुरू झाली. आम्हांकडील उभयतां राजे होते त्यांची यांची रजपुती लढाई लागली. हाडे यांची शिपायगिरी राठोडास ठावूक आहे. घोडे सोडून[५४] खेतें[५५] केलें. खण खण ता त तर्वारेची लढाई जाहली. दुतर्फा ही वळी रजपूत एकमेकांस हटेनात. म्हणून बहुत [ माणसें ] दुतर्फा जायां जाहालीं. वोळेखीची[५६] लढाई, यामुळें मागें पाय टाकीनात. तेव्हां सेवकानें दुसरीकडे बाण व जेजालांचा मार राठोडावरि केला व लोकांनींही[५७] घोडे बेशक घातले. शिंदे उभयतां सरदार उभे राहून तमाशा पाहिला. दोन प्रहर लढाई जाहली. तेव्हां आगीचे मारानें बिजेसिंग राठोड माघारे सरोन किल्याचे आश्रयास गेले. आपली फौज व हाडे केरोलीकर हेही मुक्कामास आले. राजश्री दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे यांणीं उभयतां राजांस आलिंगन देऊन मर्दुमकीची स्तुती केली. सेवेकास[५८] सांगितलें कीं, तुह्मीं आलां त्यासारखें कामकाज चांगलें जाहलें.

---

५१. एला ( वेलदोडे ) सामदर्शक होय.

५२. 'कळल्यावर' किंवा 'गेल्यावर' ?

५३. ह्यांतील कांहीं मारवाडांतील असावे.

५४. घोडे सोडून घोडे टाकून, पायउतारा होऊन.

५५. खेत—रण.

५६. ओळखीची=परस्पर माहितीची, अतएव ईर्ष्येची.

५७. लोकांनीं—अंताजीपंताच्या फौजेनें.

५८. सेवकास=अंताजीपंतास.

त्यावरि बिजेसिंग राठोड यांणीं येलची सेवकाकडे पाठवून तहाची बोली लाविली. तुह्मीं आलां तुमचेच मारफतीनें जें बोलणें असेल तें बोलोन तह करितों. याउपरि लढाई राहिली म्हणून वकिलानें येऊन सांगितलें. त्यास सदरहू मजकूर राजश्री पाटील बाबांस विदित केला. परंतु त्यांचे मर्जीस तह करावयाचें येईना. आज दोन तीन सालें या मसलतीस लागोन खर्चीखालीं आलों. शेवटीं वडीलेंही[५९] सरकार कार्यांवरं[६०] आले. आणि राजे रामसिंग राठोड यांचाही बंदोबस्त जाहला नाहीं. यास्तव सल्लाही आपण करीत नाहीं. आपणखी वर्ष सहा महिने राहून बिजेसिंगाचें पारिपत्य करून रामसिंगास राज्यासनीं बसवून मग देशास जाऊं. तोंपर्यंत जात नाहीं. याप्रमाणें वकिलास जाबसाल सांगितला. त्यावरून वकिलांनीं जाऊन बिजेसिंग यांस सांगितलें. त्यावरून त्याजला जरब भारी बसली. तेव्हां सेवकाकडे पेगाम[६१] बहुत बजिदें[६२] होऊन लाविला कीं, तुह्मीं श्रीमंतांकडून आलां आहां, व तुमची मर्दुमीही पाहिली. याउपरि कळेल तसे चार गोष्टी पाटील बाबांस सांगून विवेक करवावा. ज्याप्रमाणें मर्जी असेल त्याप्रमाणें मी राजी आहें. रामसिंग यास राज्यीं बसवून मला सांगाल त्याअन्वयें राहीन. खर्च आजि तागायत पडला आहे. जीवनमाफक[६३] सांगाल त्याप्रमाणें देईन. तुमच्या वचनाशिवाय एकंदरें[६४] नाहीं. असें बोलणें जाहलें. तेव्हां राजश्री पाटील बाबांस त्या अन्वयें निवेदन केलें. आणि सरकारचीं आज्ञापत्रें सेवकास आलीं होतीं तींच बजिन्नस[६५] दाखविलीं. आणि सांगितलें जे, याउपरि फार ओढूं नये खर्च जाहला त्याची विल्हे व रामसिंगास स्थानावर बसावयाचें व मुलूख वांटून घेऊन यश घेऊन श्रीमंतांचे दर्शनास जावें हें बरें आहे. तेव्हां मान्य जाहलें. राज्याच्या तीन वांटण्या केल्या. एक सरकारची व एक बिजेसिंग व एक रामसिंग. याप्रमाणें तह झाला. पांच क्रोड रुपये सरकारची नजर दोन करोड दरबार खर्च व कांहीं सेवकाचे मिळोन याप्रमाणें ऐवजाची निशा[६६] घेतली. नागोर मुख्य स्थळ तेथें रामसिंग याणीं राहून राज्य करावें. झालोर किल्ला तेथें बिजेसिंगानें असावें. जोतपूर किल्ला

---

५९. वडील=ज्येष्ठबंधु.

६०. सरकार कार्यांवर आले=सरकारासाठीं त्यांचा प्राण खर्च झाला.

६१. पेगाम=प्रयत्न (बोलण्याचा, सामाचा.)

६२. बजिंदे=आजिज, लीन, दीन.

६३. जीवनमाफक=सामर्थ्यानुरूप.

६४. एकंदर=बिलकुल.

६५. बजिन्नस=तींच प्रत्यक्ष.

६६. निशा=खात्री सावकाराची हमी. तहांतील संख्या फारच मोठी आहे. मग 'क्रोड' शब्दाचा अर्थ निराळा असल्यास न कळे.

सरकारांत ठेवावीं. याप्रमाणें करारांत आणून बिजेसिंग याची भेटी करविली. परस्परें हत्ती, घोडे, वस्त्रे बहुमान जाला. रामसिंग व बिजेसिंग यांची भेट होऊन किलाफ तोडिला. राजे रामसिंग हाडे बुंदी कोटकर व राजे गोपाळसिंग केरोलीकर याचा करार केला होता तो पाटील बावांस सांगून, एक सालची खंडणी माफ करून हत्ती, घोडे, जवाहीर, वस्त्रें, मेजवानी इत्यादिक आदर त्यांच्या योग्यतेप्रमाणें करून, उभयतांस निरोप दिला. अनिरुद्धसिंग व आणिक संस्थानिक जयनगरचे होते त्यांच्या भेटी करविल्या. त्यांनीं फौज पाठवून कुमक केली त्याबद्दल गुन्हेगारी दोन करोड रुपये सावकारी निशा. घेऊन त्यांस जयनगरास पाठविलें. याउपरि मुहूर्त पाहून येथून कूच करून रूपनगरवाले यांजकडील खंडणीचा फडशा करून शिंदे यांस फौजेसुद्धां घेऊन हुजूर येतों.

ज्याप्रमाणें सरकारची आज्ञा होती त्याप्रमाणें चाकरी बजावून दिली. या मसलतीस लाखों रुपये देणें सावकारी आहेत. त्याचा परिहार होऊन पुढें अधिक ऊर्जित करणार स्वामी समर्थ आहेत. साहेब नौबत[69] माहीमरातिब[70] झालरदार पालखी देऊन सरदारी वाढवून सफराजी केली. त्याअन्वयें सेवा करून दाखविली. म न वि र्शी लोकांनी[71] चाकरी केली आहे तो अर्थ राजश्री पाटील बावा सेवेसीं विदित करतां ध्यानास येईल. तपशील बहुत लिहिला आहे. येविशीं चिटणीसास आज्ञा होऊन श्रवण करावयास स्वामी समर्थ आहेत सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

ही बखर भिकाजी नारायण अभ्यंकर वस्ती सुशेरी तालुके खेड तर्फ सुवर्णदुर्ग क्षेत्र परशुराम सुत्र हिरण्यकेशी गोत्र वासिष्ठ याची असे. शके १७२१ सिद्धार्थीनाम संवत्सरे पौष वद्य १३ त्रयोदशी गुरुवार ते दिवशीं बखर समाप्त. हस्ताक्षर गोपाळ गोविंद जोशी मुक्काम वेळणेश्वर हल्लीं वस्ती मौजे सुशेरी सन १२०० माहे सबान सु॥ मयातैन अल्लफ. श्रीभार्गवराम प्रसन्न.

---

६७. याप्रमाणें तह कदाचित् ठरला असेल पण अमलांत आला किंवा नाहीं ह्याविषयीं संशय आहे. अजमीर प्रांत मात्र जो सर्व रजपुतस्थानचें नाक—तो मराठ्यांस मिळाला.

६८. किलाफ—किस्सा, तंटा.

६९. साहेब नौबत=मोठा नगारा.

७०. माहीमरातब—अलंकार विशेष. पण हें अंताजीपंतास प्राप्त कसें झालें ?

७१. लोकांनीं—आमच्या फौजेनें.

[ ४५२ ] श्री.

श्रियासह चिरंजीव राजश्री माधवराव[1] प्रधान यांसि प्रति गोपिकाबाई[2] मुक्काम नासिक आशीर्वाद उपरि येथील कुशलतागायत छ ४ माहे सफर जाणून स्वकीय कुशल वर्तमान यथास्थित असे विशेष. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें.

" मी लहान, वडिलीं सर्व-त्याग[3] करून श्रीक्षेत्रीं वास केला आहे, त्यास सर्व माहीत वडिलांस, यास्तव कोणे रीतीनें चालावें हें सर्व ल्याहावयास आज्ञा व्हावी, " म्हणोन लिहिलें. त्यास सूर्य-ग्रहण संधि अन्वयें कृष्ण पक्ष होऊन लोप जाहला होता, तो हल्लीं वडिलांचे पुण्योदयें करून दुष्टांचा संहार व सुष्टांचे पालग्रहणार्थ तुम्ही या कुळांत जन्म घेऊन पुरंदर येथें उदयास आलां, त्यापेक्षां इकडून लिहावयाचें कारण दिसत नाहीं; परंतु मानवी देह आणि तुम्हीं लिहिलें, त्यापेक्षां तूर्त चालावयाचें जें सुचलें तें लिहिलें आहे. तपसील कलम बंदीः—

१. प्रातःकालचे घटका रात्री उठोन दिशेस जाऊन पादप्रक्षालन, मुखप्रक्षालन करून दिवाणखान्यांतील[5] श्रीमृत्तिका गणपतीचें दर्शन घेऊन प्रातःस्मरणाचे श्लोक म्हणावे. नंतर सूर्योदयाबरोबर वैद्यानीं येऊन हात पहावा. प्रकृति अन्वयें औषध घ्यावें. नंतर लिहावयास बसावें. कित्यांत हात फिरवून मग ज्या कागदावर निशाणें[6] व्हावयाचीं असतील ते लिखितान्वयेंच[7] वाचावे. ते समयीं जवळ गुरूजी व आणखी एक दोघे संभावित योग्य असतील ते असावे. जास्त असों नये. येणेंप्रमाणें घटिका तीन. येकूण घटिका. कलम १.

१. तालिमखान्यांत जाऊन दंड काढावे. दिवसेंदिवस शक्ति अन्वयें चढते दंड असावे. बरोबर समवयी मुलें पांच चार संभावितांचीं असावीं. व जेठी[9] एक दोघे व नेहमीं विश्वासुक गृहस्थ बरोबर असावयाचे ते, असावे. खिसमतगार कार्याकारण[10] असावे. जेठी यांनीं कुस्तीचे डाव शिकवावे. नंतर समवयी मुलांसुद्धां

१. माधवराव नारायण प्रधान.

२. गोपिकाबाई—नारायण बल्लाळ यांची आई—सवाई माधवरावांची आजी.

३. थोरल्या माधवरावानें राज्यप्रकरणीं कांहीं बाईचें ऐकिलें नाहीं, त्यावरून बाई गंगापुरास जाऊन राहिली ती पुनः पुण्यास आली नाहीं.

४. " सूर्यग्रहण "—वगैरे वाक्य माधवराव बल्लाळ वारल्यामुळें व नारायणरावास मारल्यामुळें जो पेशव्यांचे घराण्यास कमीपणा आला होता त्यास अनुलक्षून आहे.

५. हा गणपतिदिवाणखाना असावा, ज्याच्या खिडकींतून पुढें सवाई माधवरावानें खालीं उडी घातली.

६. निशाणें=शेवटील अक्षरें. " आज्ञा प्रमाण. " हीं अक्षरें सही ऐवजीं घालीत.

७ लिखितें समजूनच. ' एक पंथ दो काज ' ह्या न्यायानें.

८. आलीकडील श्रीमंत लोकांनीं ही गोष्ट ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

९. जेठी=मल्ल.

१०. कार्या कारण=जरूर तितकेच, फार थोडे.

प्रकृतीस जो खुराक मानेल तो नेमेंकरून घेत जावा. येणेंप्रमाणें घटिका दीड. येकूण घटी साडेचार. कलम २.

१ स्नान करावयाचे समयीं पंचांग जोशी यांणीं वाचून संकल्प सांगावा. नंतर गंगाष्टक म्हणावें. संध्या थोडकी परंतु न बोलतां करावी. तर्पण करावें. उपाध्ये यांणीं पूजा करावी. ते समयीं पुराण देवघरांत व बाहेर गायन होत असावें आपण तुलसी फुलें मात्र वहावीं. नंतर नित्यदानें देऊन क्षणभर बसावें. ते समयीं शास्त्री व वैदिक महान् शिष्ट आल्यास नमस्कार करून योग्यतेनुरूप उत्थापन देऊन कांहीं भाषण करावें. नंतर उपहार करावयास जावें. येणेंप्रमाणें घटी साडेतीन येकूण घटी आठ. कलम ३.

१. कचेरीस यावें ते समयीं सर्वांस दर्शन देऊन योग्यतेनुरूप नेत्रलाभ व भाषण होत असावें. कचेरींत लघु[११] शब्द बोलूं नये व गैर नि ही [?] बोलूं नये. मनुष्यपरीक्षा असावी. गैरवाखीं[१२] एखाद्यानें समजाविलेस पक्केपणीं विचार करून अपराध ठरल्यास दुसऱ्याकडून त्यास निषिद्ध[१३] करवावें. आपण नेत्र-कटाक्ष करून पहावें. अपराधानुरूप पारपत्य करावें. परंतु संभावित गृहस्थ बहुत दिवस पदरींचा प्रामाणिक अशानें रदबदली केली असतां क्षमा करावी. दुसऱ्याचें क्षुद्र काढूं नये. येणें करून त्याचा अपमान होतो, आणि तो त्याचे मनांत दंश राहतो. साधल्यानुरूप नाश करील. आणि आपल्यास लघुपणा येईल. संन्निधानीं लोभांत लघु मनुष्य राखल्यास जें केलें त्यास ते रुकार देतात, परंतु जन लोक वाईट म्हणतात, थोरपणास हानि होती. येणेंप्रमाणें घटी तीन. एकूण घटी अकरा. कलम ४.

१. भोजनाचे पूर्वीं सोंवळे जाहलेनंतर थोरल्या देवघरांत जाऊन, फुलें घालून, नमस्कार करून, ब्राह्मणांस उदक सोडून, भोजनास बसावें. ते समयीं भाषण करणें तें राजसुयज्ञांतील ब्राह्मणभोजन प्रकरणीं वगैरे योग्य सर्वांस दिसेल तें बोलावें. पाक करणार व शिष्य मंडळी सुशिक्षित विश्वासुक असतील ते बाळगावे. घटी २. येणेंप्रमाणें घटी १३. कलम ५.

१. भोजनोत्तर आचमन करून शतपदी करून तांबूल घ्यावा. नंतर दोन घटिका राजविलास खेळ खेळावे. एकादे दिवशीं निद्रा आल्यास घटी अर्ध घटिका निजावें. येणेंप्रमाणें घटी २ येकूण घटी पंधरा. कलम ६.

१. शास्त्री यांजवळ विराटपर्वापासून भारतांतील चितनिकीं[१४] करीत असावी. व वृद्ध मनुष्यें पदरचीं बहुत दिवशीं व अन्यत्र शाहाणे असतील त्यांशीं दिल्लीप्रकरणीं व महाराजप्रकरणीं गोष्टी कशा जाहल्या त्या ऐकण्यांत असाव्या. आपले

---

११ लघु=हलकट.
१२. गैरवाखा=गैरवाका–खोटा मजकूर.
१३. निषिद्ध करवावे=दोष देववावा.
१४. चितनिका=चिंतन, विचार.

वडिलांच्या गोष्टी कारभारी यांसि एकांत स्थळीं विचारीत असावें. व तसबिरा व नकाशे[15] अनेक पाहत असावे. ते समयीं शाहाणे बुद्धिमान् असतील ते जवळ असावे. येणेंप्रमाणें घटिका चार. एकूण घटिका. १९. कलम ७.

१. खर्डे लिहावयास बसावें. ते समयीं एक दोन मुलें संभावित गृहस्थांचीं बुद्धिमान् पहावयास असावीं. करदन बंस्तन[16] गुणाकार भागाकार करावयाचा सराव बहुत असावा. गुरुजी यांणीं विद्याभ्यासाकरितां बोलणें प्राप्त आहे. परंतु लिहावयाचे जागींच बोलावें. तेथें विशेष कोणी असों नये. घटी चार. एकूण घटिका तेवीस. कलम ८.

१. लिहिणें जाहलेनंतर कांहीं उपहार थोडासा मर्जी असल्यास मुलांसमवेत घेऊन करावा. नंतर तांबूल घ्यावा. घटी एक. एकूण घटिका चोवीस. कलम ९.

१. घोडीं फेरावयास चार रोजांनीं जात जावें. ते समयीं बरोबर पटवर्धन मंडळी व अन्यत्र सरदार असावे. त्यांशीं भाषण करणें तें संतोषवृत्तीनें करावें. परंतु अत्यंत लोभही नसावा व विरुद्धही न दाखवावें. कांहीं अंतर जाहल्यास क्षमा होणार नाहीं असें भय असावें. योग्यता बघून त्यांशीं भाषण संतोषेंकरून करावें. आठा दिवशीं बाग पहावयास गेल्यास जिन्नस तेथें फुलें व फळें जीं आणून पुढें ठेवितील तीं योग्यायोग्य बघून त्यांस देववावीं व आपण द्यावयाचीं असतील त्यांस आपण देऊन मग यावें. ज्या दिवशीं स्वारी जावयाची नाहीं त्या दिवशीं कागदपत्र दवलतप्रकरणीं असतील ते कारभारी यांणीं समजावीत असावें. ते समयीं कोणी असों नये. व गंगाभागीरथी ताईसाठी[17] यांची भेटी चार रोजीं एक वेळ घेत असावी. त्यांसच वाड्यांत यावयाचा बेत व्हावा. नंतर त्यांस बहुत संतोषेंकरून बोलावें व मूलपणानें बोलण्याचा डौल दाखवावा. वाड्यांतच आज राहावें असा आग्रह करून ठेवून घेत जावी. दिवाण यांणीं राजकारणाचें वर्तमान व पुढील योजना करावयाचा विचार करून विनंती करीत असावी. त्या समयीं अन्यत्र कोणी असों नये, व त्यांतील अभिप्राय दुसऱ्यापाशीं निघों नये. म्हणजे मसलत असाध्य होत नाहीं. बातमी हरतऱ्हेची राखावी. म्हणजे मसलतीस बल बहुत आहे. पदरच्या मनुष्यांचें चालवावयाचें त्यास जिकीर करूं नये. एकूण घटी चार. एकूण घटिका अठ्ठावीस. कलम १०.

१. तिरंदाजी करावयास जावें तेथें बरोबर सरदार व पागे व मानकरी बरावर

---

१५. या कलमावरून इतिहास भूगोलाची तेव्हां राजपुरुषांस अवश्यकता आहे असें मानीत असत.

१६. करदन बस्तन-उतरती चढती मांजणी.

१७. ताईसाठी ही माधवरावाची आजी म्हणजे आईची आई.

असल्यास तीर कोण कसे मारतात, हें ध्यानांत असावें. व हरएक खेळ पहावयाचे ते सर्वत्र समवेत पहावे, येणें प्रमाणें घटिका दोन. एकूण घटीका ३०. कलम ११.

१. दीपदर्शन जाहल्यानंतर संध्येस वस्त्रांतर करून बसावें. संध्या जाहले नंतर स्तोत्रपाठ म्हणावा. नंतर पुरुषसूक्त अथवा पवमानांतील अध्याय म्हणावे. ते समयीं आश्रितांनीं जवळ असावें. नंतर भोजनास जावें. भोजन होऊन उठे- पर्यंत घटी चार. कलम १२.

१ भोजनोत्तर तांबूल खावयास दिवाणखान्यांत क्षणभर बसून तांबूल घ्यावे. नंतर कार्याकारण मंडळी जवळ असावी. ते समयीं बातमीदार यांणीं वर्तमान गुप्त सांगत असावें. व हरएक बातमीचीं पत्रें आलेलीं पहावयाजोगीं असतील तीं पहावीं. बाकीचीं पत्रें विश्वासूक मनुष्य कोण असेल त्याजकडे काम योजावें. त्यांणीं सांगावें व त्यावर ही बातमी प्रमाण अथवा अप्रमाण सांगतात याची चौकशी असावी. नंतर निद्रेस जावें. येणेंप्रमाणें घटी तीन. एकूण घटिका सात. कलम १३.

एकूण कलमें तेरा लिहिलीं आहेत तीं ध्यानीं आणोन चालल्यास उपयोगीं पड- तील. बहुत काय लिहिणे हे आशीर्वाद.

[ ४५३ ] श्री

स्वस्ति श्री मंदमंदाकिनी-संदोह संपूरिता-शेष-जटामंडल- परिलसच्छिव-चरण द्वंद्व–निर्द्वंद्व-भजनासादित–समस्त–पुमर्थ–सार्थसार्थकीकृत– निज–वंशावतारेषु, पूर्व- पूर्व-धन्य-राजन्य–मूर्धन्याचरित–धर्माचरण -प्रचारण–चातुरी–धुरीणेषु, सौजन्य- सिंधुषु, श्री महाराजाधिराज महाराणा श्रीमद्भीमसिंहनृपवर्येषु, श्रीमन्माधवराय नारायण-पंडित-प्रधान–विहिताशीराशयः समुल्लसंतु. पौषकृष्ण[२] वधि श्री मत्त्रिलोचन कृपया परिवाराः क्षमिणो वयं भवदीयं शर्मेधमानमाशास्महे. विशेषस्तु मौजे बाडी प- रगणे मेवाडायंग्रामः श्रीराणाजीभिरस्मत्पूर्वजैः ग[३]नामक-विष्णु-महादेव-सदाशिव- महादेवाख्यावुभौ भ्रातरौ एकत्र स्थितिमंतौ, तयोर्ज्येष्ठो विष्णु महादेव इति तन्नाम पुरस्कारेण दत्तः. तदनंतर विष्णु महादेवो सदाशिव महादेवस्य पुत्रो रघुनाथरावश्च उभौ विभक्तौ जातौ. तदानीमेतद्ग्रामस्योपभोग उभाभ्यां समेन कर्तव्य इतिनिश्चये

१. हें पत्र व पुढील बरींच पत्रें रा० रा० त्रिंबकराव जीवनराव चिटणीस यांज- कडून अस्सल मिळालीं. कांहीं सोनेरी रुपेरी वेलबुट्टीच्या कागदावर लिहिलेलीं आहेत. पेशव्यांच्या चिटणीसांचे त्रिंबकरा- व हे वंशज होत. त्यांनीं होऊन हे कागद आह्मांकडे प्रसिद्ध होण्याकरितां दिले ह्याब- द्दल आम्हीं त्यांची स्तुती करून आभार मानितों.

२. यावरून हें पत्र उदेपूरचे राणे भीम- सिंग यांस सवाई माधवराव यांणीं लिहिलें आहे असें होतें. हा बहुधा पाठविण्याच्या पत्राचा मसुदा असावा

३. ह्या शब्दा पुढें लिपि घालण्याकरि- तां जागा टाकिली आहे.

जातेपि एकविंशतिसंवत्सरपर्यंतं गणपतराय-विष्णुना एकेनैव संपूर्णग्रामस्योपभोगः कृतः. अस्माकमर्धांशो न दत्तेति सदाशिव रघुनाथैर्निवेदितं. अतः अधुना यावत्संवत्सर पर्यंतं संपूर्ण ग्रामस्योपभोगः यथा गणपतराय-विष्णुना कृतस्तथा वर्तमान एकविंशति संवत्सरपर्यंतं सदाशिव रघुनाथः संपूर्ण ग्रामस्यानुभवं करिष्यति. अग्रे उभावपि समान विभागाभ्यामनुभविष्यतः. गणपतराय विष्णवनुयाय्यवरोधं करिष्यतिचेच्छ्रीमद्भिः शिक्षणीयः-

**[ ४५४ ]** श्री.

पौ छ १२ जिलकाद सन तिसा तिसैन चैत्रमास.

श्रीमंत महाराज राजश्री बाजीराव पंडित प्रधान साहेब गोसावी-यांसि.

छ सकल गुणालंकरणअखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नेहांकित मुतुरामलिंग विजय रघुनाथ सेतुपति कृतानेक दंडवत विनंती येथील कुशल तागाईत छ २९ जमादिलोवर पावेतों यथास्थित असे विशेष. श्रीरामेश्वर क्षेत्र येथील राज्य दीडशें वर्षें आमचे वडिलांवडिलीं करीत आले. पुढें इंग्रजांचा जोर पडला, तेव्हां खंडणी दरसाल पांचलक्षच कर द्यावयाचा करार केला. देत होतों. पुढें जास्ती मागावयास लागले. सात लक्ष दिल्हे. तसे दहा पांच वर्षें लोटलीं. त्या उपरि नऊ लक्ष घेतले. मग राज्यलोभ प्राप्त होऊन, क्षेत्रीं रामनाथ दूर किल्ला आहे तेथें फितूर करून, किल्ला घेऊन, आम्हांस धरून, त्रिचनापल्लीचे किल्ल्यात नेऊन कैदेंत ठेविलें. मुलुख सर्व जप्त केला. पांच वर्षें झालीं. हल्लीं आमचे वकील राजश्री श्रीनिवास नारायण यांस आपणांकडे पाठविलें जे, श्रीमंतांस विनंती करून, इंग्रजांशीं बोलून, आमची मोकळीक करावी म्हणून पाठविलें. ते बातमी त्यांला कळून आम्हांस जास्ती बंदोबस्त केला. पत्रें देखील लिहितां नयेसें झालें. हें पत्र बहुत संकटानें लिहिलें आहे. वकील मजकुरासही पाठविलें आहे. तरि धर्मसंस्थान देवब्राह्मणभूयिष्ट आहे. उत्तरेस काशी, दक्षिणेस रामेश्वर, हे दोन्ही पुण्यक्षेत्रें नीचांनीं आक्रमिलीं आहेत. आपण धर्मस्थापना करणार, देवब्राह्मणप्रतिपालक, दुष्टनिग्रह, शिष्टप्रतिपालक हिमःसेतुपर्यंत आपला पराक्रमप्रताप चालतो. त्यास्तव विनंतीपत्र लिहिलें आहे. वकिलासही सन्निधानास पाठविलें आहे. इंग्रजांशीं पक्केरणें बोलून पूर्ववत् प्रकार मुलुखसुद्धां आमची स्थापना करून, राज्य आमचे स्वाधीन करून, इंग्रजांस खंडणी द्यावयाचा करार करून दिल्हा त्याप्रमाणें त्यांची खंडणी सालोसाल देत जाऊं. आपणास नजर द्यावयाचे प्रसंगास वकील मजकूर विनंती करतील, त्याप्रमाणें बोलून, करार होऊन, जें ठरेल त्यास सावकारी हमी देऊन खातरजमा करूं. राज्यीं आम्हांस स्थापना करून यथाप्रकार राज्य आमचे स्वाधीन

झालेवरि ऐवजाचा भरणा करूं. यास अंतर सहसा होणार नाहीं. नक्रानें गजास धरिलें तेव्हां भगवंतानें धांवा करून रक्षिल्याप्रमाणें आम्हांस जीवापासून सोडवून कीर्ति घेतली पाहिजे. इतःपर हरएक प्रसंगास आमचे कारभारी मोकळे आहेत ते पत्रें लिहून पाठवितील तें मान्य करून, कार्यभाग करून देऊन चालविलें पाहिजे. सुज्ञाप्रति विशेष काय लिहिणें कृपा निरंतर असू द्यावी हे विनंती.[६]

सही.

[ ४५५ ] श्री

पै॥ छ १७ रबिलोवल सन तिसा तिसैन श्रावण.

अपत्य अलीबहादूर चरणावरि मस्तक ठेवून विज्ञापना तागाईत छ १९ जिल्हेज मुक्काम न दी लो ज नजीक काळींजर येथें साहेबांचे प्रतापें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असें विशेष. पागा हिम्मत राजश्री उमाजी वाघ याचे पागेचे बेगमीस धोडपचे जहागिरीचे गांव आहेत तेथील अंमल भोंसले नागपूरकर व नबाब निजामअली-खां बहादूर यांजकडील मामलेदार सुरळीतपणें देत नाहींत. त्यास मशारनिल्हे पागे सुद्धां आम्हांजवळ सरकार चाकरीवर आहेत, याकरितां सेवेशीं विनंती लिहि-ली आहे. तरि उभयतां सरकारांतून ताकीद होऊन मामलेदार सुरळीतपणें वाज-बी अंमल पागेचे गांवचा देत ते आज्ञा जाहली पाहिजे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ ४५६ ] श्री ( तालीक )

तहनामा चिरंजीव राजश्री संभाजी राजे यांसिप्रति शाहूराजे यांणी लिहून दिल्हे सु॥ इहिदे सल्लासीन मया व अल्लफ. [ शिक्का ] छ १६ सवाल शके १६५२ विरोधिकृतनाम संवत्सरे चैत्र वद्य द्वितीया. बितपशील:—

| | |
|---|---|
| इ॥ वारुण महाल तहद संगम दक्षणतीर कुल् दुतर्फा मुलुख दरोबस्त देखील[८] ठाणीं व किल्ले तुम्हांस दिल्हे असत. कलम १. | वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षणतीर तहद निवृतिसंगम तुंगभद्रा पावेतों दरोबस्त देखील गड ठाणीं तु-म्हांकडे दिल्हीं असत. कलम १. |

---

४. ह्या पत्रावरून इंग्रजांचें वर्तन लहान सहान राजांशीं त्या वेळीं कसें असेल त्याचा अदमास करितां येईल. तसेंच ह्या निकृष्ट काळींही पेशव्यांची सत्ता किती मोठी मानिली जात असे त्याचाही बोध होईल.

५. छत्रसाल राजानें पहिल्या बाजीचा ह्याप्रमाणेंच धांवा केला होता. पेशव्यांची बखर पृष्ठ २७ पहा.

६. पुढें खालीं कानडी अक्षरांनीं सही घातलेली आहे.

७. अलीबहादर हिमत बहादराचा मुलगा. हें पत्र दुसरे बाजीरावास लिहिलेलें दिसतें.

८. देखील—सुद्धां, सह.

तुंगभद्रापासून तहद रामेश्वर देखील संस्थानें निम्मे आम्हांकडे, निम्मे तुम्हांकडे करार करून दिल्हे असत. कलम १.

किल्ले कोपल तुम्हांकडे दिल्हा त्याचे मोबदला तुम्ही रत्नागिर आम्हांकडे दिल्हा. कलम १.

वडगांव ठाणें पाडून टाकूं. कलम १.

तुम्हांसी जे वैर करतील त्यांचे पारिपत्य आम्हीं करावें. आम्हाशीं जे वैर करतील त्यांचें पारपत्य तुम्हीं करावें. तुम्हीं आम्हीं एक विचारें असावें. राज्याभिवृद्धि करावी. कलम १.

कोंकणप्रांत साळशी पलीकडे तहद पंचमहाल आकोल पावेतों दरोबस्त तुम्हांकडेस दिल्हे असे. कलम १.

इकडील चाकर तुम्हीं ठेवूं नये. व तुम्हांकडील चाकर आम्हीं ठेवूं नये. कलम १.

मिरज प्रांत विजापूर प्रांतींचीं ठाणीं देखील अथणी तासगांव वगैरे तुम्हीं आमचे स्वाधीन करावीं. कलम १.

एकूण नऊ कलमें करार करून तहनामा लिहून दिल्हा असे. सदर्हू प्रमाणें आम्ही चालवूं. यांसि अंतराई होणार नाहीं. मोर्तब चिटणिशीकडील यादी.

[ ४५७ ]　　श्री

रा छ १६ रमजान सन इहिदे समानीन.

आं मेहरबां आर्काट पावेतों पोंचले असतां इंग्रज *तांहाल नमूद होत नाहींत. त्यास कोणीकडे जमाव करविला असेल अगर पाळेगार वगैरे कोणीकडे राजकारण लाविलें आहे, व महमद अल्ली व ते एकत्र आहेत यै आलाहिदा आहेत आणि काय मनसबा कारितात हें कांहीं समजत नाहीं. टोपीकरांची जात मकरी व दगाबाज शांयेद भुलावा देऊन कांहीं एक शक्ल नमूद करावी, या तदबिरेंत असतील. याजकरितां येविशींची बातनी पुर्तेपणीं राखून येहातियांत व हुशारी होत असावी. आज राहा-येगांनगत दिल-निशीन जाले तें कलमीं केलें असे. बफजल इलाही आं मेहरबां दूरंदेश व कुलाहपोश याचे फंदफरेबांस खूब वाकीफ,

---

* ता॰हाल=हा कालपर्यंत.
९. या=अथवा.
१०. मकरी=विश्वासघातक.
११. शायद=कदाचित्.
१२. भुलावा=फसवणूक.
१३. तदबीर—युक्ति, प्रयत्न.
१४. बातनी=बातमी.
१५. एहातियाद=सावधगिरी, खबरदारी.
१६. राहे येगानागियत्—मैत्रि-मार्ग [ ? ]
१७. दिलनिशीन—चित्त-निहित, पसंत केलेला.
१८. बफजल इलाही=ईश्वरकृपेनें.
१९. दूरंदेश=दूरवर पाहणारे.
२०. कुलाहपोश—टोपीवाले.
२१. फन्फरेब=लुच्चेगिरी.
२२. वाकीफ=माहितगार, जाणणारे.

तेव्हां या गोष्टीची खबरदारी होतच असेल. दोस्तीदारासही पैहाम[२३] इतल्ला[२४] करीत असावी. म्हणोन हैदर अलीखां बहादूर यांस नानांचे नांवें पत्रें.

[ ४५८ ] दुसरा मसुदा[२५] सा छ २४ साबान इहिदे समानीन.

आं साहेबीं छ २९ रजबचें खत मसरत नमतें[२६] पाठविलें तें नेक वख्तीं पोंहचलें. आम्ही भारी जमियतनशीं घांट उतरून चंगम व कळसपाक, पोळूर व त्रिनामल ति म रायगड व सुलभगड वगैरे मकाणांत ठाणीं घातलीं. त्यांजकडील बा र व तुरुक स्वार घोडीं पाडाव आणिलीं. व तमाम तालुकियांत दौड पाठविली. माच्छिलीबंदराकडून गुंठूरच्या रस्त्यानें इंग्रजी कुमक येत असतां दहा हजार फौज पाठवून त्या जमियेतेसच घेराघेरी करविली आहे. इंग्रज आपली फौज जमा करितात. मोकाबिलेयांस[२७] येतील तरि खुदाचे फैजलेनें[२८] तंबी होईल ते जहुरांतें[२९] येईल. तरफैन जुदाई[३०] नाहीं. कैफियत इकडील तिकडे व तिकडील इकडे मालुम होत असावी म्हणोन कलमी केलें. चुंनाचे[३१] आं मेहेरबांहीं इंग्रजांचीं मकाणें घेतलीं व तमाम तालुक्यांत दौड ताखत[३२] व ताराज करण्यास गेली आहे व कुमकेचे जमियेतस घेराघेरी करविली आहे हें ऐकून न्याहायेत[३३] खुबी जाली. आं साहेब इरादा करून मातबर सरंजामानशीं त्या जिल्ह्यांत गेले, तेव्हां टोपीकरांस खूब नसियेत पोहोंचवितील येविशीं खातरजमा आहे. सरकारांत सरंजाम तयारी आहेच. बाजे[३४] फौजाही जलद मुखालिफाचे[३५] मोकाबिल्यास नमूद होतील. बादशाहाकडून इंग्रजांस तंबी करण्याची मसलत ठरून इशारा आला. त्यास मसलत कबूल करून दिल्लीस जबाब रवाना जाले. याचा ता॥[३६] पेशजी आं मेहरबांस कलमी करण्यांत आला. सरकारची व आपली जुदाई नाहीं. सलाह मसलत एक. याजकरितां पैहाम[३७] आपली खैरियेत[३८] व इंग्रजांचे[३९] तंबीची कैफियेत हमेश कलमी करीत असावी. म्हणोन नवाब हैदरअलीखां बहादूर यांस नानाचे नांवें हिंदवी पत्र

२३. पैहाम=कधीं कधीं, वरचेवर.
२४. इतल्ला=खबर.
२५. यावरून हा चिटणिशीकडील मसुदा आहे असें होतें.
२६. मसरत् नमत्=खुषीचें, आनंदाचें
२७. मोकाबिला-सामना, लढाई.
२८. फजल-कृपा, मेहेरबानी.
२९. जहुरांत येणें=जाहीर होणें.
३०. तरफैन जुदाई=दोन बाजूंचा ( तुमचा आमचा ) फरक, दुजाभाव.
३१. चुनाचें=जैसाकीं, ऐशियास.
३२. ताख्त व ताराज=हल्ला करणें व लुटणें.
३३. न्याहायत-बहुतच, अतिशय.
३४. बाजेफौजा-कांहीं फौजा इतर सैन्य.
३५. मुखालिफाचे-दुष्मानाचे.
३६. ता॥-तपशील.
३७. पैंहाम=कधीं कधीं, वरचेवर.
३८. खैरियत=तन्दुरुस्ती, शरीरारोग्य.
३९. तंबीची कैफियत=पारिपत्याचें वर्तमान.

सोनगडाकडे पलटणें इंग्रचांचीं आलीं. यावर इकडून गणेशपंत बेहरे फौजसुद्धां दौड करून गेले. कोकणांतही लढाई सुरू आहेच. छ १९ साबान इहिदे समानीन श्रावण.

[ ४५९ ] श्री.

तिसरा मसुदा. रवाना छ २९ साबान इहिदे समानीन.

चेनांपट्टणकरांस इकडून खूब ताण बसतांच इंग्रज बजिद होऊन आपल्याकडे राजकारण लावितील, व मुद्देमाफक कबूल करतील, ते खातरेस न आणितां दोन तीन सवले लागलीं तरी लागोत, लेकीन तंबीच करावी याची मजबुती असावी, म्हणोन हमेश आं साहेबांचे कलमी करण्यांत येतें. व हल्लीं महमद अल्लीखां यांचे बोलण्याची अखबार बिनाजीपंताकडून आली. त्याची नक्कल व आं मेहेरबांचें पत्र नूर महमदखान व नरसिंगराव यांजकडे आलीं. मशारनिले यांणीं अयणीचे मुक्कामींहून इकडे पाठविलीं. त्याजवरून मुफसल कैफियत मालुम जाली. चुनाचे, *पैहाम आं साहेबीं अंदेशा दिलांत आणोन कलमी करावें ऐसें नाहीं. तरफैन करार मदार जाला तो मजबूत व पक्का आहे. इंग्रज बजिद होऊन व तमा दाखवून राजकारण करूं लागल्यास तरफैनच्या सल्लाह मसलतीखेरीज हरगीज मंजूर होणार नाहीं, याविशीं पक्की खातरजमा असावी. आं मेहेरबां चेनापट्टणच्या सरहद्देस गेले, इंग्रज नजदीक, त्यांची चाल बहुरंगी, तऱ्हे तऱ्हेचे मकर व फरेब दाखवून तरफैन दिलांत खलश यावयाविशीं खियाल नमूद करतील. त्यास आं साहेब दूरंदेश व मजबुत-मिजाज इंग्रजांचे मकर-फरेबांस खूब वाकफ. तेव्हां त्यांचे खियालावर न जातां तंबीच करतील, येविशीं खातरजमा आहे. बिनाबर इतिल्ला कलमी केला असे. मुफसल राव मेहेरबां राव शास्ते व कृष्णराव बल्लाळ लिहितील. म्हणोन नबाब हैदरअल्लीखां बहादूर यांस नानांचे नांवें हिंदवी पत्र. छ १९ साबान इहिदे समानीन श्रावण.

---

४०. चेनापट्टण=मद्रास.
४१. बजिद=लाचार.
४२. अखबार=बातमी, वर्तमान.
४३. मुफस्सिल=तपशीलवार.
४४. चुनाचे=जैसी कीं, ऐशियास.
* पैहाम=वारंवार.
४५. तरफैन=दोन्हीं पक्षांचा, परस्पर, तुमचा आमचा.
४६. तमा=महत्त्वेच्छा.
४७. हरगीज=सर्वथा, कधींही.
४८. नजदीक=नजीक, जवळ.
४९. मकर=दगलबाजी.
५०. फरेब=लुच्चेगिरी.
५१. खलश=भय, अंदेशा.
५२. खियाल=विचार.
५३. मजबूत-मिजाज=दृढ-चित्ताचे, खंबीर दिलाचे.
५४. बिनाबर=म्हणून, याकरतां.
५५. इतिल्ला=वर्तमान.

[ ४६० ]

श्री.

( रा छ १४ साबान इहिदे समानीन. )

आम्ही बेंगरूळास[५६] पोहोंचून नूरमहमदखान वगैरे यांची रवानगी करून पुढें दरकूच रवाना होऊन गेलों असों. आईदे[५७] इंग्रजाची तंबी जाले मजकुरास कलमी करण्यांत येईल. इंग्रजास मौकूल[५८] तंबी करावी ऐसें मुकरर केलें आहे. त्यास चेनापट्टणाकडे ताण बसतांच आपल्याकडे सलुखाचा पैगाम[५९] लावतील. तरि त्यांशीं सलुख न करितां तंबीच करावी या कामावर मुकय्यद[६०] राहून अमलांत ये ऐसें करावें, म्हणोन कलमी केलें. चुनाचे, नूरमहमदखान वगैरे गंजिंद्रगड पावेतों पोहोंचल्याची बातमी आली. ताहाल[६१] कृष्णा उतरले असतील. येऊन पोंहोंचतील. टोपीकरांची जात बेइमान व फरेबी. एकीकडे राजकारण लावून एकास दगा करतील. येविशींची येहतियाद[६२] व हुशारी असावी, म्हणोन इकडून *पैहाम आं साहेबांस कलमी करण्यांत आलें. दरींविला[६३] आं मेहेरबांही तोच अंदेशा दिलांत आणोन कितेक लिहितात. त्यास सरकारांतून जो दारमदार जाला त्यांत तफावत हरगीज यावयाची नाहीं. ये बाबे पक्की खातर जमा असावी. ख्याल दिगर[६४] दिलांत न यावा. इंग्रजाचे कवायतीचा व चालीचा नक्षा सरकारांत खूब मालुम आहे. आं मेहरबाकडे वकेलच कोणी पाठवून राजकारण लावितील, व तमा तवक्के[६५] दाखवून शोहरा[६६] करतील, आणि सरकारांत लिहितील कीं नबाब बहादरांचा आमचा जाबसाल ठरावांत आला. याच तऱ्हेनें सरकारांतही राजकारणाची शक्कल करून आं मेहरबांस कलमी करून सिगोफे[६७] बरपा करतील. हर कवाइतीनें तरफैन खलश[६८] आणावा या कामास इंग्रज कसूर करणार नाहींत. याजकरितां आं साहेबीं त्यांचा भुलावा व दगाबाजी नजरेंत राखोन शकशुभ[६९] दिलांत न आणितां करार बमोजीब खातरखा सजा[७०] करावी. सरकारांतून ही कुलहपोशांस[७१] तंबी वाकई[७२] अमलांत

५६. बेंगरूळ=बंगलूर=बंगलोर.
५७. आइंदे=पुढें.
५८. माकूल=योग्य, उचित.
५९. पैगाम=निरोप, यत्न.
६०. मुकय्यद=कायम, मजबूद.
६१. ताहाल=हा कालपर्यंत.
६२. एहतियाद्=सावधगिरी.
* पैहाम=वारंवार.
६३. दरीन् विला=या दिवसांत, आलीकडे.
६४. ख्याल दिगर=दुसरा विचार.
६५. तमा-तवक्के=महत्वाकांक्षा आणि आशा.
६६. शोहरा=प्रसिद्धी.
६७. सिगोफे बरपा करतील=दुसरी शक्कल उठवितील, दुसरी युक्ति उभी करतील.
६८ तरफैन खलश=परस्परांचा फरक, दुजाभाव, अंदेशा.
६९. शक-शबह्=संशय, अंदेशा, भीति.
७०. सजा=पारपत्य
७१. कुलहपोश=टोपीवाले.
७२. वाकई=यथायोग्य.

येईल. दुसरी गोष्ट हरगीज होवयाची नाहीं. येविशीं खातरजमा आहेच आणि असावी. राव शिंदे यांजकडील निभावणीचें खत पेशजी रवाना जालें तें आं मेहरबांस पोंहचलें असेल अगर पोंहचेल. ह्मणोन हैदरअल्लीखां बहादूर यांस नानांचे नांवें हिंदवी पत्र.

**[ ४६१ ]** श्री.

आपले दुषमानाची [?] तबियत बहुत कांहली[७३] होती त्यास फैजल-इलाही[७४] आराम होऊन गुसल[७५] केली, याची हकीकत सदाकतदस्तगाह[७६] नरसिंगराव तमाजी यांणीं अर्ज केल्यावरून निहायत[७७] खुषी जहाली. याचा तपशील काय ल्याहावा ? आपल्यास सेहत[७८] जालियाचे खुषीचे पारचे[७९] वगैरे बर्तपशील फर्द[८०] आलाहिदा पाठविले असत. × × × × ×[८१] कितेक मरातब हुजरून गोविंद नारायण व गणेश केशव दिं॥[८२] आनंदराव भिकाजी रास्ते यांस इरशाद[८३] जाले हे बयान[८४] करतील व सदाकत दस्तगाह मजकूर लिहितील त्यावरून वाजेह[८५] होईल. हमेशा खत कितावत[८६] फरहद[८७] जादा करीत जावी.

**[ ४६२ ]** श्री.

दरींविलां[८८] नवाब हैदर अल्लीखां बहादूर व्येहस्तनसीब[८९] जाले, हें ऐकून दिलास बहुत गमगीनी[९०] व खपगी[९१] जाली त्याचा बयान कलमी होऊं सकत नाहीं. लेकिन खाहेश[९२] इलाही. इलाज काय ? अलम दुनयास हेच रहा[९३] व रस्म[९४]. दरपेश[९५] येह लाजम[९६] के आं शहामतपन्हा[९७] या मरातबावर[९८] नजर देऊन सबर[९९] व विवेक करावा व नवाब मरहुमाप्रमाणें[१००] दौलतीचा बंदोबस्त व हुशयारी राखून इकडील येकसु[१] व

---

७३. काहली=बिमार.
७४. फजल इलाही=ईश्वर-कृपेनें.
७५. गुसल्=स्नान.
७६. सदाकत्-दस्तगाह=सु-सेवक, प्रामाणिक सेवक.
७७. निहायत्=बहुतच, अति.
७८. सेहत–आराम.
७९. पारचे–पोपाक, वस्त्रें.
८०. बतपशील-फर्द=तपशीलवार यादी.
८१. पुढील शब्द कांहीं गेले आहेत.
८२. दि॥=दिमत–पदरचा, निसबत.
८३. इरशाद=हुकूम.
८४. बयान करतील=सांगतील.
८५. वाजेह–जाहीर.
८६. खत कितावत=चिठ्ठीचपाटी.
८७. फरहद=फरहत्त=खुषी, संतोष.
८८. दरीन्-विला=या दिवसांत.
८९. ब्यहस्त नशीब=बाहिस्त-नसीब=स्वर्गस्थ.
९०. गमगीनी=फिकीर, दुःख.
९१. खपगी=( राग ) वाईट वाटणें.
९२. खाहेश=ख्वाहश=मर्जी (इलाहीची).
९३. रहा=मार्ग, रस्ता.
९४. रस्म=वहिवाट.
९५. दरपेश–पुढें.
९६. लाजम्–योग्य.
९७. शहामत्-पन्हा=राज्यरक्षक (पदवी).
९८. मरातब=पदवी, गोष्ट.
९९. सबर–धीर, सहनशीलता.
१००. मरहुम=मृत, मेलेले.
१. येकसु=एकपक्ष.

एकदिलीचा तरीक साबिक होता त्या बमोजीब अमलांत यावा. आज राहा येगानगत यांत मातंपूरसीचा खिलत आं शाहामतपन्हास पाठविला आहे. बतपशील आलाहिदा फर्द पाठविला आहे. बाजे मरातब गोविंद नारायण व गणेश केशव दि॥ आनंदराव भिकाजी रास्ते यांस इरशाद जाले हे बयान करतील, व सदाकत दस्तगाह नरसिंगराव तमाजी लिहितील, त्यावरून वाजेह होईल. हमेशा खत किताबत पाठवून खुषी जादा करीत जावी.

## [ ४६३ ] श्री.

( रा। पत्र छ १९ जमादिलोवल समानीन वैशाखमास. )

बहुत दिवस गुजरले. आं मेहेरबांकडून खत येऊन खुषी होत नाहीं. त्यास दोस्तीचे अलमांत ऐसें नसावें. हमेश खत किताबतीचा शिलशिला जारी असोन आपली खेरखुषी कळवीत जावी. येखलासास लाजम आहे. आ मेहरबांचें जाणें ताहाल चेनापट्टण प्रांतीं होत नाहीं. आज पावेतों इंग्रजांस चहूंकडून ताण बसोन आयास यावे. भोंसले मातबर फौजेनशीं कटकच्या जिल्ह्यांत पोहोंचले; बलकी इंग्रजाचे तालुक्यांत हंगामा सुरू केला असेल. सरकारच्या फौजा व सरदार यांची व करनेल गाडर यांची दररोज लढाई होत आहे. घेराघेरीमुळें इंग्रज बतंग केले. चालून आले तेथें निभाव होईना. व सरदारापुढें मुकाबिल्यास कायम न रहावे. व गिराणी ही न्याहायत जाली. सबब इंग्रज माघारे सरून बडोद्याचे आश्रयास गेले. बिलफैलें आं मेहरबांकडून ताण बसावा इतकाच तवकुफ. त्यास मसलहतीवर नजर देऊन जूद चेनापट्टण तालुकियांत जाणें होय तें घडावें. राव शिंदे यांचे पत्राचा अटकाव असलिया तेंही जलदच येईल. पत्राविशीं रावशिंदे

---

२. तरीक साबिक ( तरीका–रस्ता. साबिक–पहिला.) पहिला मार्ग, रस्ता, रीत.
३. बमोजिब=प्रमाणें.
४. राहा=मार्ग.
५. येगानगत=स्नेहमार्ग.
६. मातंपुरशी=दुखवटा.
७. फर्द=यादी.
८. बाजे मरातब–कांहीं दुसरे मजकूर.
९. सदाकत् दस्तगाह=सुसेवक.
१०. अलम=स्थिति, नातें.
११. शिलशिला=परंपरा. वहिवाट.
१२. खेरखुषी–( सुरक्षितपणा आणि सुख ) समाचार.
१३. येखलास=स्नेह, मैत्री.
१४. ताहाल=हा कालपर्यंत.
१५. चेनापट्टण–मद्रास.
१६. बलकी=इतकेंच नव्हे तर.
१७. हंगामा=धूम, गर्दी.
१८. कर्नेल गादर्द.
१९. बतंग=लाचार.
२०. गिराणी=महागाई.
२१. न्याहायत=निहायत्–अतिशय.
२२. बिलफैल=आतां, सांप्रत.
२३. तवकुफ= अवकाश, उशीर.
२४ जूद–सत्वर.

यांजकडे बहुत वेळ कलमी केलें कीं, रहाच्या[२५] खलशामुळें निभाव होत नाहीं. हमेशा हारकारे लुटले जाऊन सडे येतात. त्यास मोठी मसलत, तटून रहाणें मुनासब नाहीं. राव शिंदे यांचें पत्र येतांच आं मेहरबांकडे पोंहोचावीत असों. ये बाबे खातरजमा असावी. इंग्रजांचे तंबीची मसलहत उमदी बरवक्त[२६] तदबीर[२७] होऊन नमुदांत यावी हे सल्लाह नेक. याजकरितां मसलहतीस मदनजर[२८] राखून चेनापट्टणच्या जिल्ह्यांत सरंजाम सुद्धां जूद पोंहचून तालुका ताख्त[२९] व ताराज करावा. सर्व दरजे[३०] व मरातब[३१] आं साहेबांचे दीलनिशींत आहेत. कलमी करावें ऐसें नाहीं. मुंमईकर इंग्रजांनीं कोंकणच्या सरहदेंत शोखी[३२] केली. सबब सरकारची जमियेत जाऊन त्यांस तंबी करून कत्तल केलें. अरबा[३३] पांच चार होत्या त्या लुटून आणिल्या. मुफसल[३४] कृष्णराव नारायण यांस लिहिलें आहे ते जाहीर करतील. म्हणोन हैदरअल्लीखां बहादूर यांस नानांचे नांवें हिंदवी पत्र.

[ ४६४ ]

श्री.

( छ १० सफर इहिदे    माघ शुद्ध १० दशमी. )

इंग्रज बेइमान काबूतलब[३५][३६] बंगाला वगैरे हिंदुस्थानांत ज्या दौलतींत त्यांचा कदम[३७] शिरला तेथील अहवाल काय जहाला व इमान देऊन सलूख कसा राखितात हे मशहूर आहे. दक्षणेंत याच बमोजीब मकर. फरेब[३८] करीत चालिले. खुषकींत[३९] टोपीकराची चाल वाईट सबब यांस पोख्त सजा करून खारीज[४०] करावें. [हा] सल्लाह नेक जाणून इंग्रजांचे तंबीचा नक्षा सरकारांत मुकरर जाहला. त्या बमोजीब सरकारांतून लढाई सुरू आहे. भोंसले बंगाल्याचे सरहदेस जाऊन पोंहोंचले. हैदरअल्लीखान यांणीं चेनापट्टण तालुका अर्काट वगैरे कुल् मकाणें तसरुफांत[४१] आणिलीं. फक्त चेनापट्टण राहिलें तेथें ही मोहासरा[४२] दिल्हा. नवाब निजामअल्लीखां बहादूर यांच्याही फौजा शिकाकोल राजबंदरीकडे जाणार. चौक-

२५. रहाचा खलश-रस्त्याचा बेदा अडथळा.

२६. बर-वख्त=योग्यकाळीं.

२७. तदबीर=युक्ति, यत्न.

२८. मद-नजर-हेतु, एकदृष्टि.

२९. ताख्त व ताराज=हल्ला करणें व लुटणें.

३०. दरजे=पदवी, मान.

३१. मरातब=पद. बारिक भेद, गोष्टी.

३२. शोखी=दांडगाई.

३३. अरबा=तोफा.

३४. मुफसल=तपशील.

३५. काबू-तलब-संधि-शोधणारे.

३६. तलब-टपणें, शोधणें.

३७. कदम=पाय.

३८. मकर-फरेब-विश्वासघात व लुच्चेगिरी.

३९. खुषकींत=जमिनीवर.

४०. खारीज-हाकलून लावणें.

४१. तस्सरुफांत=कबजांत.

४२. मोहसरा-वेढा.

डून ताण बसला आहे. इंग्रज पांवप्यादे[43] किती दिवस ठरणार ? ईश्वर सत्तेनें होईल तें जहुरांत[44] येईल. सरकारांतून आणखीही मातबर फौज बंगाल्यांत कलकत्याचे सुमारें रवाना करण्याची तर्तूद होत आहे. फौजेच्या सरंजामाचे तदबिरेविषयीं[45] आपल्यास पेशजीं लिहाण्यांत आलें. जबाब ताहाल[46] आला नाहीं. सबब इंतज्यारी[47] आहे. इंग्रजाची चाल बादशाहा आदिकरून सर्व दौलतदारांस वाईट हे दूरंदेशीचे मार्गें समजोन त्यांचे तंबीची शक्कल नमूदांत आणावी. आपणाकडोन उत्तर आलें कीं, फौज पोख्त बंगाल्याकडे आली ऐसें समजावें. कितेक जाबसाल बोलण्यास राघो मल्हार यास आपणाकडे पाठविले आहेत. सविस्तर बोलतील त्याप्रमाणें तर्तूद व्हावी. हा ऐन वख्त आहे. ऐसा समय आइंदे[48] तदबीर केल्या यावयाचा नाहीं. पत्राचे जाब जलद येऊन पोंहोचावे म्हणोन पत्रें हिंदवी.[49]

२. चेतशिंघ.
 १. सरकारचें.
 १. नानांचें.

२

१. बाबू सुभानसिंग[51] यास नानांचे नांवें जास्त लिहिणें कीं, तुम्हीं चेतशिंघ यास दूरंदेशीनें सांगून लिहिल्याप्रमाणें जलद घडावें. म्हणोन व यादीप्रमाणें मजकूर.

३

( तीन पत्रें छ १६ मोहोरम सु॥ इहिदे समानीन. )

[ ४६५ ] श्री

नर्मदे[52] तीराहून गुजरायप्रांतें फौजासहवर्तमान तुम्ही गेल्यास किती दिवस जाले ? मनसबा लांबणीस न पडावा या अर्थें जलदी करून त्याचे प्रेत्न करण्याची हद्द पोंहचवून आपलें करणें शेवटास लौकरीच न्याल हें घडावेंच. असें दृष्टो-

४३. पावप्यादे–पायांचे शिपायी, पायदळवाले घोडे माणूस नव्हत.
४४. जहुरांत–जाहिरांत.
४५. तदबीर=युक्ति यत्न.
४६. ताहाल–ह्या वेळेपर्यंत.
४७. इंतजारी=इंतेजार=थांबणें, वाट पहाणें, प्रतीक्षा.
४८. आइंदे–पुढें.
४९. ह्या व मागील पत्रावरून इंग्रजाबद्दल नानांचें मत काय होतें व त्यांस अडविण्यासाठीं नानांनीं कोठकोठें कसे प्रयत्न चालविले होते हें ध्यानीं येईल.
५०. काशीकर चैतसिंग ज्याजवर हेस्टिंग्स याणें जुलूम केला. तिकडेही नानांचा धांगोरा होताच.
५१. सुभानसिंग हा कोण ? चैतसिंगाचा कारभारी ?
५२. हा महादजी शिंदे किंवा तुकोजी होळकर यांस लिहावयाच्या पत्राचा मसूदा असावा असें वाटतें.

त्पत्तींत येत गेलें असतां निष्कारण दिवसगतीवर मनसुबा पडत चालला. त्वरा करून मसलत शेवटास लावण्याविशीं वरचेवर लिहिण्यांत येत गेलें. परंतु निदर्शनास न ये. यावरून सर्वांचा एक विचार होऊन कैजाखी होत नाहीं असें दिसोन येतें. परंतु असें नसावें. ज्या कामांत तुम्हांसारिखे कृतकर्मे त्या कार्यास हे दिवस प्राप्त व्हावेसे नाहींत. या मागें या राज्यांत प्रसंग मोठे मोठे प्राप्त जाले तेथें तुम्हीं लोकींच जिवाभ्यश्रमें करून यशच संपादिलेंत. त्या पेक्षां सांप्रतची मसलत अधिक आहे ऐसा प्रकार नाहीं. इंग्रजाचें सहाय करून ते[५४] मनसुबा करूं इच्छितात, येविशींचा परिणाम कळतच आहे. परंतु अतःपर तुम्ही सर्वांनीं एक विचार करून हे मसलत लांबणीस पडल्यास सर्व प्रकारें हिंदुस्थान वगैरे जागांच्या बंदोबस्तास अंतर पडून जागां जागां लहानसाहान शत्रु अमर्याद वर्तूं लागतील, त्यांचे पारपत्य करणें तेंही संकटच पडेल, या अर्थें या मागें शत्रूंच्या पराभवार्थ तुम्हीं लोकीं कजाख्या व मेहनती केल्या आहेत त्याप्रमाणेंच या समयींही कराव्या. आणि मनसुबा अविलंबें शेवटास न्यावा. अखेरीचे दिवस, त्या प्रांतें छावणी न पडावी, मसलत लौकर निर्गमांत होऊन सर्वांचे येणें देशीं घडावें, असें जालें पाहिजे. याजकरितां रात्र दिवस न म्हणतां जेणें करून त्यांजवर आपली जरब पडोन यश प्राप्त होय ते गोष्टी करावी.

[ ४६६ ] श्री.

मुंबईकराकडोन एक शख्स[५५] राव मेहरबान श्रीपंत यांनकडे कांहीं बोलावयास ह्मणोन लष्करानजदीक येऊन राव मशारनिले यांस सांगून पाठविलें. त्यास लष्करांत येऊं न देतां तालुकियांतून काढून दिल्हा. आं साहेबांस कळावें सबब कलमी केलें असे. ये त ना त दोस्तानूर महमदखां व नरसिंगराव हरदो[५६] मानिले यांतून तेथून कितेक बोलून रवाना करून त्यांस हरदोंतून एकजण त्यास तेथून पाठवितील. त्यांणीं कृष्णराव व नारायण यांचे हामराहीं[५७] जलद यावें, ऐसें आं साहेबांचें खत यावें येविशीं पेशजी कलमी केलें त्या जबावाची इंतेंजारी[५८] असे. येविशींचे मेरातीब[५९] हरदो मशारनिले कलमी करतील. त्यावरून वाजे[६०] होईल.

इंग्रज मकर फरेब बहुत जाणतात. त्याचे रवेशींस[६१] आं मेहरबांहि खूब वाकीफ

५३. कजाखी=कटकट, मारामारी, लढाई.

५४. ते म्हणजे गायकवाड असावे.

५५. शख्स=अदमी, माणूस.

५६. हरदू=दोन्ही.

५७. हामरहा=संगतीनें, त्याच्या मदतीनें

५८. इतजारी=इंतेजार=वाट पाहणें, प्रतीक्षा.

५९. मरातीब=(पदव्या,) आंतील कमजास्त मजकूर.

६०. वाजेह=मालुम, ज्ञात.

६१. रवेश=चाल, रीति.

कलमी करावयाची हाजत[६२] नाहीं. आं साहेबाकडे ही मकर फरेब करण्यारा व राजकारण लावण्यास चुकणार नाहींत.

**[ ४६७ ]** श्री

श्रीमंत खुदावंद-न्यामत[६३] राव पंतप्रधान यांचा व आपला पक्का सलुख होऊन करारनामे अहाद[६४] शर्तीनशीं कृष्णराव नारायण सरकारचे मातबर यांजबराबर देऊन व आपल्याकडील नरसिंगराव यांची रवानगी जाली. लौकरच आं साहेबापाशीं पोंहोचतील. दरींविलीं[६५] आखबारे वरून मालुम जालें कीं, आं मेहरबानाची फौज आदवनी व मुदगल वगैरे नवाब निजाम अलीखां बहादूर यांचे तालुकियांत येऊन हरकत केली. प्रांत तमाम वैराण जाला. मकाणास माहेसरा[६६] होणार. ऐशियास खुदावंद-न्यामत राव पंतप्रधान यांचा व नवाब निजाम अलीखां बहादूर यांचा सलूख व येखलास[६७] बहुतां दिवसांचा, सर्व बाबे त्यांशीं जुदागी[६८] नाहीं. हल्लीं आं साहेबांचाही पक्का सलूख होऊन दोस्तीची मजबुती जाली. तेव्हां तिन्ही दौलती एक व बेहबुदी[६९] व मसलत एक, जुदागी राहिली नाहीं. इंग्रजांस तंबी करण्याची मसलत मातबर, अवघ्यांचे एकदिलीनें मुखालिफाची[७०] तंबी व्हावी. दरमियान असे सिकोपे[७१]मुळें मोठे मसलतींत कमती येती. आपले आपल्यांत पेंच येतात. हे सल्लाह दौलते[७२] नाहीं. याजकरितां फौजेस ताकीद होऊन माघारी आणवावी. नवाबाचे तालुकियास उपसर्ग लागूं नये. अमिरुल[७३]उमराव असालतजंग यांणीं इंग्रजांशीं राजकारण व पैगाम[७४] केला. सबब अव्वल[७५] हा बंदोबस्त करावा हें आं साहेबांचे दिलांत असेल. त्यास येविशींचे कुलू मरातब नवाब मवसुफ[७६] यांस कलमी केलें आहेत. त्याचा ते येविशींचा बंदोबस्त जलदच करतील. इंग्रजाचे तंबीचे मसलतीस नवाब मवसुफ एकदील आहेत. शिकाकोल राजबंदरीकडे चालून जाण्यास लौकरच [७७]खेमे-दाखल होणार. अदवनी कडील हंगामा[७८] लौकर आपण मना करावा. सर्व मसलती व

---

६२. हाजत=गरज, अवश्यकता.

६३. खुदावंत+न्यामत=( धनी+लक्ष्मी )=लक्ष्मीचे धनी, श्रीमंत.

६४. अहाद=अटी.

६५. दरीन्विला=या दिवसांत, सांप्रत काळीं.

६६. माहेसरा=वेढा.

६७. येखलास=स्नेह, मैत्री.

६८. जुदागी=जुदाई=निराळेपणा.

६९. बेहबुदी=कल्याण.

७०. मुखालिफ=शत्रु.

७१. सिकोप=( कळी ) तरंग, निराळी गोष्ट.

७२. सल्लाह दौलत इ०=हे राज्याच्या आबादानीस योग्य नाहीं.

७३. अमिरुल उमराव=उमरावांत मुख्य (एक पद आहे.)

७४. पैगम=पैगाम=निरोप, प्रयत्न.

७५. अव्वल=प्रथम.

७६. मवसुफ=वरती सांगितलेलें, मशारनिले.

७७. खेमे दाखल=डेरे दाखल.

७८. हंगामा=धूम.

दूरंदेशी आपलें दीलनशीन आहेतच. मुफसलबयान[७९] नरसिंगराव पोंचल्यानंतर करतील त्यावरून मालुम होईल. म्हणोन हैदरअल्लीखां बहादूर यांस मदारुल महाम[८०] व राव रास्ते व कृष्णरावजी यांचे नांवें पत्रें.

**[ ४६८ ]** श्री

तुम्ही सरकार कामाविशीं बहुत कळकळीनें सायास करितां म्हणोन रघुनाथभट यांणीं सांगितलें त्यावरून परम संतोष जाला. सांप्रत रघुनाथभट यांस पाठविले आहेत. सविस्तर मजकूर इकडील सांगतील त्याप्रमाणें तुम्ही व मशारनिल्हे एकविचारें होऊन ज्या योगें सरकारकाम चांगलें होय व लिहिल्याप्रों घडे तें करावें. यांतच इकडील तिकडील कामें व नफे आहेत. राजकारण मोठें याचें यश तुम्ही घ्याल हे खातरजमा, आणि घ्यावें. पत्रांचीं उत्तरें अति सत्वर पाठवावीं म्हणोन रामकृष्णभट केळकर[८१] यांस नानांचे नांवें पत्र.

**[ ४६९ ]** श्री

बातशाही मुलुख बंगाला इंग्रजांनीं आपले तसरुफांत[८२] आणिला आहे. त्यास तो मुलुख कुशाद[८३] व मैदान, वसाहत मोठी, त्या प्रांतीं भोंसले यांणीं पंचवीस हजार फौजेनशीं जाऊन मुलुख मारून ताराज[८४] करावा या बरहुकूम नेमणूक केली. त्याबमोजिब खंडोजी भोंसले दसऱ्याची साआलत[८५] करार करून निघोन फौज जमा करण्यास घांटा खालीं आले बहुतकरून जमाव जाला. बाकीचाही जमाव बलद होऊन बंगाल्याचे जिल्ह्यांत भोंसले रवाना होतील. दक्षणचे सर्व साहेब-रियासत[८६] यांचा एका आला. हे कैफियत कर्नल गाडर सुरतेस आहेत त्यांस थोडीशी मालुम होतांच बायकादिगर[८७] मनसबा करूं लागले कीं, मसलहत भारी पडली, तदबिरीच्या[८८] मुशाकिलींत[८९] येऊन मनसब्याकरितां मुंमईस आले. मुंमईकर जनरलाचे[९०] व गाडर मशारनिले यांचें कौंसिल[९१] होऊन कलकत्यास पत्रें गेलीं. कर्नल गाडर यांणीं मुंमईंतील दोन तीन हजार जमाव करून फिरोन छ २६ जिलकादीं सुरतेस जमावसुद्धां पोंचले. आइंदे[९२] चाल कोणती सुरू करतील तें पहावें. सरकारच्या

---

७९. मुफस्सल बयान=तपशीलवार हकीकत.

८०. मदारुलमहाम्=एक पद आहे. (व्यवस्थेचा मध्य) मुख्य व्यवस्थापक.

८१. हे रामकृष्णभट्ट केळकर कोण ? व त्यांजकडे काय राजकाण सोंपविलें होतें तें समजत नाहीं.

८२. तस्सरुफ=कबजा.

८३. कुशाद=मोठा, विस्तृत.

८४. ताराज=लुटून फस्त.

८५. सा आलत-वर्षाची वेळ, सण.

८६. साहेब-रियासत-राज्य-प्रभु, राजे, दौलतदार.

८७. बायक-दिगर=एकमेकांशीं.

८८. तदबीर=युक्ति.

८९. मुष्किली=अडचण.

९०. जनरल म्हणजे गव्हरनर असावा.

९१. कौंसल=खलबत, मसलत.

९२. आइंदे=पुढें.

फौजा व जिनैशी व सरदार शिंदे होळकर सर्व तयारी आहे. लेकिन इंग्रजांची या प्रांतें बंदरें दोन, एक सुरत व मुंमई. खुष्कींत कांहीं त्यांचा मुलुख नाहीं. आजीं* सबब इंग्रजांनीं बंदर बाहेर निघावें इतकी इंतेजारी आहे. अगर तसेच बंदरांत दम धरून रहातील. यानकरितां दहा हजार फौज सुरत प्रांतीं रवाना केली. त्यांणीं आसपास हंगामा करून त्यांस तंग१७ करावें. जमाव थोडा ऐसें समजोन चालून येतील. दोन चार मजली भुलावा देऊन मैदानांत आणावें. बाद सरदार वगैरे सर्व तयारच आहेत. फत्तेसिंगराव गायकवाडही त्या प्रांतीं दहा-पंधरा हजार फौजेनशीं आहेत. खुलास हाच कीं सरकारचा गुंता हरगीज तयारीचा राहिला नाहीं. तरफैनेची मसलहत एक, कच्चे पक्के पैदरपै मालुम व्हावें म्हणोन कलमी केलें असे. आं साहेबांकडीलही कैफियत कलमी करीत जावी. मरातबे कृष्णराव व गोविंदराव नारायण कलमी केलें त्यावरून जाहीर होईल. म्हणोन हैदरअलीखां बहादूर यांस नानांचें पत्र.

[ ४७० ] श्री

( रा छ ९ समानीन. )

बहुत दिवस गुजरले. आंसाहेबाकडून खेरीयेतचे खत येऊन वर्तमान कळत नाहीं. त्यास दोस्तीचे अलमात ऐसें नसावें. हमेश खैर आफीयेतचें खत पाठवून दिलशाद करीत जावा हें लाजम आहे. आं मेहरबांचें जाणें चेनापट्टण जिल्ह्यांत जालें असेल. जालें नसलिया करार बमोजिब जलद जाणें होऊन इंग्रजांस ताण बसवून सजा अमलांत यावी. गुजराथ प्रांतीं कर्नेल गाडर यांशीं व सरकारच्या सरदारापाशीं लढाई सुरू आहे. पांच-चार लढायांत इंग्रजांस ‡नशिहातच जाली. तेव्हां या फौजांपुढें आपला टिकाव होत नाहीं ऐसें समजोन कर्नेल

---

९३. जिनशी=धान्य, तृण, युद्धसामुग्री वगैरे पुरविणारें खातें. ती सामुग्री.

* आजीन् सबब=या कारणास्तव.

९४. खुष्कींत=जमिनीवर.

९५. इतजारी=इंतेजारी=थांबणें, प्रतीक्षा.

९६. हंगामा=धूम, लुटालूट.

९७. तंग=गतिहीन, अडचणींत आणलेले.

९८. भुलावा=अमक्या दिशेस जातों असें दाखवून दुसरीचकडे जाणें.

९९. बाद=नंतर.

१००. खुलास=स्पष्टता.

१. हरगीज=कधींही.

२. तरफैनची=परस्परांची, दोनी पक्षांची;

३. कच्चे पक्के=छोटे.

४. पै-दर-पै=क्षणोक्षणीं, वरचेवर.

५. मरातब=पदवी; पण ह्या सर्व पत्रांत "आंतील भेद, विशेष माहिती" ह्या अर्थानें ह्या शब्दाचा प्रयोग केलेला दिसतो.

६. खेरियत=सुरक्षितता, सुखरूप-पणा.

७. दोस्तीचे अलमात=मैत्रीच्या स्थितींत.

८. खैर-आफीयत=सुखरूपपणा.

९. दिल-शाद=चित्तास संतोष.

१०. चेनापट्टण=मद्रास.

११. करार-बमोजिब=ठरावाप्रमाणें.

१२. सजा=पारपत्य.

‡ नसीहत=उपदेश, अद्दल.

गाडर यांणीं सुरतेस माघारा आण्याचा मनसबा करून, नर्मदा-किनाऱ्यास आले. पिच्छावर सरकारच्या फौजा आहेत. कोंकणप्रांतीं मुंमईकर इंग्रजांनीं हंगामा केला त्याचे तंबीचे[14] व कोलापूर व कित्तूरकर वगैरे यांणीं सरकार तालुकियास इजा दिली त्यांचें पारपत्य त्याचें कुलूआजीजुल्-कंद्र[15] कृष्णराव नारायण यांस कलमी केलें ते जाहीर करतील त्यावरून मुफसल[16] मालुम होईल. तरफैन दोस्ती व येगानगत[17] तेव्हां सल्लाह मसलत पैहाम[18] इतेल्ला[19] करीत असावी. सर्व मरातब[20] आं साहेबांचे दिलनिसीन आहेत. म्हणोन हैदरअल्लीखां बहादूर यांस नानांचे नांवें हिंदवी पत्र.

[ ४७१ ]

श्री

हैदरअल्लीखान यांजकडील वकील दोन आले. त्याचा तपशील लिहिला व पहिले वकिलास उमेदवारकरून कारस्थानी केली. ते सर्व अर्थ समजण्यांत आले. ऐशियास हर कवाइतीनें सरकार काम ज्यांत चांगलें तें पेशजीपासोन करीत आलां, पुढेंही कराल, येविशीं खातरजमा आहे. नवाब निजामअल्लीखां वगैरे यांस पेशजी फर्मान पाठवण्याविशीं तुम्हांस लिहिलें होतें. त्याप्रमाणें तुम्हीं बातशाहा यास अर्ज करून फरमान तयार करविले असतील कदाचि [ त् ] नसले जालिया हल्लीं मसोदे पाठविले याप्रमाणें अर्ज करून फरमान[21] तयार करवून पाठवावे.

[ ४७२ ]

श्री

छ ८ जिल्हेज मार्गशीर्ष इहिदे समानीन रा। केलें.

आंमेहरबानीं खत मसरत-नेंमत[22] पाठविलें तें सांतनेक[23] पोंहचलें. अर्काट मकाण नामी मसनदनसीचें[24] त्यांत मुखालिफा[25] कडील सरंजाम पोख्त होता. तें छ ४ जिलकादीं हल्ला करून ठाणें कायम केलें. कितेक लोक कत्तल आला व बाकी दस्तगीर[26] जाले. हे मकान खुदाचे फजलेकडून[27] फत्ते जालें. हे खुष खबर मालुम होवयाबदल लिहिली असे. हमेश आपली शादमानी[28] व तिकडील मनसब्याची कैफियेत निगारष[29] करीत असावी म्हणोन कलमी केलें. चुंनाचे[30] अर्काट

१३. हंगामा=धूम, लुटालूट.
१४. तंबी=पारपत्य.
१५. कुल् आजीज्+उल्+कदर=सर्वमित्र.
१६. मुफस्सल=तपशील.
१७. येगानगत=स्नेह.
१८. पैहाम=निरोप.
१९. इतिल्ला=वर्तमान.
२०. मरातब-वर टीप ५ पहा.
२१. फरमान=राजपत्र.
२२. खत मसरत+नमत=( पत्र+संतोष, सुख+पूर्ण )=संतोष परिपूर्ण-पत्र.
२३. सातनेक=सुरक्षितपणें.
२४. मसनद-नसीचें=गादीचें.
२५. मुखालिफ-शत्रु.
२६. दस्तगीर=हस्तगत.
२७. फजल-कृपा.
२८. शादमानी-सौख्य, संतोष.
२९. निगारष-लेखन.
३०. चुनाचे=जसें कीं, एशियास.

मकाण मसनदनसीचें, तेथील बंदोबस्त जाल्यास बहुत दाब व लौकिक व बकाया[31] मुरदराज जाऊन मुखालिफावर जरब ऐसें जाणून आज राहायेगानगत[32] निगारष[33] करण्यांत आलें होतें. बफजल इलाही[34] तेथील बंदोस्त खातरखा[35] जाल्याचीं पत्रें आं साहेबांची आलीं. त्यावरून न्याहयत[36] खुषी जाली. त्याचा बयान कलमी करण्यांत येत नाहीं. बहुत बेहतर[37] व बन्या जाले. आईदे[38] आजराहा ये मसलत मुलकी व राहिल्या मकाणाच्या बंदोबस्ताची तदबीर[39] होतच असेल. इंग्रज मकर[40] फरेब बहुत जाणतात. आंसाहेबही त्यांचे रस्मरवैयास[41] खूब वाकीफ. हे मरातब[42] मुफसल[43] कलमी करण्यांत आलेच आहेत. मुकरर[44] त्याहावें याची हाजत[45] नाहीं. इकडील मजकूर तरि साबिक[46] कर्नेल गाडर मय सरंजाम[47] सुरतेनजीक होते. त्यांणीं दोन पलटणें केशोपंत[48] याजबराबर खानदेशांत पाठवून रुख[49] नमूद केला होता. त्यावरून गणेशपंत त्याचे मुकाबल्यावर आहेत. त्यांजपाशीं फौजेचा जमाव करविला. मैदानांत यावें हे इतंजारी[50] होती. मैदानच्या लढाईची जुरत[51] न पाहून गाडर मजकूर याणीं तो रोख सोडून तमाम सरंजामसुद्धां दर्याकिनारियानें कोंकणांत नमूद जाले. सरकारांतूनही सरदार फौजा घांटाखालीं रवाना केल्या लहान मोठ्या एकदोन लढाया जाल्या. त्यांत हटवून मावारें घातले. याउपरि थोडेच रोजांत होईल तें जहुरात[52] येईल भोंसले फौजसुद्धां सरहद्देवर होते. तेही बंगाल्यावर उतरले असतील. नवाब निजाम अल्लीखान बहादूर यांची फौज व सरदार जमा जाले, व होत आहेत. जलद शिकाकोलीकडे निघावें म्हणोन इकडून पैहाम[53] कलमी करण्यांत येतच आहे. शिंदे होळकरही डेरेदाखल होऊन फौजांचा जमाव जाला व करितात. मेहेरबान कृष्णराव नारायण यांची रवानगी फौजसुद्धां आंसाहेबांकडे जलदच केली जाईल. येविशीचे मरातीब ऐतजाद-दोस्तां[54] नूरमहमदखान व नरसिंगराव लिहितील त्या

---

३१. वकाया उमर–दराज =वकाया=घडून आलेल्या गोष्टी. उमर-दराज–चिरंजीव, पुत्र.

३२. रहायेगानिगत=स्नेह-मार्ग.

३३. निगारष–लेखन.

३४. बफजल इलाही=ईश्वरकृपेनें.

३५. खातरखा=मनाप्रमाणें, पक्का.

३६. न्याहायत=अति, बहुतच.

३७. बेहतर व बन्या ? बेहतर व बहीन? अनुकूल, चांगलें.

३८. आइंदे–पुढें.

३९. तदबीर=प्रयत्न.

४०. मकरफरेब=दगलबाजी व लुच्चेगिरी.

४१. रस्म-रवय्यास–चाल, रीति.

४२. मरातब=(पदवी) मजकूर गोष्टी ह्या अर्थी.

४३. मुफस्सल=तपशीलवार.

४४. मुकरर=पुनः

४५. हाजत-जरूर, अवश्यकता.

४६. साबिक=पूर्वी, प्रथम.

४७. मय-सरंजाम=सरंजामासुद्धां.

४८. केसोपंत कोण ?

४९. रुख नमूद=रुख=दिशा, रोख. नमूद=नेमलेले.

५०. इतेजारी–वाट पाहणें.

५१. जुरत–

५२. जहुरांत -जाहिरात, मालुमांत.

५३. पैहाम् -पयाम्=निरोप.

५४. ऐ त जा द दोस्ता-?एतमात दोस्तां ? विश्वासुक स्नेही ?

वरून वाजे[55] होईल. सदई प्रमाणें हैदर अल्लीखां बहादूर यांस नानांचे नांवें हिंदवी पत्र. छ ७ जिल्हेज इहिदे समानीन मार्गशीर्ष.

[ ४७३ ] श्री.

छ १२ सफर सन इहिदे समानीन माघ.

आंबाहेवीं खत फरहत–नेमत[56] इबेलाग[57] तें बसाअलित नेक[58] पोंहचून शादमानी[59] जाली. इंग्रजांची फौज *गारत जाली. ही खबर पोंहचतांच जनराल कूट[60] चिनापट्टनास[61] भारी जमावसुद्धां आला. इकडील बंदरावर मुखत्यार आहे. इंग्रजांनीं नागपूरचे भोंसले यांसि मिलाफी जाबसाल बोलून मुलूख करून घेतला. §मोंगलाकडे तो मातबर फिरंगी जाऊन दारमदार जहालाच आहे. कूट मजकूर चेनापट्टणास आल्यावर मंमईकर व गाडर यास कोणीही वजेनें[62] श्रीमंतांशीं सलुख करून तिकडील सरंजाम हिकडे घेऊन येणें ऐशीं खतें लिहून जहाज रवाना केलें म्हणोन चिनापट्टणची बातमी आली. जनराल मजकूर मोकाबिल्यास[63] निघणार खुदाचे ‡फजले कडून त्यांची तंबी होईल ते जहुरांत[64] येईल. इंग्रज मकेरी[65] काबूतलब[66] त्याचे चालीस वाकीफ असां. येथून लिहावें ऐसें नाहीं. तिकडे सुरत बंगाला खालीं मयदान रहात आहे. तिकडे भारी पायबंद बसे[67] ऐसें करावें. कृष्णराव नारायण याजबराबर दोन हजार स्वार देऊन इकडे रवाना करावें. बाकी मरातिब[68] नूरमहमद खान व नरसिंगराव सांगतील त्याजवरून मालूम होईल म्हणोन कलमी केलें. चुनाचे भोंसले स्वराज्याचे शिकमांत[69]. तेव्हां मिलाफी सलुख करून घेतील हें कयासांत[70] येत नाहीं. थोडक्याच आरश्यांत[71] बंगाला गारत[72] केल्याच्या खबरा आपणांस पोंहचतील. ऐसें हमेशा भोंसले सरकारांत लिहितात. इकडूनही हे शक्कल जलद नमुदांत यावी म्हणोन पत्रें जातात. इंग्रजांचे तंबीचा नक्षा नवाब निजाम अल्लीखान

५५. वाजेः–ज्ञात, मालुम.
५६. खत-फरहत-नमत=संतोषकर, आनंदकर, पत्र.
५७. इबलाग=पाठाविलेले.
५८ ब साअत-नेक=( साअत=तास ) सुसमयीं.
५९. शादमानी=खुषी, संतोष.
* गारत=नष्ट.
६०. सर आयर कूट.
६१. चिनापट्टण–मद्रास.
§ मोंगल - निजामअल्ली.
६२. वजेनें वज–रीति, मार्ग.
६३. मोकाबिला=सामना, लढाई.
‡ फजल=कृपा.
६४. जहुरांत –कळविण्यांत.
६५. मकरी=दगाबाज.
६६. काबू-तलब -संधि-शोधक.
६७. पायबंदबसे ऐसें=अडून, गुंतून पडत असे.
६८. मरातीब=गुप्त किंवा विशेष गोष्टी.
६९. शिकमांत=( शिकम )–पोटांत.
७०. कयास=कल्पना, विचार.
७१. आरश्यांत–अरसा=अवकाश.
७२. गारत करणें–नाशकरणें.

बहादूर यांचे सल्लाहानें ठरला. सालगुदस्ता आदवनीचे मझेल्यांमुळें[73] नमूद न जाले. पुढें बरसातही गुजरली. तां[74]हाल निघणें होत नाहींत व मिस्तर हॉलन[75] यास लावून ठेविले. सबब सरकारांतून त्यास लिहिण्यांत येतच आहे. हल्लीं आपलें खत पोंहचल्यावर नवाब मौसुफ[76] यांस निकडीनें लिहिलें आहे. इंग्रज मकर-फरेबी बहुत जाणतात. हरएक जागा इतिफाकांत[77] जुदाई[78] आणोन आपली गुरबत[79] व रास्ती[80] दाखवून खुषकीचे दौलतींत दखलगिरी[81] करीत चालिले. याच चालीनें तरफैन दिलांत[82] षुभः[83] आणतील याचे बयान मुफसल ‡पयहम आं साहेबास कलमी करण्यांत आलें. व आंसाहेबही रवैयास[84] खूब वाकीफ आहेत. खुलास[85] दुनयाईचे *अलमांत जितक्या तवक्याच्या[86] शकला आहेत त्या तरफैन दाखवून हर तदबिरीनें[87] निफाक[88] पाडावयासि कसूर करणार नाहींत. लेकीन सरकारांत जे गोष्ट करारांत आली तेच पक्की व मंजूर आहे. तरफैनचे इतिफाकांत कोणाचें कांहीं चालणार नाहीं. हे दूरंदेशीनें समजोन इकडील करारबमोजीब कायमी आहे. आंमेहरबानांचीही असावी. कोणेही बाबे दिक्कत व षुभः येऊं नये. फील[89]हाल राव मेहरबान तुकोजीराव होळकर व गणेशपंत बेहरे एक होऊन केसो कृष्ण दातार खानदेशांत इंग्रजी पलटणें व स्वार जमावसुद्धां हंगामा[90] करीत होता, त्याची खूब तंबी केली. इंग्रजी पलटणें कापून काढलीं. चंदरराव पंवार सरदार यांजकडील ठार पडला. खांसा केसोपंत †पळोन गेला. गणेशपंत बेहरे व होळकरांकडील कांहीं फौज सुरतेकडे ता[91]ख्त-ताराजी करण्यास रवाना जाले. §दोस्तदार ही बमयफौज कोंकणांत गाडराचे मुकाबिल्यास आहों. राव मेहरबानं तुकोजीराव होळकरही फौजसुद्धां येऊन पावले. जागा अडचणीची सबब मयदानांत काढून लढाई ध्यावी, ह्या तदबिरींत आहों. खुदाचे फैजलेकडून[92] होईल तें जहुरांत[93] येईल. करनेल कूट जमाव करून

---

७३. मझेला-मझल्लेह=नीचपणा, बेअबरू.
७४. ता-हाल=हा कालपर्यंत.
७५. मिस्तर हालन ?
७६. मवसुफ=पूर्वोक्त, वर सांगितलेले.
७७. इतिफाकांत=( इत्तेफाकन )-घडलेल्या, ठरलेल्या, गोष्टींत.
७८. जुदाई=दुजाभाव.
७९. गुरबत=गरीबी.
८०. रास्ती=सचोटी.
८१. दखलगिरी=ढवळाढवळ, मध्यें पडणें.
८२. तरफैन दिलांत=परस्परांचे चित्तांत.
८३. षुभः-अंदेशा, भय.
‡ पैहाम्=पहम्-वरचेवर, एकापाठीमागून एक.
८४. रवय्यास=चालीस.
८५. खुलास=सारांश.
* दुनयाईचें अलमांत=दुनयेंत.
८६. तवक्याच्या-आशेच्या, विश्वासाच्या.
८७. तदबीर-युक्ति, प्रयत्न.
८८. निफाक-दुष्मानी, वैर.
८९. फीलहाल-आतां.
९०. हंगामा-धूम, लुटालूट.
† हा केसोपंत कोण ?
९१. ताख्त-ताराजी-हल्ला व लुटालूट.
§ दोस्तदार-मित्र ( हरिपंत फडके. )
९२. खुदाची-फजल-ईश्वराची कृपा.
९३. जहुरांत-मालुमांत.

मुकाबिल्यास आलियावर आं साहेबांपुढें ठरणार नाहीं. खूब नतीजां[९४] पोंहचेल. मेहेरबान कृष्णराव नारायण यांची खानगी आंसाहेबांकडे जहाली आहे. फौजेची तयारी होत आहे. अनकरीब[९५] येऊन पोंहचले येविशींचे मरातीब आयतेजाद दोस्तां[९६] नूरमहमदखान व नरसिंगराव कलमी करतील त्याजवरून वांजे[९७] होईल. म्हणोन हैदरअल्लीखान यांस हरीपंत तात्यांचें पत्र.

[ ४७४ ] श्री.

छ २६ रबिलोवल. शिमगा. इहिदे समानीन पत्र रवाना जाले

गाडर जमावसुद्धां घाटावर येऊन अडचणीचे जागां मुक्काम करून आहे. मेहेरबान हरीपंडत व तुकोजीराव होळकर सामान सरंजामसुद्धां त्याचे मुकाबल्यास आहेत. मुतवातिर[९८] लढाया अमलांत येतात. मेहरबान परशरामपंडत यांस बमयफौज[९९] रस्त[१००] बंद करून पायबंद द्यावयाकारितां घाटाखालें कोंकणांत रवाना केले. शिपरी कोल्हारावर[१] इंग्रजी पलटणें आलीं, त्यांचे तंबीकारितां रावमेहरबान महादजीराव शिंदे त्या रुखें[२] चालून गेले. हें आंसाहेबांस पेषजी कलमी करण्यांत आलेंच आहे. दरीन्विला[३] परशराम पंडत यांणीं इंग्रजी पलटणें पनवेलीहून रसद घेऊन येत होतीं त्यांजवर फौज पाठविली. त्या फौजेनें पलटणाशीं गांठ घालून दोन तीनशें लोक इंग्रजी कत्तल केले. एक निशाण व तीनशें बंदुखा व शंभर बैल बारुत[४] व दोनशें बैल गल्ला ऐसें लुटून आणिलें. तिकडील तोफांचे गोळ्यानें परशराम पंडत यांजकडीलही घोडीं व लोक ठार व जखमी जाले. ते रोजीं पलटणांस पुढें जावयाची फुरसत न सांपडली. सबब अडचणीची जागा व झाडीचे आसरियानें मुक्काम करून राहिलीं. परशरामपंडत खोपोलीचे रुखें होते, त्यांणीं दुसरे दिवशीं कुल् सरंजामसुद्धां त्या पलटणावर येऊन *इलगार केला. तेव्हां पलटणें फौजेच्या मुकाबिल्यास ठरू न सकतां झाडींत पसपा[५] झालीं. व गाडर याकडून कुमक येऊन रात्रीं गलबल न करितां पलटणें झाडींतून निघोन गेलीं. अडचण व झाडीचा आसरा नसता तर गारतच[६] केलीं असतीं. गाडर जमावसुद्धां घाटावर मुक्काम करून आहे. त्यास हरीपंत व होळकर यांणीं छ २४ रबिलोवलीं

---

९४. नतीजा=शेवट.

९५. अनकरीब=जवळ जवळ.

९६. आयतेजाद दोस्तां—वर टीप ५४ पहा.

९७. वाजेह=ज्ञात, मालुम.

९८. मुतवातिर=पैदरपै, वरचेवर.

९९. बमय-फौज=फौजेसुद्धां.

१००. रस्त, रसद=तृण-धान्यादिकांचा पुरवठा.

१. शिपरी कोल्हार—उत्तर हिंदुस्थानांत.

२. रुखें,=दिशेनें, तिकडे.

३. दरीन्विला=हल्लीं, ह्या दिवसांत.

४. बारुत=अग्नि-चूर्ण, दारू.

* एलगार=एकदम, घाईचा हल्ला.

५. पसपा झालीं=मागें सरलीं, मागें पडलीं.

६. गारत करणें=नाश करणें.

तैलाठ्यास जाऊन त्याचे जमावावर तोफा लागू केल्या. व बाणाचीही मारागिरी बेतऱ्हा* केली. ते वख्तीं तिकडोन इंग्रजी लोक चालून आले, त्यांस हरीपंत व होळकर यांणीं गाडरवर स्वार पायउतारा करून हटवून माघारें घातले. खुलश गाडर यास दुतर्फा फौजेचा ताण व शह बसला. सबब अंदेशांत आहे. पुढें यावयाची ताकद होत नाहीं. महादजीराव शिंदे यांजकडोन बातमी आली कीं, कुमक नामें सरदार इंग्रजी पलटणासहित शिरोजे नजदीक दोहों कोसांवर मुक्काम करून होता. तेव्हां त्यांशीं मुकाबील होऊन तोफांची व बाणांची मारागिरी केली. इंग्रज लढाईची ताब आणूं न सकता हटून शहरचे आश्रयास गेले. आजीसबब आम्हींही ताकूबावर जाऊन व लगट करून न्यहायत आजिज व बतंग केलें. याप्रमाणें शिंदे यांचें पत्र आलें. त्यावर दोन दिवस चौगिर्दा फौज उभी करून तोफांची व बाणांची मारागिरी करून तंग केलें. त्यावर दुसरे दिवशीं आखीरष इंग्रज बेहिम्मत होऊन दुसरा इलाज न पाहतां चंदेरीचे रुखें फरारी जाले. ते वख्तीं महादजीराव शिंदे यांणीं त्यांचा पाठलाग करोन इंग्रजी लोक दोन तीनशें तहतंग केले. व बाहिर बुनगा लुटोन घेतली. त्या लढाईंत शिंद्यांकडील एकदोन सरदार व घोडीं व कांहीं लोक कामास आले. आइंदा फौजेचे पलटणाशीं लढाई होत जात आहे. बहुत करून पलटणें गारत होतील ऐसें कियासांत येतें. याबमोजिब सरसरी सरकारचे कारकुनाकडून लढाईंतच पत्र लिहूत बातमी आली. मुफसल मागाहून वर्तमान आलियावर लिहिलें जाईल. म्हणोन हैदर अल्लीखां बहादूर यांस नानांचे नांवें हिंदवी पत्र.

[ ४७५ ] श्री.

रा। छ १० सवाल इहिदे

आंसाहेबीं खत-मसरत-नमत पाठविलें तें बवख्त नेकें पोहचलें. चेनापट्टणाहून

---

७ तलावा=टेहळणी.

* बेतरह=अतिशय, खूब.

८. खुलश=सारांश.

९. कुमक ?

१०. ताब=शक्ति, सामर्थ्य.

११. आजीन्सबब=यास्तव.

१२. ताकुबावर=(ताकुब) पिच्छावर.

१३. न्यहायत=अतिशय. आजिज=लाचार.

१४. बतंग-गतिहीन.

१५. चौगिर्दा-चोहींकडून, चौबाजूनें.

१६. आखीरष्=शेवटीं.

१७. तहतंग=तेहतंग=अडकिवलेले, कैद केलेले.

१८. बाहिरबुनगा=बाहरबुनगा=बाजार वगैरे सर्व.

१९. आयंदा=पुढें

२०. सरसरी=सरासरी, साधारण.

२१. मुफस्सल=तपशीलवार.

२२. बवख्त-नेक=सु-समयीं.

जनरल मंडोर[23] नामें जंगी[24] सरंजामसुद्धां मोकाबिल्याचे इराद्यानें कंचीस[25] आल्याची खबर आली. त्या वरून आम्ही अर्काटेहून कंचीस पोहोंचून त्यास घेरा दिल्हा. मच्छलीबंदर व गंठुराहून करनल बेली नामें सरदार सरंजामानिशीं कुमकेस येत होता, त्यावर फौज पाठवून घेराघेरी करविली. ते कंचीहून चौ कोसांचे फांसल्यानें[26] गढीचा आसरा घेऊन राहिले. त्याचे उपराळ्यास[27] जनरल मंडोर याणें आपले *हामराही पैकीं बेष चुनीदी§ जमियेत पाठविली. करनल बेली यांणीं आपली व कुमकेस आलेली जमियेत घेऊन इकडील फौजेशीं लढाई करीत येत चालिले. हे बातमी कळतांच कंचींत मंडोर यांचे तोंडावर जमियेत ठेवून आह्मी खाशी फौजसुद्धां चालून जाऊन मारामारी करोन कर्नल बेली यांचे फौजेस कत्तल आम[28] केले. खुद्द कर्नल बेली सरदार या शिवाय मातबर तीस पालखीनिशीनें[29] सरदार व पांचशें गोरे हे साबूत पाडाव आले. पांचशें फिरंगी व दोन हजार बार पावतों मारले गेले[30]. बाकी कुल्[31] लष्कर लुटून घेतलें. हें फ्रंचीस जनराल मजकूर याणें ऐकून घाबरा होऊन रात्रीचे वख्तीं जमावसुद्धां फरारी जाला. त्याचे पिछावर इकडून फौज पाठविली. यांशीं त्यांशीं लढाई होऊन निष्पै[32] जमियेत मारून घेतली. सर्व सरंजाम टाकीत टाकीत कांहीं जुज‡ जमियेत नशीं चेंगलपट येथील गढीचे आश्रयास जाऊन पोहोंचला. इकडून फौजेनें त्या गढीस घेरिलें आहे. खुदाचे फज्लेकडून तंबी अनकरीब[33] होईल ते लिहिण्यांत येईल. ह्मणोन कलमीं केलें. चुनाचे[34] आं मेहेरबांही गाडद व तोफा व फौज वगैरे मातबर सरंजामसुद्धां इंग्रजांवर इरादा केला. तेव्हां दोस्तदारांस

२३. जनरल मंडोर=जनरल सर हेक्टर मन्रो.

२४. जंगी=लढाऊ, दारूगोळा तोफखाना या संबंधाचा.

२५. कंची=कांचीपुरम्, ज्यास इंग्रजी ग्रंथांत 'कंजीवराम्' असें म्हणतात तें शहर.

२६. फासळा, फासेला=अंतर.

२७. उपराळा=मदत, पाठराखण.

* हमराही=बरोबरील लवाजमा, फौज.

§ बेष चुनीदी=बिष् चुनीदी=अधिक निवडक, अगदीं निवडक.

२८. इंग्रजी ग्रंथांत तर बेलीस कुमक केली नाहीं सबब जनरल मनरोस दोष दिलेले आढळतात.

२९. कत्तल-आम्=सर्वांची कापाकापी.

३०. पालखी-नशीन=पालखीच्या योग्यतेचे.

३१. स्वाधीन होतों असें निशाण दाखवून शस्त्रें खालीं ठेविल्यावर इंग्रजी फौजेवर हल्ला करून हैदरानें कत्तल केली असा त्यावर आरोप आहे. फ्रेंच सरदार हैदराकडे होते त्यांणीं ह्या वेळीं पुढें होऊन बरेच इंग्रज लोक वांचविले अशी फ्रेंच लोकांची स्तुति केलेलीही आढळते.

३२. कुल्=सर्व.

३३. निष्प=अर्धा.

‡ जुज=थोडी.

३४. अनकरीब=बहुधा, बहुतकरून.

३५. चुनाचे=जसे कीं, ऐशियास.

हेंच यकीनन्[३६] होतें, जे अव्वल[३७] टोपीकर मैदानांत येऊन मोकाबिला करूं पावणार नाहींत. अडचणीचे जागां मकर फरेबानें जें होईल तें करतील. अगर मुकाबिल्यास आले तरि आं साहेबांचे सरंजामापुढें टिकणार नाहींत. बेशुभः[३८] शिकस्त खाऊन फरारी होतील. याची आजमायेष[३९] आज सहा वर्षें जालीं. सरकारच्या फौजांशीं व इंग्रजांशीं लढाईचा मारका-रुबकार[४०] आहे. लेकीन कुलहपोष[४१] हमेश अडचणीच्या जागां धरोन फंद फरेबच करीत राहिले. कोणही रोजीं मैदानांत येऊन मोकाबिला केला आणि कायम राहिले हें तरकीब[४२] नजरेस आली नाहीं. चुकोन मैदानांत गांठ पडली, तेव्हां शिकस्तच होऊन गेले. सबब दोस्तदारांचे दिलांत हें गुजरलें होतें. बफजल-इलाही[४३] त्या बमोजीबच जहुरांत[४४] आलें. मुखालिफांस[४५] खूब नशीयत पोहोंचली. यावरून निहायत[४६] खुषी व खुरमी[४७] जाहली. खुदा ये-तौला[४८] हे फत्ते आं मेहेरबांस व जमिये दोस्तांस[४९] मुबारक[५०] लाये. इंग्रजांची शिकस्त व आं साहेबाची फत्ते हे खबर श्रीमंत खुदावंत न्यामत[५१] राव पंतप्रधान यांस अर्ज होतांच बहुत खुषवख्त होऊन आपल्या तदबिरेस[५२] व जुरतेस[५३] तहसीं[५४] व आफरीत[५५] फर्माविली याचा ता। एतजांत दोस्तां नूरमहमदखां व नरसिंगराव लिहीतील त्यावरून दीलनिशीन[५६] होईल. आईदे[५७] महमदे आलीखां व गोरदोर[५८] चेनापट्टणांत आहेत. त्यांची रवेश[५९] मकरी[६०] व दगाबाज. चार दिवस दम खाऊन कलकत्त्यास लेहून येथून जमियेत जहाजांवर अगर खुषकींतून आणवितील. मजबुत होऊन फितना फिसाद[६१] बरपा[६२] करतील. अगर बमीनते[६३] आपणांशीं राजकारण

---

३६. यकीन=निश्चित, खचित.

३७. अवल=प्रथम, आधीं.

३८. बे-शुबह्-नि:संशय.

३९. आजमायेष=अनुभव, परीक्षा.

४०. मारका रुबकार (रण+गुंतणें)=रणांत गुंतणें, रणोद्योग.

४१. कुलह्-पोष-टोप-कर, टोपीवाले.

४२. तरकीब=व्यवस्था, युक्ति

४३. ब-फजल-इलाही=ईश्वर-कृपेनें.

४४. जहुरांत येणें=कळणें.

४५. मुखालिफ=सपत्न, शत्रु.

४६. निहायत=बहुत, अति.

४७. खुरमी, खुर्रमी=आनंद, संतोष.

४८. खुदा-ए-तआला=प्रभावयुक्त ईश्वर, तेजोमय ईश्वर.

४९. जामिये दोस्त=सर्व मित्र, सगळे स्नेही.

५०. मुबारक=मुबरक=मंगलदायक, कल्याणकारक.

५१. खुदावंत न्यामत=लक्ष्मीचे धनी, श्रीमंत.

५२. तदबीर=युक्ति.

५३. जुरत-धैर्य.

५४. तहसीन्-स्तुति.

५५. आफरीन्-शाबासकी.

५६. दील-नशीन्-चित्त-निहित.

५७. आइंदे=पुढें.

५८. गोरदोर--गोवरनोदोर=गव्हरनर.

५९. रवेश=चाल, रीति.

६०. मकरी-विश्वासघाती, दगलबाज.

६१. फितना-फिसाद-गडबड. दंगा.

६२. बरपा करणें=वाढविणें, उभारणें.

६३. ब-मिनत=उपकार-सहित, मोठ्या विनतीनें.

लावून तमा व तवक्का[६४] दाखवितील. तरफैन इत्यफाक[६५] व येकादिलींत खलश आणावयास कसूर करणार नाहींत. आं मेहेरबां त्यांचे रस्म व रवय्यास[६६] खूब वाकफ आहेत. टोपीकरांनीं जमून जोर धरला नाहीं तों पावेतों लगट एक हिरेरी[६७] करून नेस्त व नाबूद करण्यांत येतील या बाबे खातर जमा आहे. इकडील कैफियत तरि दसऱ्याचे रोजीं सातनेक[६८] पाहून खेमे[६९] बाहेर दिल्हे. ज़लदच खेमेदाखल होण्यांत येईल. बाद इकडून ही कुलहपोशास नशियेत कसकशी होईल ते जहुरांत येईल. हमेश खत पाठवून तिकडील कैफियत कलमी करीत जावी. म्हणोन हैदरअल्लीखां बहादूर यांस पत्रें हिंदवी.

१. नानांचें.

१. हरीपंततात्या.

२

[ ४७६ ]

श्री.

( छ २७ सफर माघ इहिदे समानीन. )

आं साहेबीं खत-फरहत्त-नमत[७०] इबलाग[७१] केलें तें बसाअत[७२] नेक पोहोंचून शादमानी[७३] हांसील जाली त्यांत कलमी केलें कीं, बिलफैल[७४] जनराल कूट भारी जमावानिशीं चेनापट्टणाहून बाहेर निघाले आहेत. आह्मीही त्यांचे तबीचे पैरवींत[७५] असो. खुदाचे फजलेकडून चंदरोजांत[७६] जें होईल तें जहुरांत येईल. भोंसले यांणीं बंगाल्याकडील मोहीम करण्याचा करार असतां कूट मजकूर इकडे येते वख्तीं भोंसले यांसि कांहीं देणेंघेणें करून आला. याकारितां भोंसले तिकडे मोहीम करीत नाहींत. निजाम अल्लीखान करारा प्रमाणें सिकाकोल राजबंदराकडे न जातां फिरंगियांकडील मातबर वकिलास आपणांपाशीं ठेवून फिरंगियाचा व आपला दारमदार मखफी[७७] करून घेऊन आपले मारफतीनें श्रीमंतांकडील सलुखाचा करून देतों ऐसें सांगतात ह्मणून तेथून फिरंगियाकडील वकील चिनापट्टणास लिहून पाठवीत आहे. त्याजवरून जनराल कूट मजूरानें मोंगलाचा व श्रीमंतांचा सल्ला जैशी त्यांची खातर असेल त्या प्रमाणें करून घेऊन, तमाम फौज तिकडे बोलावून,

६४. तमा व तवक्का=महत्वाकांक्षा आणि आशा.

६५. इत्यफाक=इत्तेफाकन्=एकी, ऐक्य.

६६. रस्म व रवय्यास=वहिवाटीस.

६७. हिरेरी=झपाट्याचा हल्ला.

६८. सात-नेक=सुमुहुर्तीं.

६९. खेमें=डेरे.

७०. खत-फरहत-नमत—संतोषकारकपत्र.

७१. इबलाग करणें=पाठविणें.

७२. ब साअत-नेक—चांगल्या मुहुर्तीं, सुवेळीं.

७३. शादमानी=कुशल, खुशाली.

७४. बिल-फैल=आतां, सांप्रतकाळीं.

७५ पैरवी=पाठलाग, उद्योग.

७६. चंद-रोज—कांहीं दिवस.

७७. मखफी, मरूफी=गुप्त, आंतला.

एक तरफ लढाई पाडावी असें त्यांणीं मोकरार केलें आहे. त्यास आपले कायम-मिजाजीवर[७८] नजर देऊन करारापमाणें इकडून अमलांत येत आहे. आपणाकडोन-ही अमलांत येईल. करारास जिनेहार[७९] कसूर येणार नाहीं हें यकीनें[८०] आहे. जानो-बैनें[८१] जुदागी नाहीं. याजकरितां इकडील कैफियत कलमी केली असे. कृष्ण-राव नारायण यांस दोन हजार स्वारांनिशीं जलद रवाना करावें. फरांशिसांचीं सत्तावीस जहाजें मोरीसें[८२] बंदरास येऊन येथूनही निघालियाची खबर आली. आपणास मालूम व्हावें याजकरितां कलमी केलें असे. म्हणोन आं साहेबांनीं मुफ-सल[८३] मरकुम[८४] केलें तें जाहीर जालें. जुनाचे भोसले बंगाल्यांत जाऊन इंग्रजांचे सरहद्देवर पोंहचले. तेथून इकडे पैदरपै[८५] पत्रें पाठवितात कीं, इंग्रजाचे मुलखांत ताख्त-ताराजी[८६] केल्याचें वर्तमान जलदीनेंच येऊन पोंहचेल. ऐसें लिहितात. याजकरितां कांहीं देणें घेणें करून इंग्रजांशीं सलुख करून घेतील ऐसें कयासांत[८७] येत नाहीं. आलीकडे यांनीं ताख्त-ताराजी केली ऐशी खबरही आहे. लाकीन[८८] भोंसले यांजकडोन पत्रें आलीं नाहींत. तीं आलियावर आंसाहेबांस इतल्ला[८९] केला जाईल. नबाब निजाम अल्लीखान बहादूर यांचे सल्लाहानें इंग्रजांचे तंबीचा नक्षा ठहरला, ऐसें असतां मिस्तरास[९०] लावून ठेविलें आणि मसलतीस नमूद ताहाल[९१] होत नाहीं. येविशीं सरकारांतून नबाब मौसुफ यांसि लिहिलें होतें त्याचें उत्तर आलें कीं, इंग्रजांचा वकील असल्यास काय *मुजाका ? दौलत आहे तेथें वकील असतच आहेत. लाकीन राव पंडित प्रधान यांसि करार केला त्यांत कसूर ‡सरेमो याव-याचा नाहीं. त्यास इकडूनही त्यांजकडे वरचेवर लिहिलें जातें कीं, करारापमाणें सिकाकोलीकडे जलदीनें नमूद व्हावें. जनराल कूट याणें मोंगलाचा व श्रीमंताचा सल्लाह करून घ्यावा याजप्रमाणें मोकरार केलें आहे. म्हणोन आं साहेबीं कलमी केलें. त्यास इंग्रेज जात हरामजादी व कौबूकार[९२] व मकरफरेबें[९३] फार जाणतात.

---

७८ कायम-मिजाज=दृढ-चित्त, दिलाचा खंबीरपणा.

७९. जिन्हार=कधींही.

८०. यकीन्=निश्चित.

८१. जानो-बैन=जाने बैन=दोन्ही बाजू, तरफैन.

८२. मोरीस=मोरिशस बेट.

८३. मुफस्सल-तपशीलवार.

८४. मरकुम करणें-लिहिणें. मरकुम=लिहिलेलें.

८५. पैदरपै=वरच्यावर, एकामागून एक.

८६. ताख्त ताराजी-हल्ला करणें व लुटणें; धामधूम करून नासधूस उडविणें.

८७. कयासांत=विचारांत

८८. लाकिन्-लेकिन्=परंतु, तथापि.

८९. इतल्ला-खबर.

९०. मिस्तर=इंग्रजांचा वकील.

९१. ता-हाल-हा कालपर्यंत.

* मुजाका=हरकत, दोष.

‡ सरेमो=सरे-मू-डोकीचा केस, किंचित्, थोडाही.

९२. काबू-कार=संधि-करणार, संधि शोधणार, छिद्रान्वेषीतें.

९३. मकर-फरेब-दगलबाजी व लुच्चेगिरी.

हरएक जागां इतिफाकांत निर्फाक पाडोन तर्रफैन दिलांत षुभः पाडतील याचा बयान मुफसल पेशर्जी आं मेहरबांस लिहिण्यांत आलाच आहे. दरीविलीं यांणीं चाल याच बमोजिब धरिली आहे. परंतु सरकारांतून जे गोष्ट करारांत आली तेच मंजूर. ये बाबे आपणांस खातर जमा पक्की आहेच आणि असों द्यावी. फराशिसांचीं सत्तावीस जहाजें सोरसाहून निघालीं तेव्हां लौकरच येतील. ते आलियानें इंग्रजांची तंबी बवाकई अमलांत येईल. मेहेरबान कृष्णराव नारायण यांची बमय फौज रवानगी करण्याची ढील नाहीं. लाकीन कितेक मरातीब मसलतीचे आं साहेबांसीं बोलावयाचे आहेत याजकरितां येतजात दोस्तो नूरमहमदखान यांणीं अगर नरसिंगराव यांणीं हमराहा कृष्णराव नारायण यांचें आलें पाहिजे. ये बाबे आं साहेबांस इतल्ला केला आहे त्याचे जबाबाची इंतजारी आहे. जाब लौकर यावा. बमय फौज येऊन पोहचतील. याजप्रमाणें नानांचे नांवें हैदरअल्लीखान यांस पत्र.

[ ४७७ ] श्री.

( पौा छ ५ सफर सुाासन सबा )

पुा राजश्री महादाजी प्रभू गोसावी यांसि--

उपरि मुंबैकडील बातमी वर्तमान पेशर्जी लहून गेलें आहे. याजवरून कळलेंच असेल. सांप्रत राजश्री आबाजी महादेव हवणेहून मुंबईस येऊन गडबड फारच मांडली आहे. फिरंगी तरांडी कांहीं मुंबईचे बंदरांत आलीं. आणखी चार पांच हजार गौडदी व इंग्रज तरांडियावर सामान सरंजाम मबलग चढवायास लागला आहे. म्हणोन सावकारी बातमी आहे. येथोन कोण्ही तथ्य बातमीस पाठवून बातमी आणावी त्यास इकडील माणूस एकंदर बंदरांत घेत नाहीं. आणि परस्पर वर्तमान याप्रमाणें येतें. तेव्हां कोण्हेसमयीं कोठें तोंड टाकील हें न कळे. टोपीकरांचा विश्वास नाहीं. त्यांत त्यांचे चित्तांतील गुबार फुटत नाहीं. यास्तव आपले जागां फार सावध असलें पाहिजे. याजकरितां राजश्री

---

९४. इतिफाकांत निफाक पाडून -ऐक्यांत अंतर आणून.

९५. तरफैन दिलांत=तुमच्या आमच्या चित्तांत.

९६. षुभः=षुबह अंदेशा, भीति.

९७. दरीन्विला=ह्या दिवसांत.

९८. ब-वाकई -त्याप्रमाणें.

९९. ब मय-फौज=फौजे सुद्धां.

१००. हमरहा=बरोबर, सह.

१. इंतेजारी -खोळंबा, वाट.

२ तरांडीं गलबतें.

३. पुढील एक शब्द खोडून नीट केलेला आहे तो लागत नाहीं. 'अरब' सारखा दिसतो.

४. एकंदर-बिलकुल, अगदीं.

५. तोंड टाकील-हल्ला करील.

६. गुबार=वावटळ, हेतु ह्या अर्थी.

बापूराव व राजश्री नाना फडणवीस यांचे कर्णारूढ करून उभयतां × × × × पत्र राजश्री भीवराम पानसे व राजश्री विसाजीपंत बाबा यांस घेऊन पाठवावीं. त्यांत मजकूर इंग्रजानें कांहीं दुर्बुद्धि धरून कुलाबा तर्फेस गडबड गेली तरि तुम्ही फौज सुद्धां बिलाशक जाऊन सरखेलीस सामील होणें. तुह्मांस बातमी न लागली आणि सरखेल कडून तुम्हांस सूचना जहाली तरि येक घडीचा अवकाश न धरितां स्वार होऊन जाऊन कुमक करणें. व धुळपास पत्र कीं, जंजिरे खां देरीस इंग्रज जाणार म्हणोन बातमी आहे. त्यास तुम्हांस बातमी लागतांच जंजिरे मजकुरीं आरमार सुद्धां जाऊन सामील व्हावें. अथवा सरखेलचें पत्र जाऊन पावतांच निघोन जावें. कदाचित वारें वादळाचे सबबेनें आरमार जाऊन न पोंहचे तरि आरमार विजयदुर्गाचे खाडींत रवाना करून तुम्हीं खुषकीनें फौजसुद्धां जंजिरे कुलाबा जाऊन कुमक करणें. याजप्रमाणें पत्रें जलद घेऊन पाठवावीं. व अवांतर तालुके तालुक्यास सदर्हू अन्वयें पत्रें घेऊन रवाना करावीं. व पेशजीचे लिहिले प्रमाणें पत्रें आलीं म्हणजे इंग्रजांचे बालीचें तोंड पडोन त्यांचे चित्तांतील भावगर्भ समजेल. याजकरितां पेशजीचे व हल्लीचे लिहिले प्रमाणें पत्रें घेऊन पाठवावीं. हे कामास दिसगतीवर घालवितां नये. अवांतर तालुकियांस पत्रें न ध्यावीं. पानसे व विसाजीपंत बाबा व धुळप यांस पत्रें असावीं. व राजश्री बाळाजीराम ओक याजबरोबर बातमीपत्र लिहिलें आहे त्याप्रमाणें मुरबियांस निवेदन करून उत्तर घेऊन पाठवावें. रवाना छ २८ मोहरम सुा सन सबां सबैन बहुत काय लिहिणें.

मोर्तब सूद.

[ ४७८ ] श्री.

( छ २२ जमादिलाखर इहिदे समानीन. )

आं साहेबीं खत-फरहत-नमत पाठविलें तें नेकवख्तीं पोंहचून षादमानी हांसल जाली. आपण शुतर स्वाराबरोबर शिंदे यांचें खत पाठविलें तें पोंहचलें. लेकीन हें खत निभावणीचें नव्हें येथून पत्र लिहिलें त्याचा जबाब आहे. आम्ही आपले दोस्तीवर नजर देऊन कूच-ब-कूच रवाना होऊन गेलों असों. शिंदे यांणीं निभावणीचें खत पाठविलें म्हणोन पत्रांत लिहिलें तें कोठें राहिलें याची तहकिकात करून पाठवीतसें करावें म्हणोन कलमी केलें. चुनाचे आं मेहरबाकडोन खत येऊन पोंहतांच शिंदे यांजकडे शुतर स्वाराची जोडी रवाना करावी तों इतकियांत शिंदे यांजकडून निभावणीचें खत रवाना करावयाचें राहिलें होतें तें

७. सरखेल=आंग्रे ( कुलाब्याचे )

८. आनंदराव धुळप देवगडचे.

९. मुराबियास, मुरब्बियास=वस्ताद, माहितगार, यास.

१०. षादमानी हांसल झाली=कुशल विदित झालें, समाचार कळला.

११. शुतर-स्वार-उष्ट्र-सादी.

१२. तहक्किकात-खरी हकीगत.

मशारनिले यांणीं पाठवून दिल्हें. हल्लीं आं साहेबाकडे पाठविलें आहे. पोंहचेल. खताची इंतेजारी[13] न करितां एखलासावर[14] नजर देऊन कूच-ब-कूच बेंगरुळाचे रुखें आं मेहरबांचें जाणें जालें. त्यास दोस्तीस लाजम व मसलहतीस मुनासब व दानाई[15] व दूरंदेशीस[16] नेक[17] तेंच अमलांत आलें. करारांत व बोलण्यांत जे गोष्ट आली त्यांत इकडून दुसरा अर्थ होवयाचा नाहीं. येविशीं खातरजमा असावी. खुलस[18] करार-बमोजीब सरकारांतून कोणताही गुंता राहिला नाहीं. आं साहेबीं बेंगरुळावर मुक्कामांत न होतां जलद मुखालिफाचे[19] तालुकियांत पोंहोचून मुलुख ताख्त व ताराज करावा. व इंग्रजांस आयास[*] आणून तंबी वाकई[20] अमलांत यावी, व कृष्णराव नारायण वगैरे यांची रवानगी इकडे जलद व्हावी. आं मेहरबां करार-बमोजीब अमलांत आणतील, या बाबे दोस्तदाराची खातर जमा आहे. बाजे मरातब राव मशारनिले यांस कलमी केले ते बयान करतील त्यावरून वाजे होईल. म्हणोन नवाब हैदरअल्लीखां बहादूर यांस हिंदवी नानांचे नांवें हिंदवीपत्र.

**[ ४७९ ]** श्री.

तुह्मी छ २० माहे जिल्हेजचें पत्र पाठविलें तें छ २२ माहे मोहरमीं पावलें. सविस्तर मजकूर लिहिला तो समजला. त्याचीं उत्तरें व इकडील मजकूर राजश्री बाळाजी जनार्दन यांणीं लिहिला त्यावरून कळेल. मेवा[21] सेवें[22] दाणे[23] पंधरा पेटारी[24] एक पाठविली ते पावली. तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणें म्हणोन पुरषोत्तम महादेव हिंगणे यांस सरकारचें पत्र.

**[ ४८० ]** श्री.

( मुंबईवाल्यांस पत्र पाठविलें त्याचा मसुदा )

( छ १० जमादिलाखर श्रावण सीतसबैन )

दरींविलों[25] रफआत[26] व अवाली-मंजलत[27] येतीजाद दोस्तां मेस्तर होष्टैनें[28] यमादुदौल्ले[29] जलादत-जंग[30] बहादूर यांचीं दोन पत्रें एक छ ७ रविलाखर व दुसरें छ ९

---

१३. इतजारी, इंतेजार—वाट, खोळंबा.
१४. एखलास=स्नेह, मैत्री.
१५. दानाई=शहाणपण.
१६. दूरंदेशी=दूरदृष्टि.
१७. नेक=चांगलें.
१८. खुलस=सारांश.
१९. मुखालिफ=शत्रु.
* आयास=जेरीस.
२०. वाकई=त्या प्रमाणें, यथायोग्य.
२१. मेवा=फळें.
२२. सेंव, शेव=फलविशेष.
२३. दाणे=नग, डाग, संख्या.
२४. पेटारी=पेटारा. पेटारी नांवाचें एक झाडही आहे.
२५. दरीन्विला=ह्या दिवसांत.
२६. रफआत=अत्युच्च.
२७ आवाली-मंजलत=उंच पदाचे.
२८. मेस्तर होष्टैन=मिस्तर हेस्टिंग तर नव्हे ? पण वर "मुंबईवाले" असें म्हटलें आहे.
२९. यमाद्-उद्-दौला=राज्य-धुरंधर.
३०. जलादत्-जंग=रण-शूर.

रबिलाखरचीं अमारत[31] व अयालत[32] मरतबत[33] मदारुल मोहाम सखाराम पंडित यांचे नांवें बंगालियाहून आलीं त्याची नक्कल दोन्ही खतांची मजमून[34] एकच आहे, त्याप्रमाणें नक्कल करून पाठविली असे. अलबतामा ई ज इ बालेले याचा नविस्तां[35] आं अवाली-पन्हाहास[36] ही आलाच असेल त्यांच्या नविस्त्या वरोन आम्ही आपल्या सरदांस तुह्मी आपले फौजेचा बंदोबस्त केलाच असेल. ख तु तें पाठविलें कीं, तुह्मी होऊन इंग्रजांशी लढाईचा मुकदमा दरपेश[37] न आणणें व बंगालियाचे पत्राचें उत्तर पाठविलें असे. या मजकुराचा इतल्ला आं अवालीपनाहास व्हावा म्हणून कलमी केलें असे. आमचे सरदार गुजराथ प्रांतें वगैरे सरकार अमलीं अम्मल मात्र बसवितील. लढाईचा मजकूर आपल्याकडून हरगीज करणार नाहींत. पुढें इरादा आं अवाली-पन्हाहाचा काय असेल तो लिहून पाठवावा. त्या प्रमाणें इकडूनही अमलांत येईल.

[ ४८१ ] श्री.

( छ ११ जमादिलोवल )

श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेशीं.

विनंती सेवक सोयराजी अवधूत कृतानेक साष्टांगनमस्कार विनंती विशेष विज्ञापना ता। छ २९ माहे रबिलाखर स्वामींचे कृपावलोकनें करून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे विशेष. सरकारचें आज्ञापत्र सेवकाचे नांवें सादर जालें कीं, तुम्हांस मकर-संक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले असत ते घेऊन स्वीकार करणें म्हणून. त्यास आज्ञापत्र शिरसा वंदन करून शर्करामिश्रित तीळ अत्यादरें सेवकानें स्वीकारून अमृतलाभातुल्य आनंद होऊन सेवक सनाथ जाला. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना.

[ ४८२ ] श्री.

आज्ञापत्र राजश्री पंतप्रधान ताहा मोकदम देहाये पैकीं पारनेर भिसूर सुरूसन समान समानीन मया व अल्लफ राजश्री नारायणराव ढमढेरे याजकडे फौजेचे बेगमीस सरंजाम परगणे मजकूर पैकीं मोकास बाबेचे गांव बि॥:—

| | | |
|---|---|---|
| ॥. प्रां पारनेर निमे. | १. मौजे बाबुर्डी गुमट. | १. मौजे आपधूप. |
| १. „ डोंगरगण. | १. „ निंबलक. | १. „ गटेवाडी. |
| १. „ दाहिठण गुंजाल. | १. „ टांकळी. | १. „ हिवरे बाजार. |
| १. „ मुगसी. | १. „ हमीदपूर. | १. „ भोदरे. |

---

३१. अमारत् प्रधानत्व.
३२. अयालत्=वर्चस्व.
३३. मर्तबद्=पद.
३४. मजमून्=मजकूर.
३५. नविस्ता=पत्र, लेख.
३६. अवाली-पन्हा=उच्चपदाचे आश्रय.
३७. दरपेश=पुढें.

| | | |
|---|---|---|
| १ मौजे गाजदीपूर | १ मौजे करनूळ खेरें | १ मौजे दळवें खुर्द |
| १ „ जांबगांव | १ „ घाणेगांव | १ „ हिवरें कोर्डी |
| १ „ नोंदूर पठार | १ „ धोत्रें खुर्द | १ „ वडगांव जावळी |
| १ „ शाहजापूर | १ „ पाडळी | १ „ पिंपळगांव रोठा [!] |
| १ „ शिरोळें आडबई | १ „ भोईरें खुर्द | १ „ करनूळहोर |
| १ „ हिंगणगांव | १ „ निंबगांव धाणा | १ „ भडगांव |
| १ „ भोईरें बुद्रुक | १ „ कालकुंद | १ „ धोत्रें बुद्रुक |
| १ „ निंबगांव धाणा | १ „ ढोंकी | ११ |
| ११॥ | १२ | |

३४॥

एकूण साडे चौतीस गांवचा अमल पेशजी पासोन चालत आहे. त्याप्रमाणें करार असे. तर मा॥र निलेचे कमावीसदाराशीं रुजू राहून देहाये मा॥रचे मोकास बाबेचा अमल व जकात सुदामत चालत आल्या प्रो॥ सुरळीत देणें. जाणिजे. छ. २७ साबान.

[ ४८३ ] श्री.

रवाना छ १ सवाल सन समानीन.

सरकारचा व तुमचा तहाचा ठराव महादजीराव शिंदे व रावरास्ते व कृष्णराव बल्लाळ यांचे मार्फत नरसिंगराव तुम्हांकडील वकील यांसि बोलोन जाला. त्याची याद करार करून अहाद[३८] शर्तीनशीं कृष्णराव नारायण व शिंदे यांजकडील गृहस्थ व रावरास्ते यांजकडील गोविंद नारायण व गणेश केशव यांजबरावर पाठविली आहे. करारांप्रमाणें तुम्हांकडून निभावणींत यावें. सरकारांतूनही कैरारबमोजीब[३९] अमलांत येईल म्हणोन हैदर अल्लीखां बहादूर यांस सरकारचें पत्र. सरकारचा तुमचा सलुख जाला इतःपर दुसरा विचार नाहीं.

[ ४८४ ] श्री.

रा॥ छ ७ सवाल इहिदे समानीन.

आं मेहरबांनीं तिमरी व कावेरीपाक येथें ठाणें घालून अर्काटचे मुक्कामाचें खत[४०] पाठविलें होतें तें पोंहोंचलें. त्याबाद पंधरा रोजांचा अरसा[४१] गुजरला लाकिन् तिकडील कैफियतें[४२] व आपली खैरियेतें[४३] इतल्ला[४४] होत नाहीं. सबब इंतजारी[४५] असे.

---

३८. अहाद-शर्ती=अटी.
३९. करार-बमोजिब=करारांप्रमाणें.
४०. खत=पत्र.
४१. अरस्सा=अवकाश, काल.
४२. कैफियत=हकीगत.
४३. खैरियत=समाचार.
४४. इतल्ला होणें=कळविली जाणें.
४५. इंतेजारी=प्रतीक्षा, खोळंबा.

त्यास मुखालिफ कोणे ठिकाणीं, व जमीयेत किती जमा झाली, आइंदे त्यांचा इरादा व तर्दुद काय आहे, हे अखबारेवरून आंसाहेबांस रोजबरोज मालूम होतच असेल. त्या बमोजीब दोस्तदारांसही मुतवातेर कलमी करीत असावें. मुखालिफांवर आंमेहेरबांची तदबीर दीनबदीन गालब व मजबूत पडावी व हे अखबार पैहोमें इकडे येत असावी, या गोष्टीची दरखास्त बहुत आहे. इकडील सर्व तयारी जाली आहे. बाद दसरा सरदार व फौजा मुखालिफावर नमूद होतील. कर्नेल गाडर मुंबईस आले त्याचीही तयारी. येविशींचे मरातिब औतजात दोस्तां नूर महंमदखां व नरसिंगराव लिहितील त्यावरून वाजेह होईल. म्हणोन हैदरअल्लीखा बहादूर यांस नानांचे नांवें हिंदवी पत्र.

आहे बाददसरा मुकाबिल्यास आल्यास होईल तें जहुरांत येईल.

[ ४८५ ] श्री.

उभयतांचे नांवें हैदरखानास छ १० सन.

आंअमारत, पन्हानीं मेहेबतनामा अंबरीशमामा इबलाग केला तो बेरव-क्त पोंचला व सदाकतअतवार नरसिंगराव तमाजी मोहिबांकडून पारचे घेऊन आले ते पोंहचून मोमिइले यांणीं कितेक वजे दोस्तीचे इरादे जाहिर केले ते मालूम होऊन बहुत खुशवख्ती जाहाली. साहेब मेहरबान दोस्तां लक्ष्मणराव रास्ते हुजूर येऊन यांणीं व नरसिंगराव मोमिइले यांणीं मोहिबा-कडील कितेक मुकदमे ईजहार केले ते अयां जाले. लेकिन आं अमारत-पन्हाची व खुदावंद न्यामत पंडित प्रधान साहेबांची दोस्ती मुस्तकीम होऊन दीनबदीन जादा चालोन दोस्तीची तरक्की व्हावी हे तर्फेनें बजा आहे. बील-

---

४६. मुखालिफ=दुष्मन, शत्रु.
४७. आइंदे=पुढें.
४८. मुतवातिर=एकसारखें, वरचेवर.
४९. तदबीर=युक्ति.
५०. गालब=जिंकणारी.
५१. मजबूद=दृढ.
५२. पैहाम=पैदरपै=वरचेवर.
५३. दरखास्त=जरूरी, अवश्यकता.
५४. बाद-दसरा=दसऱ्यानंतर.
५५. जहुरांत येईल=दिसण्यांत येईल, दृष्टीस पडेल.
५६. महबत-नामा=मैत्री-पत्र.
५७. अबरी-शमामा=अंबरासारखा सुवासिक.
५८. इबलाग करणें=रवाना करणें.
५९. बरवक्त=वेळीं, योग्य काळीं.
६०. सदाकत-अतवार = सत्य-गुण-विशिष्ट.
६१. मोहिब=मित्र, दोस्त.
६२. पारचे=पत्र.
६३. मोमिइले=मशारनिल्हे, वर लिहिलेले.
६४. वजे=रीति, मार्ग.
६५. इजहार करणें=स्पष्ट करून सांगणें, जाहिर करणें.
६६. अयान्=ज्ञात, कळलेले.
६७. तरक्की=सुधारणा.
६८. तर्फैन=दोन्ही पक्षांस.
६९. बज्या=बरोबर, करण्यास योग्य.

फैल लक्ष्मणराव मोमिइले यांस कुल कैफियत जाहीर केली आहे. ते नरसिंगराव तमाजी कलमी करतील ते दर्याफ्त करून मुकदमा अमलांत येणें, हें मसलतीचे जागां नेक आहे. हमेशा किताबत पाठवून दीलैंताजगी करणें दोस्तीचे जागां लाजम असे.

[ ४८६ ] श्रीगजानन प्रसन्न.

छ २१ जमादिलावल.

यादी सरच्यार्लिस वार मालीट इंग्रज वकील कलकत्तेकर यांजकडील उंट जरूर पंचवीस सुरत प्रांत गुजराथ येथून पुणियासि येत आहेत. यांसि जकातीचा उपसर्ग न लागतां पुणियासि येऊं देणें म्हणोन रहदारीचे सुरुसन खमस तिसेन.

सदर्हूप्रमाणें रहदारीचे दस्तक देवावे. देणें. छ २२ जमादिलोवल सन खमस तिसैन मार्गशीर्ष.

[ ४८७ ] श्री.

छ २५ मोहरम सन इहिदेसमानीन पौषमास.

आं साहेबीं खत फरहत नमत इबलाग केलें ते बैंसातनेक पोंहचून शादमानी जाली. इंग्रजाची फौज गारत जाली. हे खबर पोंहचतांच जनराल कूट भारी जमावानशीं चेनैंपट्टणास आला. इकडील बंदरावर मुखत्यार व जंगी सामानाची तयारी करीत आहे. इंग्रजांनीं नागपूरचे भोंसले यांसि मैंकफी जावसाल बोलोन सलुख करून घेतला. मोंगलाकडे तो मातबर फिरंगी जाऊन दारमदार जालाच आहे. कूट मजकूर चेनापट्टणास आल्यावर मुंबईकर व गाडर यांस कोणेही वैंजेनें श्रीमंतांशीं सलूख करून तिकडील सरंजाम इकडे घेऊन येणें ऐशीं खतें लेहून जाहाज रवाना केलें म्हणोन चेनापट्टणची बातमी आली. जनराल मजकूर चहूंकडील जमियेत जमा करून मोकाबिल्यास निघणार, खुदाचे फजलेकडून त्यांची तंबी होईल ते जहुरांत येईल. इंग्रज मैंकरी कौंबूतलब त्यांचे चालीस वाकफ असां. येथून ल्याहावें ऐसें नाहीं. कर्नाटकगड वगैरे कितेक गड किल्ले व महमद अल्लीखांचा भाऊ अबदुल वहाबखां दैंस्तगीर जाले. अमदाबाद वगैरे मुलूख सोडून देऊन दरोबस्त इंग्रजी जमाव घेऊन जलद

---

७०. दर्याफ्त=चौकशी.

७१. दिल ताजगी=अंतःकरणाचा ताजेपणा, संतोष.

७२. बसाअत-नेक=सु-समयीं.

७३. चेनापट्टन=मद्रास.

७४. मखफी=गुप्त.

७५. वजा=रीत, मार्ग.

७६. मकरी—विश्वासघातकी.

७७. काबूतलब=संधि सोधणारे.

७८. दस्तगीर=हस्तगत.

येणें या मैंजमूचें खत व दुसरें जाहाज गाडराकडे कूट मजकूर यांणीं रवाना केलें. लढाईचा आँजम् मुकरर केला आहे. तिकडे खाली मैदान रहात आहे. सबब सुरत वगैरे मकाणें व बंगाल्याकडे भारी पायबंद बसे ऐसें करावें. कृष्णराव नारायण याजबराबर दोन हजार स्वार देऊन इकडे पाठवावे. बाकी मरातब नूर महमदखान व नरसिंगराव सांगितल्यावरून मालुम होईल. ह्मणोन कलमी केलें. चुनाचे, जनराल कूट इकडील बंदरावर मुख्त्यार, तो जमाव सुद्धां चेनापट्टणास आला, व चार्लस ईंस्मत जनराल ही नवा जाला, हे अखबर सरकारांत आली होती. त्यावर हरदो मशारनिले यांचीं पत्रे सरकारांत आलीं कीं, आम्ही चेनापट्टणास आलों. आपली दोस्ती चाहातों. त्यास कोण्याही बंदरास जनराल नवा येतो तो अव्वल सरकारांत खत पाठवीत असतो व कोणाचेंही खत सरकारांत आलें तरी त्याचा जवाब द्यावा हा कदीमापासोन शिरस्ता, सबब त्याचे खताचा जाब दिल्हा. त्यांत मजमू, नेकी दोस्तींत खैलश कोणीकडून हें जाहीर आहे. याची इतल्ला पेशजी आंमेहरबानांस निंगीरष केलाच आहे. भोंसले स्वराज्याचे सिकैंमांत तेव्हां मकैफी सलुख करून घेतील हें कयासांत गुजरत नाहीं. थोडेच आरशांत बंगाला गारत केल्याच्या खबरा आपल्यास पोंहचतील, ऐसें हमेश भोंसले सरकारांत लिहितात. इकडूनही हे शैंकल जलद नमुदास यावी म्हणोन पत्रें जातात. इंग्रजाचे तबीचा नक्षा नवाब निजामअल्लीखां बहादूर यांचे सल्लाहानें ठरला. सालगुदस्तां अदवनीच्या मंझेलींमुळें नमूद न जालें. मंझेला फैसल जाला तों बरसात सुरू जाली. बादबरसात आजम् करतील ऐसें होतें. बरसात गुजरली, तांहाल निघणें होत नाहीं, व मिस्तर हालन यास लावून ठेविलें सबब सरकारांतून त्यास लिहिण्यांत येतच आहे. हल्लीं आपलें खत पोंहचल्यावरही निकडीनें नवाब मवसुफ यांस लिहिलें आहे, व कोण्ही मातबरही त्यांची मिज़ाज दर्यीफ्त करण्यास रवाना करण्यांत येईल. जनराल कूट याणें अलबता मंबईकर व गाडर यांजकडे जाहाजें पाठविलीं असतील. इंग्रज मकरफरेब बहुत जाणतात. हरएक जागा इत्यफाकांत जूदाई आणोन आपली गुरबैत व

---

७९. मजमून्=मजकूर.

८०. आजम् आज्म=इरादा, हेतु.

८१. चारलिस-इसामित=चार्लस स्मिथ Charles Smith.

८२. खलश=अडथळा, विरुद्धता.

८३. निगारष् करणें=लिहिणें.

८४. शिकंमांत-पोटांत.

८५. मखफी=गुप्त.

८६. शकल=पैलू, तोंड; विचार.

८७. मंझेला=तंटा, भांडण.

८८. मिज्राज् दर्याफ्ती=( मर्जीची चौकशी ) मानस कसा आहे तो पहाणें.

८९. गुरबत=गरीबी, दैन्य.

रास्ती दाखवून खुष्कीचे दौलतींत दखल करीत चालिले. याच चालीनें तरफैन दिलांत शुब: आणतील, याचे बयान मुफसल पैहाम आंसाहेबांस कलमी करण्यांत आले व आंमेहरबांही त्याचे रवय्यास खूब वाकीफ. खुलस दुनयाईंत नितक्या तमा व तवक्याच्या शकला आहेत त्या इकडे व तिकडे बहुताद हल्लीं व आईंदे दाखवितील. हर तदबिरें निफाक पाडावयास कसूर करणार नाहींत. लेकीन सरकारांत जे गोष्ट करारमदारांत आली तेच पक्की व मंजूर आहे. दुसरी शक्कल दिलांत यावयाची नाहीं. येविशींची खातरजमा साबीकें जाली त्या बमोजीब असावी. दुनयाईंत व दौलतीचे अलमांत कौलकरार अहाद-पैमान हे उमदी चीज आहे. याची हिफाजत केलियांतच दौलतीची सरसबाजी आहे. जेथें वचनांत तफावत तेथें दौलतीची कायमी कशी राहील ! खुदायतआला पैहाम निगा करीत असतो. जेथें सखुनाची पास तेथेंच फजल इलाही, ऐसें समजावें. तरफैनच्या इत्यफाकांत कोणाचें कांहीं चालणार नाहीं व नफेही यांतच आहेत. हें दूरंदेशीनें समजोन इकडील करार बमोजीब कायमी आहे. आंमेहरबांचीही असावी, कोणेही बाबें दिलांत शुब: येऊंच नये. करनल गाडर वसईकडे आला. त्यास किल्याची मजबुती पक्की व सरंजाम पोक्त, फौजा उपराळ्यास जाऊन पोंहोचल्याच होत्या. तशांत मारगिरी व लढाई सुरू होतां किल्लेदार याणें हरामखोरी करून मकाण त्यांचे हवालीं केलें. आपण निघोन जात असतां सरकारची दौड जाऊन दस्तगीर करून आणिला. हरामखोरास फैलाबमोजीब सज़ा होईल. लेकीन मकाण मुखालिफाचे कबजांत तूर्त गेलें. इनशाआलाहोताला तरफैंच्या एक दिलींत मुखालिफाची शिकस्त होऊन सर्व खातरखां होईल. मुजाका नाहीं. इंग्रजाकडील केसो कृष्ण दातार कांहीं पलटणें व तोफा व स्वार जमाव सुद्धां खानदेशांत हंगामा करीत होता त्यांचे तंबीवर गणेशपंत बफौज होते. दरींविला रावमेहरबान तुकोजीराव होळकर मैजमीयेत त्या जिल्ह्यांत आले. त्याजकडील कांहीं फौज व गणेशपंत बेहरे एक होऊन त्यांशीं लढाई केली. तीन प्रहर पावेतों

---

९०. दखल करणें=हात घालणें.
९१. खुलस=सारांश.
९२. बहुताद=पुन: पुन:
९३. निफाक=शत्रुत्व.
९४. साबिक=पूर्वी.
९५. अहाद पैमान=वचन, करार.
९६. हिफाजत=संरक्षण.
९७. सरसबाजी समृद्धि.
९८. खुदायत आला=सर्वशक्तिमान् ईश्वर.
९९. निगाह करणें=पाहणें.
१००. सखुनाची पास = (शब्दाचा+मान) वचनाप्रमाणें चालणें.
२. फैला=कृत्य, कर्म.
३. खातरखा=आपल्या इच्छेप्रमाणें.
४. मुजाका=हरकत, इजा.
५. मै-जमियत=जमियतीसुद्धां.

लढाई जमली. अखेरीस सरकारचे फौजांनीं चालून घेऊन पलटणें गारत केलीं तोफा व हत्ती घोडे व बंदुका वगैरे कुल जिन्नस लुटीस आला. चंद्रराव पंवार सरदार त्यांकडील ठार पडला. जातीनिशीं केसोपंत पहाडांत पळून गेला. आइंदे गणेशपंत व होळकरांकडील कांहीं फौज पेंढार कुल सुरतेकडे ताख्त-ताराजी करण्यास रवाना करविलें. होळकर मैफौज हुजूर आणविले. जलद-च येतील. मेहरबान हरीपंत हुजुरात वगैरे फौज सुद्धां कोंकणांत गाडराचे मुकाबिल्यावर आहेत. जागा अडचणीची सबब मैदानांत काढून लढाई घ्यावी या तदबिरेंत आहेत. कोंकण व सुरतेकडे पायबंद असतां गाडर हे मसलत सोडून निघूं पावणार नाहींत. जनराल कूट जमाव करितो, मुकाबिल्यास आ-ल्यावर मैदानांत आंसाहेबांपुढें ठरणार नाहीं. बफजलइलाही नतीजाच पोंहो-चेल. मेहरबान कृष्णराव नारायण यांची रवानगी आंसाहेबाकडे केली. फौज रवाना करण्याची तयारी होत आहे. अनकरीब रवाना होईल. येविशींचे मरा-तब ऐतजात दोस्तां नूर महमदखान व नरसिंगराव कलमी करतील त्यावरून जाहीर होईल. म्हणोन हैदर अल्लीखां बहादूर यांस पत्रें हिंदवी.

[ ४८८ ] श्री.

राजश्री कावेरी राजे संस्थान वो म रा ज पा ळे गोसावी यांसि—

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य—स्नेहांकित बाजीराव रघुनाथ प्रधान आशीर्वाद उपरी येथील कुशळ जाणोन स्वकीय कुशळ लिहीत जाणें. विशेष. चिरंजीव राजश्री चिमाजीआपा यांचे लग्नाचा निश्चय जेष्ठ वद्य नवमीस केला आहे. तरि तुम्ही लग्नसमारंभास निघून येणें. जाणिजे छ १४ जिल्हेज सुरूसन समान तिसैन मया व अल्लफ. बहुत काय लिहिणें. [ लेखन सीमा. ]

[ ४८९ ] श्री.

आं अमारतपन्हानीं कितावत ईरसाल केली ते उसुल होऊन मजमून मा-लूम जहाला. ऐशास बंदेगानअल्ली राऊ साहेब पंडित प्रधान साहेबांचे दौल-तींतील कितेक खिसा लिहिला तरि जागा जागा हरएक बखेडे जालियास सहजांत बंदोबस्त होऊन येतात. सरकार तर्फेचे सरदारांहीं हिंदुस्थान प्रांतीं तमाम बंदोबस्त अंमल बसवून पादशाहातीचे बंदोबस्त करीत आले. बिल-फैले इंग्रज वगैरे उमेद धरून येतात त्यांचाही बंदोबस्त सरकारचे सरदार आहेत तेच करतील. अंमा बंदेगान अल्लीच्या दौलतींतील खिसे मोहिबी

---

६. नतिजाच पोंहचेल=फळच भोगील.
७. इरसाल करणें—पाठविणें.
८. उसुल=पावणें, घेणें.
९. बिल-फैल—सांप्रत.
१०. अंमा=परंतु.

इशारे बकरार बयादवार कलमीकारितां हे दांना दूरंदेश असतील त्यास लाजम नसे. लेकिन इंग्रजाकडील पलटणें व कौसलदार येतील त्यांस पोहोंचवून द्यावे लागेल म्हणोन इशारा केला. त्यास जे सरकारचे फितुरी ते तुमचे फितुरी असतां त्याची सरबरा होते. इहताजुबजमाजे होठेवर आहे त्याचा फायदा जहाला तो अलम-रोषन् आहे. ज्यानब या प्रांतीं येऊन मोहिबाचे मुलखास उपसर्ग अद्याप न केला. हल्लीं कौंसलदार तुम्हीं पोहोंचून देणार तुमचे मुलखाची तालुक्याची खराबी होईल कीं आबादी राहील हे दिलांत दूरंदेशीनें जाणावें.

[ ४९० ]          श्री.

याद इंग्रजाचे ता॥ गडकिल्लेस ठाणा घातल्याचीं तपशील.

| | | |
|---|---|---|
| १ चंगमचा किल्ला. | १ पोळूरचा किल्ला. | १ त्रिणामलचा किल्ला. |
| १ सुलभगड. | १ तिमरायगड. | १ रावतनलूरगड. |
| १ धोबीगड. | १ चेतपटचा किल्ला. | १ आरणीचा किल्ला. |
| ३ | ३ | ३ |

[ ४९१ ]          श्रीगजानन.

श्रीमंत कैलासवासी भाऊसाहेब मांडवगणाहून निघोन पाडळीच्या मुक्कामास स्वारी आली. तेथून मांझे नांवें आज्ञापत्र व दोन जासूदजोडया करवीराकडील दीनचर्येची बातमी समजण्याकरितां पाठविले. तेथपासून बातमी दीनचर्येची ज्या ज्या कारणाची पाहिजे ती ती बातमी स्वारी सुरापूर व येलबुर्गे वगैरे प्रांत फिरून भाद्रपदमासीं एक वर्षांनीं पट्टणदुडावर फौजसुद्धां मुक्काम झाला. तेथपर्यंत बातमी पोंचविली. कैलासवासी बाळासाहेब यांनीं पांच चार वेळां मिरजेहून लिहून पाठविलें कीं, नारो हरी यांजकडून बातमी करवीर प्रकरणीं जशी पाहिजे तशी आली. मलाही मिरजेहून श्री० कैलासवासी बाळासाहेब यांची आज्ञा बातमी लिहिणेंविशीं जाहलीच होती. परंतु करवीरकरांचा व कैलासवासी भाऊसाहेब यांचा पहिलेपणापासून वैरत्वाचा प्रकार फार वाढलेला, याजमुळें तिकडे बातमी लिहिण्याचा मोठाच अंदेशा. तिकडे बातमी लिहिलीं असें समजल्यावर पारिपत्यास उशीर नाहीं. पेशजीं कैलासवासी भाऊसाहेब मांडवगणास राहिले, हें करवीरकरांनीं मनांत आणून आगळीक केली. भूधरगडचा किल्ला फितूर करून घेतला. करवीरकर महाराज यांची स्वारी तासगांवास

११. दाना=शहाणे.

१२. अलम्-रोषन्=दुनयेस श्रुत.

१३. हीं पत्रें म्ह० पत्र अंक ४५१ पासून तों अंक ४९० पर्यंत रा० रा० जीवनराव चिटणीस पुणेंकर यांजकडून मिळालीं.

१. भाऊ साहेब=परशरामभाऊ पटवर्धन.

२. नारो हरी करंदीकर—परशरामभाऊंचा करवीर येथील बातमीदार कारकून.

येऊन वाड्याचा वगैरे फारच नाश केला. याजमुळेंच मोठा बद्ध कटाक्ष पडला. मी हें कांहीं मनांत न आणितां उमेदवारीच्या भावें *कैलासवासीची फत्ते जाहल्यास माझे सेवेची बूज होईल, यास्तव लिहीतच गेलों. करवीर [ कर ] फौजसुद्धां वेदगंगा, दूधगंगा या नद्या उतरून हमीदवाड्यावर मुक्काम आला. उभयतांचे सैन्यास चार कोसांची तफावत राहिली. दरम्यान नदी नाहीं. कैलासवासीच्या फौजेंत खर्चाचा गवगवा पडून पांढरे मंडळी शिलेदार कांहीं फितूर होता. हें वर्तमान वरचेवर दररोज लिहीतच गेलों. करवीरकरांनीं छापा घालावा ही मसलत करून दोन वेळां उद्योग केला. एक दिवस निघाले तों कांहीं अपशकुन जहाला, यामुळें राहिले. दुसरे दिवशीं आणखी उद्योग करून निघाले, तों पर्जन्य आला. असे दोन वेळां दोन प्रकार झाले. मग छाप्याची मसलत राहिली. नंतर भाद्रपद वद्य ३ शके १७२१ इंदुवारीं अस्तमानीं भोजन करून महाराज कचेरीचे डेऱ्यांत येऊन बसले. तमाम मानकरी व शिलेदार व ¹रत्नाकरपंत वगैरे यांस बोलावून लढाईची मसलत उदईक मंगळवारीं चालून जावें. तिकडील फौज आल्यास लढाई द्यावी. न आल्यास गोटावर चालोन घ्यावें. असें सर्वांचे विचारें ठरून लष्करांत ताकीद झाली कीं, प्रातःकाळीं सूर्योदयास भोजन करून लढाईच्या तयारीनें निशाणाबरोबर चालतें व्हावें. याप्रमाणें बेत झाल्यावर कचेरी बर्खास्त झाली. इतकें होईजे पर्यंत मी त्यांचे डेऱ्यांतच होतों. नंतर आपले राहुटीस येऊन जाहला मजकूर कैलासवासीकडे लिहून पाठविला. पेशजीं छाप्याचा मजकूर दोन वेळां लिहिला होता तसें झालें नाहीं. बेफाम राहूं नये, सावधगिरी पक्की असावी. करवीरकर प्रातःकाळीं भोजन करून फौजेची तयारी करून निघाले. मी आपले राहुटीस भोजन करून निघालों. स्वारी प्रातःकाळच्या तास दिवसास चालती जाहली. मी स्वारीबरोबरच निघालों. आणखी प्रातःकाळीं निघाल्याचें वर्तमान लिहून पाठविलें. ती चिट्टी प्रहर दिवसास जाऊन पोंचली, तोंपर्यंत तिकडील फौजेंत कांहीं तयारीची हालचाल नव्हती. तोफखान्याचे बैल चरावयास गेले होते. व शिलेदार लोकांचें धरणें बसलें होतें. बातमीची चिट्ठी पोंचल्यावर तोफाचे बैल आणविले व शिलेदारांस कांहीं खर्चांस दिलें व कांहीं देतों म्हणून उठविले. मग तयारीची गडबड जाहली. करवीरकरांची स्वारी फौजेसुद्धां दोन प्रहरचे सुमारें निपाणी नजीक गेले. तेथें चार घटका दम खाऊन चालते झाले. निपाणीच्या पुढें पाव कोस जाऊन

---

* म्हणजे परशरामभाऊची.

१. रत्नाकरपंत हा कोल्हापूर संस्थानांत मोठा कर्ता कारभारी होऊन गेला.

उभे राहिले. कैलासवासीच्या लष्करांत तयारी होऊन कैलासवासी आपासाहेब व दाजीसाहेब उभयतां दोन टोळ्यांनिशीं दोहींकडे चालते झाले. पुढें एक ओढा होता त्यांत कांहीं गाडद व पायदळ घालून * * * तोफांची मारगिरी चाललीच होती. करवीरकराकडील पायदळानें नेट करून ओढ्यांतील पायदळावर चालून घेतलें परस्पर गोळागोळी होऊन तिकडील पायदळाचा मोड जहाला. सुमारें शंभर माणूस जायां जखमी झालें. व पंचवीस तीस सुमारें ठार झालें. बाकी सर्व पळून गेले. करवीरकराच्या पायदळानें तोफांशीं गांठ घातली. तोफा पाडाव जाहल्या. आपासाहेबांच्या मोकाबल्यावर रत्नाकरआपा राजाज्ञा व हैबतराव गाइकवाड वगैरे शिलेदार होते. आपासाहेब फौजसुद्धां पुढें चालून आले. करवीरकरांची फौज पुढें जाहली. लढाईचें तोंड लागलें. करवीरकरांकडील धुळोजी पांढरे हे शंभर दीडशें घोड्यांचे सरदार होते, ते ठार जहाले. व रायाजी जाधव पागेकडील सरदार हे घोड्याखालीं आले. तेथें पाव घटका झटपट चांगलीच जहाली. ते समयीं करवीरकरांच्या फौजेंत थोडीशी गलबल होऊन निशाणाचा हत्ती माघारा फिरला. हें वर्तमान महाराज पाठीमागें जवळच होते त्यांजवळ सुमारें तीनशें लोक चांगले होते त्यांनीं पुढें गलबल जाहली हें पाहून, नेट करून पुढें आले. नंतर फिरून सांवर बसला. लढाई होतच होती. इतक्यांत आपासाहेब यांच्या डाव्या हातास दंडाजवळ गोळी लागली. त्यामुळें कांहींसे घायाळ झाले. परंतु शूरत्वाचे अभिमानानें दम धरून पुढें चाल न करितां जाग्यावर उभे राहिले. यामुळें दाजीसाहेब यांचा व महाराज यांजकडील फौजेचा लढाईचा समय आला. इतक्यांत दाजीसाहेब यांजकडील फौज उधळली. त्या फौजेंत कांहीं फितूर होते त्याजमुळें असें झालें. नंतर रत्नाकरपंत आपा व हैबतराव गाइकवाड यांनीं त्या उधळलेल्या फौजेचा पाठलाग केला नाहीं. इकडे लढाईस सुरुवात होत होती. तेव्हां महाराज यांजकडील दोन्ही टोळ्या एकत्र होऊन आपासाहेब यांजवर येण्याचा रोख धरिला. हें आपासाहेब यांनीं पाहून कांहीं माघारे हटले. परंतु दोन चार वेळां माघारे उलटोन पाठीवरील फौज योपून राहून थोडे थोडे हटत माघारे सरले. ते जवळच अमलझरी म्हणून लहानसें खेडें होतें त्याचे आसन्यास जाऊन उभे राहिले. करवीरकरांची फौज पाठीवर होती ती गांवानजीक उभी राहिली. उभयतां फौजांस गांव दरम्यान जाहला. मग कोणीं कोणावर चालून घेतलें नाहीं. जाग्यावर उभे होते. नंतर रत्नाकरपंत यांचा रोख इकडे येण्याचा होता तो त्यांनीं सोडून भाऊसाहेबांचे गोटाकडे जाण्याचा रोख धरिला. सायंकाळचा दिवस तीन चार घटका

होता. राजमंडलकराची फौज गोटाकडे गेली. दाजीसाहेब फौजेसुद्धां निघाले. ते गोटाकडे न जातां परभारेंच निघोन गेले. आपासाहेब यांच्या चित्तांत मागें बुणग्यांत भाऊसाहेब होते ते निघून गेलेच असतील, हें मनांत आणून अमलझरीवरून तेही परभारे निघोन फौजे सुद्धां चालते जहाले. राजमंडळकराचे फौजेनें पाठलाग केला नाहीं. लढाई बिघडली. भाऊसाहेब मागें बुणग्यांत होते. राजमंडळकराची फौज गोटाकडे आली हें पाहून जवळची मंडळी भाऊबंद व शिलेदार नागो शामजी वगैरे लोक निघाले. जाग्यावर हत्ती एक व दोन तोफा व निशाण होतें. शागीर्दपेशा सुद्धां निघाले. ते समयीं भाऊसाहेब यांस घेऊन जाते तर निभावयाजोगा समय होता. परंतु कोणास धीर धरणें जहालें नाहीं. आपापले जीव घेऊन निघोन गेले. जवळ कोणी एक दमाचा मनुष्य राहिला नाहीं. इतक्यांत राजमंडळचे फौजेनें वेढा घालून गोटांत शिरले. भाऊसाहेब खाशा घोड्यावर बसले होते. तसेच एकाएकीं निघोन चालले. गोटांत राजमंडळकराची फौज शिरली. इतक्यांत हैबतराव गाइकवाड हे गोटाकडे जात होते त्यांनीं भाऊसाहेब ओळखिले नाहीं; परंतु सुभानराव बागुल म्हणून शिलेदार येलगुरकर हे पेशजीं कैलासवासीपाशीं कांहीं दिवस चाकरीस होते ते पुढें इकडून चाकरी सोडून राजमंडळींत गाइकवाडाचे पथकांत चाकरीस राहिले, त्यांनीं ओळखिलें आणि गाइकवाड यांस सांगितलें. नंतर त्यांजकडील लोक जाऊन गांठ घातली. मानेवर वार टाकिला. त्या जखमेनें घायाळ होऊन हातांत पट्टा होता त्या पट्टयानें पांच चार असामीवर वार करून जखमी केले. इतक्यांत दहावीस असामींनीं गांठून आणखी वार कानानजीक दोहों बाजूस दोन हलके केले. तेणें करून फारच घायाळ होऊन घोड्याखालीं आले. हें तिकडील स्वारांनीं पाहून जवळ येऊन पाहिलें तों निर्जीव होऊन पडले. जीव होता न होता ही भ्रांत. तेव्हां गाइकवाड यांनीं पडदळें[1] व हातांतील पट्टा कैलासवासींचा घेऊन आपले जवळ ठेविला आणि आपले बारगिराचे घोड्यावर पुढें देऊन महाराजांकडे पाठवून दिले. हैबतराव आपण गोटाकडे लुटीस गेले. नंतर मागून सरजेराव घाडगे आले. त्यांची व बारगिरांची गांठ पडली. बारगिरांस बोलले कीं, महाराजांनीं भाऊसाहेबांस आणावयास मला पाठविलें. असें सांगून बारगीर याचे घोड्यावरून आपले घोड्यावर घेऊन महाराजांकडे आले. बारगीर माघारा गेला. महाराज उभे होते तेथें पुढें येऊन घाडगे उभे राहिले. कैलासवासी यांस महाराजांनीं पाहिलें. आपण पाडाव करून आणिले म्हणून सांगितलें. श्रीमंतांचे

---

१. " कटिचर्म तु पडदळें " राजव्यवहार कोश.

पदरचे मोठे सरदार पाडाव जाहले. जीव होता किंवा नाहीं हा चित्तांत अंदेशा न आणितां वैरत्वाचा भाव चित्तांत आणून, त्यांत तर मोठीच फत्ते जाहली तो हर्ष मोठा, देहभान राहिलें नाहीं. सरजेराव घाडगे यांस आज्ञा झाली कीं, मूर्दा घोड्यावरून खालीं ढकलून देणें. त्यांनीं आज्ञेप्रमाणें केलें. जवळ खासबारदार होते, त्यांस आज्ञा झाली कीं, मारून टाकणें. त्याजवरून खासबारदार यांनीं जवळ जाऊन पाहिलें तों जीव नाहीं. मग त्यांनीं वार टाकिला नाहीं. करवीरकरांनीं केवळ वेडेपणाच केला. इतक्यांत सायंकाळचा अर्ध घटका दिवस राहिला. मीं तेथें जवळच होतों. महाराज प्रेत सोडून पुढें पाव कोश जाऊन बैठक केली. तोफांचे बार करविले, साखरा वांटल्या. खुशाली जाहली. मी प्रेता जवळ दोन प्यादे बसवून त्या जवळच होतों. करवीरास व पन्हाळ्यास वगैरे किल्लोकिल्लीं व वकिलांस तमाम पत्रें फत्ते झाल्याचीं रवाना झालीं. घाडगे यांनीं बक्षिसीची आढ घालून भूधरगडच्या किल्याची सनद घेतली. त्याच बैठकेस दोन चार घटकांनीं हैबतराव गाइकवाड लुटीस गेलेले माघारे आले. महाराजांची भेट घेऊन जाला मजकूर कळविला. त्यावेळेस घाडगे समक्ष होते त्याच बैठकेस लबाड झाले. भूधरगडच्या किल्याची सनद घेतली होती ती माघारी घेतली. इतकें होईजेपर्यंत मध्यरात्र झाली. थोडीशी मर्जी स्थिर जाहली. नंतर दहनाचा विचार भाऊराव जोशी यांस सांगितला. त्यांनीं आज्ञा घेऊन सांगतों, म्हणून सांगितलें. त्यांची वाट दोन तीन घटका पाहिली. त्यांनीं विचारिलें नाहीं. नंतर सरजेराव घाडगे यांस सांगितलें. त्यांनींही विचारलें नाहीं. मग प्रीतिराव चव्हाण व बचाजीपंत देऊळकर उभयतां त्या मंडळींतून उठोन बाहेर आले. त्यांची गांठ घेतली आणि त्यांस कांहीं दरबार खर्च कबूल करून मजकूर सांगितला. त्यांनीं विनंती करून आज्ञा घेऊन देतों म्हणून महाराजांकडे गेले. विनंती केली. त्याजवर महाराजांचें त्या मंडळीचें खलबत दोन घटका जहालें. परवानगी द्यावी न द्यावी हेंच मनांत. परंतु चव्हाण यांचा नेट चांगला पडला. नंतर त्यांनीं मला सुचविलें. मग मी पुढें जाऊन महाराजांस विनंती केली कीं, सरकारचा मनोदय पूर्ण झाला. यश आलें. कैलासवासीचें प्रेत आपणाकडे पाडाव आलें त्यास आग्निसंस्कार जाहला पाहिजे. हें महाराजांचे लौकिकाला चांगलें. मी मिरजकर बाळासाहेब यांजकडून आपणा जवळ आहें. त्यास मला भूषण व यश हें सर्वपरी चांगलें. तेव्हां महाराज चव्हाण यांस बोलले कीं, नारोपंत काय म्हणतात? ते समयीं चव्हाण यांनीं उत्तर केलें कीं, त्यांजकडे सेवकपणा त्यांनीं विनंती करावी, महाराजांनीं आज्ञा द्यावी, हें उत्तम

आहे. त्याजवर दहन करावें म्हनोन आज्ञा झाली. जोशीराव जवळच होते त्यांस महाराजांनीं सांगितलें कीं, नारोपंत यांजकडे काय साहित्य लागेल तें देणें. त्यांनीं आज्ञा म्हणोन त्याजवर ते निघून हमीदवाड्यास आपले गोटास बुणग्यांत निघोन गेले. फिरोन त्यांची माझी गांठ पडली नाहीं. व मलाही त्याचे साहित्याचें कारण नाहीं. इतकें होईजेपर्यंत अडीच प्रहर रात्र जाहली. नंतर प्रेता जवळ आलों. कोरी पासोडी घोडीवर घडीस होती ती काढून त्यांत प्रेत घालून घोडीवर पुढें घेऊन निघालों. डोंगर कटारीची वाट खचरट त्यांत थोडा थोडा पाऊस पडत होता. तसेच हलके हलके पहांटेच्या तीन घटका रात्रीस हमीदवाड्यावर लष्करच्या मुक्कामास चार प्रहर दिवस चार प्रहर रात्र आठ प्रहारांचा ताप बसला. चार पांच कोश आलों. बचाजीपंत देऊळकर महाराजांकडील मुतसद्दी यांनीं कारकून व प्यादे गांवांत जळणाचे शोधास पाठविले. त्यांनीं घरांत शिरून जळण जेथें सांपडलें तेथें काढिलें. साऱ्या गांवांत दोन मोटा गोवऱ्या सांपडल्या. लांकूड तों अगदींच नाहीं. गांव लहान, त्यांत लष्करचा मुक्काम पंधरा वीस रोज होता. जळण अगदीं राहिलें नाहीं. इतक्यांत सूर्योदय जाला. महाराज त्या दिवशीं गोटास आले नाहींत. बुणग्यांस कूच करून येण्याची आज्ञा झाली. त्याप्रमाणें कूच जहालें. रत्नाकरपंत यांचे गोटांत लांकडें तीस चाळीस भारे होतीं. तीं जाग्यावरच राहिलीं. तेथें गांवचे लोक लांकडें नेतील म्हणून चार प्यादे बसविले. आणि बचाजीपंत देऊळकर यांस सांगून यशवंतराव घाडगे यांचे पागेचे पंधरा असामी मोतदार आणून सारीं लांकडें गांवानजीक तळें आहे तेथें नेलीं. दहनाची जागा तळ्यावरच नेमिली. गांवांतून जोशी पांच सात असामी वगैरे भिक्षुक होते त्यांस बलावून आणून कांहीं तुळशी काष्टें मिळविलीं. व गोमुत्र आणविलें. शेला दहा रुपयांचा व चंदन दोन धडे व सुवर्ण दोन मासे तुकडे नऊ व तेल व कापूर वगैरे लष्करांतच जिन्नस घेतला. ब्राह्मण गांवचे जोशी चार असामी आणून प्रेत तळ्यावर दहनाचे जागीं नेलें. मंत्राग्नीचा विचार व्हावा हा हेतु होता. परंतु समयास ब्राम्हण चांगला मिळाला नाहीं. गांवचे जोशी होते ते केवळ ढ. मग तसेंच भडाग्नि देऊन दहन केलें. त्या दिवशीं हमीदवाड्यास मुक्काम केला. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं गांवचे जोशी व मी स्नानें करून अस्थि काढिल्या व रक्षा एक बैलभर झाली ती कृष्णेंत नेऊन टाकावी म्हणोन उद्योग केला. परंतु मध्यंतरीं वेदगंगा व दूधगंगा या नद्यांस पाणी भर आलें होतें. नांव ठोकैरा तेथें कांहींच नाहीं. मग ती रक्षा तेथें त्या

---

५. बुडकी नांव करून तिला कातड्यानें मढवितात ती.

गंगेंत विसर्जन करोन माघारे हमीदवाड्यास निघोन आलों. नंतर अस्थि मिरजेस रवाना करावयाच्या त्यांस ब्राम्हण मिळेना. तेव्हां श्रीमंत हरबा अण्णा पटवर्धन यांजकडील ब्राह्मण लष्करवाल्यांनीं उंटें, हत्ती देऊन बेगारीस आणिला होता, तो अगदीं लुटलेला, नेसावयास पंचा चार हात मात्र होता. मग त्या ब्राह्मणाचा सरंजाम चर्मी जोडा एक व पासोडी एक व डोईस बांधावयास पंचा एक व दोन रुपये खर्चास देऊन त्याजबरोबर चार असामी प्यादे दिले. आणि रवानगी केली. मार्गाची माहिती नाहीं, तेव्हां टिपण लिहून दिलें. आणि रवानगी केली. कोंगजोळा इचलकरंजी तेथून कुरुंदवाड तेंथून मिरज याप्रमाणें सांगितलें. त्याप्रमाणें अस्थि मिरजेस पोंचल्या. पत्राचें उत्तर कैलासवासी बाळासाहेब यांनीं मला लिहिलें होतें कीं, दहनास वगैरे खर्च काय जाहला असेल त्याची याद पाठवून देणें. ऐवज पाठवून देऊं. याप्रमाणें लिहिलें. परंतु मी याद पाठविली नाहीं. कारण कैलासवासी भाऊसाहेब यांचे चौघे पुत्र शिवाय भाई मंडळी बहुत आप्त पदरची मंडळी थोर थोर वगैरे कित्येक लहान मोठे इतके असोन अंतकाळच्या समयास जवळ कोणीच नाहीं. नारो हरी करंदीकर याचा जन्मांतरींचा योग उभा राहिला. अशा पुण्यश्लोकाचे देहास हात लागून अंतकाळची सेवा जी पुत्राचे हातून व्हावयाची ती माझे हातून घडली. अशी सेवा हजारों रुपये खर्च केल्यानें घडावयाची नाहीं ते घडली. मोठाच अलभ्य लाभ झाला. शेवटींचा अंतकाळ समयाचा पुत्र नारो हरी असें विश्वतोमुखीं जाहलें. कैलासवासीचा काळ उत्तम प्रकारचा जाहाला. कसा म्हणाल तर आमरणांत क्षात्रधर्म करून श्रीमंताची पेशवे यांची सेवा चाकरी केली. शूरास जसें मरण धारातीर्थीं यावें तसें आलें. तो प्राणी सूर्यमंडळ भेदून उत्तम लोकांस जातो. त्यास पुनः जन्म नाहीं. श्रीगणपति आराध्य त्याची केवळ निःसीम भक्ति अंगारकी चतुर्थी व्रतदिवस. एक पत्नी व्रत. दिगंत कीर्ति ज्याची. प्रदोष समय, त्या कालीं देह विसर्जन झालें. हमीदवाड्यावरचा साराविधि आटोपून मग करवीरकरांच्या लष्करांत गेलों. याप्रमाणें मजकूर जाहाला. पुढें करवीरास वेढा कैलासवासी आपासाहेब यांनीं दिला व वेढा उठला तो मजकूर अलाहिदा आहे* कळावें.

श्री.

मेस्तक संवत्सर गोंवे व शालिवाहन शक व यवनी फसली दिल्लीचा व सन अर्बी व शिवाजी राजे भोंसले छत्रपती यांचा शक सुरूसन समान अशरीन मयातैन व अलफ.

---

* हें पत्र रा० रा० विष्णू धोंडदेव भागवत वीरमाडकर यांजकडून मिळालें.

[ १ ] अबदुल्लाखान जावलीस शिवाजीराजे यांनीं मारिला.
आज संवत्सर चैत्र शुद्ध १दे मृगापासून मृगापासून जेष्ठ शुद्ध १२ पासून
शार्वरीनाम पासून शाक फसली अर्बी शिवाजीराजे यांचा
३४. १५८२. १०७०. १०६१. ०
सन इहिदे सितेन अल्लफ.

[ २ ] शास्ताखानाचा सुभा येऊन चाकण किल्ला घेतला.
प्लवनाम ३५. १५८३. १०७१. १०६२. ० सन
इसने सितेन अल्लफ.

[ ३ ] त्यानंतर भाद्रपदमासीं खानाचा पुत्र शिवाजीराजे यांनीं आंगठा कापून मारिला. व विठ्ठल मोरदेव देशपांडे परगणा पुणें कार्तिक वद्य ४ मेने [ ले ? ] व सुभा पुरंदर या खालीं आला. त्याचा तळ कोंडितावर आला.
क्रोधीनाम ३८. १५८६. १०७४. १०६५. ०
सन खमस सितेन अल्लफ.

[ ४ ] थोरले चिंतामण देव पौष वद्य ४ समाप्त झाले.
कीलकनाम ४२. १५९०. १०७८. १०६९. ०
सन तिसा सितेन अल्लफ.

[ ५ ] शिवाजीराजे सिंहासनारूढ जाहले ज्येष्ठ शुद्ध १३ जाहले शक.
आनंदनाम संवत्सरे ४८. १५९६. १०८४. १०७५. १.
खमस सबेन अल्लफ.

[ ६ ] शिवाजी राजे शांत चैत्र शुद्ध १५ जाहले. मग संभाजी राजे सिंहासनारूढ झाले. श्रावण शुद्ध १५.
रौद्रनाम ५४. १६०२. १०९०. १०८१. ७.
इहिदे समानीन अल्लफ.

[ ७ ] रामदासस्वामीचा अवतार समाप्त जाहला.
दुर्मतिनाम ५५. १६०३. १०९१. १०८२. ८.
इसन्ने समानीन अल्लफ.

[ ८ ] शाहूराजे यांचा जन्म.
दुंदुभिनाम ५६. १६०४. १०९२. १०८३. ९.
सल्लास समानीन अल्लफ.

[ ९ ] अवरंगजेब पातशहा यांणीं विजापूरची पातशाई घेतली.
रक्ताक्षीनाम ५८. १६०६. १०९४. १०८५. ११.
खमस समानीन अल्लफ.

